# कुलकथा.



लेखिका:--

आनंदीबाई जयवंत.







सन १९३२



किंमत १ रुपया.





# अर्पणपत्रिका.

कैलासवासी तीर्थरूप ' दादा ' व अखंड
सौभाग्यवती ' आई ' यांचें परमपूज्य
चरणीं ही कृति सप्रेम व
सादर अर्पिली असे.

लेखिका

# आभार प्रदर्शन



सन १९२२ सालीं मीं द्वारकेस असतांना ' डेव्हिड कॉपरफील्ड ' ही ' डिकन्स ' ची कादंबरी करमणूक म्हणून वाचिली. ती मला इतकी पसंत पडली कीं, तशाप्रकारची परंतु आपल्या समाजाला पोषक अशी एकादी कादंबरी मराठींत तयार करावी असा मीं निश्चय केला. हा निश्चय मीं तात्काल कृतींत आणून प्रस्तुत ' कुलकथा ' दीड महिन्यांत लिहून काढिली. माझ्या सारख्या आशिक्षित-भगिनीची ही मंदकृति विद्वज्जन मान्य करतील अशी आशा आहे.

' कुलकथा ' लिहून कांहीं दिवस तशींच पडून राहिली होती. कांहीं वर्षांनीं प्रसिद्ध नाटककार **श्री. शां. गो. गुप्ते** ( सातारा ) यांनीं ही वाचून प्रोत्साहन दिलें, त्यामुळें ही छापून काढावी असा निश्चय झाला. पुढें कांहीं दिवसांनीं **प्रो. वि. पां. दांडेकर** यांनींहि ही कादंबरी वाचून माझ्या निश्चयाचें दृढीकरण केलें. त्यानंतर **श्री. जानकीबाई प्रधान** यांनीं तर या निश्चयाला मूर्तस्वरूप आणण्याचा दीर्घ प्रयत्न केला आणि चित्रशाळेचे मालक **श्री. शंकर नरहर जोशी** यांनीं माझा निश्चय प्रत्यक्ष स्वरुपांत प्रकट केला. पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याचें काम फार बिकट असतें पण तेंहि प्रथमनिर्दिष्ट बंधु **गुप्ते** यांनीं पतकरून पूर्ण केलें. शेवटीं ही माझी अल्प कृती जनतेपुढें येण्यापूर्वी येथील व्यायामप्रेमी **श्रीमंत आबासाहेब मुजुमदार** तसेंच इतिहास प्रेमी **श्री. वि. स. वाकसकर** यांनीं अवश्य ती मदत केली. याबद्दल उपरीनिर्दिष्ट सर्व बंधुभगिनींचें मी अन्तःकरणपूर्वक आभार मानिते.

कोर्डे लॉज<br>
बडोदें.<br>
ता. १-२-३२



**आनंदीबाई जयवंत.**



# प्रस्तावना.



श्रीमती **आनंदीबाई जयवंत** यांनीं मला आपल्या " **कुलकथेला** " प्रस्तावना लिहिण्याची आज्ञा कां केली हें कोडें मला अद्याप सुटत नाहीं! एकच कारण संभवनीय वाटतें; आणि तें म्हणजे माझ्या विनंतीवरून प्रस्तुत कादंबरी दोन वर्षांपूर्वी, मी प्रसिद्ध करावी या हेतूनें पूर्ण करण्यांत आली! पण माझ्या त्यावेळच्या आकांक्षा जागच्या जागीं विरून गेल्या! आणि याच कारणामुळें माझ्यावर ही जबाबदारी आली असावी!–कांहीं असो, आज चित्रशाळेसारख्या विख्यात संस्थेकडून सदर कादंबरी प्रसिद्ध होण्याचा सुयोग आला यांतच मला अभिमानी आनंद होत आहे. आणि म्हणूनच योग्यायोग्यतेचा फारसा विचार न करितां, हें प्रस्तावना-लेखन मी स्वीकारलें आहे. श्रीमती आनंदीबाईंनी " माझी ओळख करून द्या " असें मला सांगण्यांत माझ्या मोठेपणापेक्षां त्यांचेंच सौजन्य अधिक आहे आणि याचकरतां, मी ही मोठा होण्याची संधि एकदम साधली! " माणूस मोठा सारस्वत झाला म्हणजे त्याचें स्वतंत्र लेखन बंद होऊन, तो प्रस्तावना-लेखक होतो " असें मी नेहमी विनोदानें म्हणत असे! श्रीमती आनंदीबाईंनीं माझी योग्यता नसताना मला जाडा लेखक करून, माझ्यावर विद्वत्तेचा आणि मोठेपणाचा आरोप केला आहे!

माझें आजपर्यंतचें नाट्यक्षेत्र सोडून कादंबरीच्या या अभिनव, अपरिचित उद्यानभूमिकेंत पाऊल टाकताच, मला दोन्हींमधील पुष्कळच भेद आढळून आले. नाट्यात प्रत्यक्ष अथवा कल्पनासंवेदी मानवी जीवनातील, अत्यंत महत्त्वाच्या अशा प्रसंगाचा चित्रपट करून तीनचार तासाच्या अवधीत, तो चित्रपट प्रेक्षकाच्या समोरून परिणामकारक रीतीनें सरकवावा लागतो; मधले बारीकसारीक प्रसंगाचें दुवे जुळणी-करता प्रेक्षकाच्या कल्पनेवर सोपवावे लागतात!–उलट, सूक्ष्म, साधारण निरीक्षकाच्या लक्षांतही न येणाऱ्या बारीकसारीक गोष्टींची व प्रसंगाची नोंद ठेवून, त्यांची स्वाभाविक माला, प्रत्यक्षाचा आल्हादकारक आभास करून देण्याइतक्या नाजूक हातीं गुंफणें यांत कादंबरीकाराचें यश असतें! नाटककार आणि कादंबरीकार यांतील फरक ठोकळपणें सांगावयाचा झाला तर असें म्हणतां येईल कीं ' थोडी अतिशयोक्ति ' हा नाटककाराचा " गुण " ठरेल तर " यथातथ्य वस्तुदर्शन " हा कादंबरीकाराचा " विशेष " समजला जाईल. एकच साम्य दोघांतही असतें. आणि तें म्हणजे रहस्य-दर्शन. जितक्या कुशलतेनें कादंबरीकार किंवा नाटककार प्रतिपाद्य वस्तूंतील रहस्योत्कर्ष साधील, तितक्या प्रमाणात त्याच्या लेखनाच्या यशापयशाची कमान झुलत राहते! परिणाम हा कलेचा आत्मा असतो. कलेच्या दृष्टीनें नाट्याचें काय किंवा कादंबरीचें काय–चार वर्ग करता येतात.

**( १ ) आद्योत्कर्षी, ( २ ) समानोत्कर्षी, ( ३ ) मध्योत्कर्षी व ( ४ )**

**अंत्योत्कर्षी.**—यांपैकीं पहिले दोन प्रकार प्रेक्षकांस किंवा वाचकांस कधींच मोहून टाकीत नाहींत. सुरवातीसच वस्तुरहस्याचा स्फोट करून किंवा तोच कथौघ नीरसपण अंतापर्यंत चालू ठेवून आकर्षक होत नाहीं, म्हणून पहिले दोन्ही प्रकार अधमकलेचें द्योतक-अर्थात् त्याज्य समजले जातात. गंगौघाप्रमाणें सुरवात क्षीणपणें होऊन रहस्योत्कर्ष जर लेखनाच्या ओघाबरोबर बहारदार होत गेला, तर सहाजिकच रसोत्कर्षहि होत जाऊन, वाचक किंवा प्रेक्षक तल्लीन झाल्याशिवाय रहात नाहीं, व रहस्याचा स्फोट होईपर्यंत तो सहसा भानावर येत नाहीं ! या दृष्टीनें मध्योत्कर्षी व अंत्योत्कर्षी लेखन यशस्वी ठरतें. मध्योत्कर्षी लेखनांत ( Romantic ) आनंदपर्यवसायी लेखन बहुधा येतें. यांत लेखक वस्तुविकास मध्यापर्यंत परमावधीस ( Climax ) नेऊन नंतर आपलें विचारांचें जाळें हळूहळू आवरूं लागतो; व तसतसा वाचकांस किंवा प्रेक्षकासही आनंद होत जातो आणि त्याचें लक्ष अंताकडे उत्सुकतेनें वेधलें जातें ! याच्या उलट अंत्योत्कर्षी लेखनांत बहुधा ( Tragedies ) दुःखपर्यवसायी लेखन येतें. अशा लेखनांत वस्तुविकास, रहस्योत्कर्ष आणि रसोत्कर्ष अशा अवस्थेंत गेलेला असतो कीं, प्रेक्षकांच्या किंवा वाचकांच्या कल्पनेला जबर आघात केल्याशिवाय कथासूत्र त्याला संपवतांच येत नाहीं !

या दृष्टीनें "कुलकथेचा" विचार केल्यास ती Romantic मध्येंच पडेल "जवाहिराची चोरी" येथपर्यंत वस्तुविकास होतो व पुढें हळूहळू कथासूत्र उकलूं लागतें. या चोरीपर्यंत कथानायकाच्या दुःखाची कलती कमानच दिसतें, पण तेथून पुढें दैवाची त्याच्यावर थोडथोडी कृपा होऊं लागते. सदर कथानकाचा ओघ अगदींच रूक्षपणानें झाला असला तरी पुढेंपुढें याच कथौघांत इतकीं पात्रें, इतक्या हळुवारपणें घुसलेलीं दिसतात कीं लेखिका आणखीहि "**मायाबाजार**" पुढें उत्पन्न करणार आहे कीं काय अशी शंका येतें ! नायकाचें चरित्र कोणाही कर्तबगार गरिबाला मार्गदर्शक होण्यासारखें आहे. त्याचा, त्याचप्रमाणें माईसाहेब, भीमा, बाळासाहेब, बापुसाहेब, शेटसाहेब, मोटीबेन, मगनलाल, विठोबा यांचा स्वभावपरितोष म्हणजे प्रत्यक्ष व्यवहारांतील निरनिराळ्या व्यक्तींचें व्यक्त दर्शन आहे ! निरनिराळ्या भूमिकेंत तन्मयतेनें शिरण्याची कला श्रीमती आनंदीबाईंनीं या पहिल्याच कृतींत इतक्या कुशलतेनें दाखवल्याबद्दल कोणीहि रसिक त्यांचें कौतुकच करील ! "मोटीबेन, माणिबेन आणि मगनलाल" यांच्यामधील दोनतीन प्रसंग वर्णन करतांना उत्पन्न केलेला ध्वनि अत्यंत नाजूक आणि हृदयस्पर्शी आहे ! त्याचप्रमाणें मुद्दाम असो कीं सहज झालें असो—सर्व कथानक आनंदपर्यवसायी होत असूनहि आद्यंत जो एक अस्फुट करुणस्वर कथेंतून नादित होतो तोसुद्धां मनोरम आहे ! अगदीं साधी पण मनोहर आकर्षक भाषा, नाजूक रीतीनें केलेलें कांहीं ठिकाणचें प्रसंगवर्णन, स्वभावरेखनांत, दिसून येणारें बारीक निरीक्षण, आणि ठिकठिकाणीं हृदयांतील नाजुक भावनांचें जाळें उलगडतांना दिसून येणारी हळवी वृत्ति या दृष्टीनें, "बालमित्र" "नोट हरवली" मनाची

तळमुळ " " रात्रींचें कारस्थान " " जवाहिराची चोरी " " भग्नहृदयी पिता " "एक ..रणीय दिवस " वगैरे प्रकरणें वाचनीय आहे ! श्रीमती आनंदीबाईच्यांत दोष नाहींत असें मात्र नाहीं ! तेहि पुष्कळ आहेत ! त्यांना खरेंखुरें असें कधींच रागावतां येत नाहीं ! त्यांचा प्रत्येक वेळचा राग उसना वाटतो ! "खोल्यांचा खप (?)" अशासारखे अस्सल कायस्थी शद्वप्रयोग ज्याप्रमाणें त्या करतात त्याचप्रमाणें " घागरीनें टिप्याला मारण्याचा " बालिशपणा त्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं ! साऱ्या कुलकथेला कारण असलेली (?) पांच रुपये देणारी भीमा अगदींच दुबळी वाटते. त्याच-प्रमाणे शांता व कथानायक शंकररावाच्या गांवीं असतांना त्यांच्या वर्णन केलेल्या मनःस्थितीवरून आनंदीबाईंना कथौघाला कांहीं निराळेंच वळण (!) द्यायचें नाहींना-अशी शंका येते न येते तोंच उपटसुंभ मधुरी ( माधुरी ) मध्येंच येऊन कथानायकाला पटकावते ! कथानायकाला आस्थिरवृत्तिचा ठरवते ! बाळासाहेब सगुणा यांचा शेवट इच्छेविरुद्ध कथेच्या स्वाभाविक ओघाला सोडून केल्याप्रमाणें अस्वाभाविक वाटतो. बिचारे शेटसाहेब, मणीबेन तर शेवटींशेवटीं लुप्तप्रायच होतात ! त्याचप्रमाणें आनंदीबाई ज्यावेळीं स्वतः निर्विकार राहून भावना जागृत करण्याचा मुद्दाम प्रयत्न करतात, तेव्हां त्यांना तें साधत नाहीं पण त्या स्वतः ज्यावेळीं " मी लेखिका आहे " हे विसरून, भावनेंत शिरून लिहितात त्यावेळीं तें त्यांना सहज साधतें ! हे दोन्ही प्रकार म्हणून, ३१, १०१, १५७, १५८ पानांवरील संभाषणें दाखवितां येतील. पृष्ठ १६५ वरील स्त्रीशिक्षणावरील विचार शिळेच वाटतात ! व पृष्ठ १६७ वरील ताईचें भाषण म्हणजे तर एक छोटेसें व्याख्यानच आहे ! महाबळेश्वरास आगगाडी नाहीं हेंही आनंदीबाई विसरतात; त्यांना "माथेरान" म्हणायचें होते कीं काय नकळे ! " यत्किंचित्" सारखे चुकीचें शब्दप्रयोग भलत्याच ठिकाणीं त्या करतात. त्याचप्रमाणें " टिलुख्या " सारखे नवीन वाटणारें शब्दप्रयोगहि त्या प्रचारांत आणूं पाहतात ! आपल्या आय्. सी एस्.-सारख्या उच्च शिक्षणाकरतां परदेशीं प्रयाण करणाऱ्या घसरगुंड्या (!) विद्वानांचें चुकतें कोठें ते उघड सागण्याऐवजीं परकी समाजाला शाप देण्यांत सुद्धा त्यांच्या मनाचा समतोलपणा ढळलेला दिसतो ! –हे किरकोळ दोष सोडले तरी आनंदीबाईचें लेखन कौतुकास्पद आणि अभिनंदनीयच ठरेल, एवढेंच नव्हे तर त्यांच्या हातून महाराष्ट्रीय विदग्धवाङ्मयांत चांगली भर पडेल अशी खात्री वाटते !

श्रीमती आनंदीबाई जशा लेखिका आहेत तशाच त्या कुशल चित्रकाराहि आहेत. हें कादबरींतील त्यांच्याच कुंचलीनें चितारलेल्या चित्रांवरून वाचकांना दिसून येईल. आणि सर्वांत विशेष आश्चर्य हे की लेखनाचें किंवा चित्रकलेचें ज्ञान सर्वस्वी स्वार्जित आहे. कुशल लेखक मानवी जीवनाचें आविष्करण शद्बलाघवानें करतो, पण कुशल चित्रकाराची थोरवी त्यापेक्षां अधिक आहे. मानवी मुग्धभावनांचा विकास, त्याचें दर्शन त्याला मुग्धपणानें केवळ कुंचलीच्या मुक्या चातुर्यानें करावें लागते! जो उत्कृष्ट चितारी असतो तो स्वभावतःच भावनाप्रधान कवि– मग त्याचें काव्य मुग्ध

कां असेना–पण कवीहि असतोच ! श्रीमती आनंदीबाईंना हा कलेचा हात जन्मतःच मिळाली आहे ! त्या जशा उच्चशिक्षणाशिवाय किंवा पदवीशिवाय, मनाची करमणूक करतांकरतां, प्रयत्नानें लेखिका झाल्या तशाच त्या नियमित शिक्षणाशिवाय चित्रकाराहि होऊं शकल्या!–कलेला ठराविक शिक्षणाची जरूर नसते; तिचा विलास आणि विकास असाच स्वाभाविक असावा लागतो! आनंदीबाईंचीं चित्रें " **महाराष्ट्र साहित्य** " " **गृहलक्ष्मी** " " **आनंद** " वगैरे ठिकाणीं प्रसिद्ध झालीं असून त्यांच्या कांहीं चित्रांना लहानमोठीं पारितोषकेंहि मिळालीं आहेत! आजपर्यंत लहानमोठ्या गोष्टा प्रसिद्ध होऊन त्या "कथालेखक" म्हणून कांहीं वाचकांच्या परिचयाच्या होत्या; आज त्या एक उदयोन्मुख कादंबरीकार म्हणून सरस्वतीमंदिराच्या दारांत वाग्देवीची पूजा बांधण्याकरतां, आपली अभिनव साहित्य–सेवा घेऊन येत आहेत! अशा वेळीं त्यांच्या मनांत आत्मविश्वासाऐवजीं भीतीचीच भावना अधीक असणें स्वाभाविक आहे;–पण महाराष्ट्राचा रसिकवर्ग " हंसक्षीरन्यायानें "च गुणांचें नेहमीं कौतुक करतो असें श्रीमती आनंदीबाईंना खात्रीचें आश्वासन देऊन, रसिकांच्या हातीं ही " कुलकथा " मी विश्वासानें आणि आनंदानें देतों.

सातारा
२५–१–३२

रसिकांचा सेवक,
**शांताराम गोपाळ गुप्ते.**

# अनुक्रमणिका

# कुलकथा.



## स्मृति पहिली.

## माझा जन्म.



नामाकित थोर पुरुषांची जी जीवनचरित्रें लिहिलीं जातात; तशापैकीं मी कांहीं मोठा पुरुष नाहीं; तरी पण माझ्या आयुष्यांत जीं स्थित्यंतरें झालीं, त्याची साधारण हकिकत एकत्र ग्रथित केली असतां त्यापासून एकाद्यास जरी त्याचा उपयोग झाला तरी मला जे कांहीं कष्ट पडले त्याचे सार्थक झालें असें मला वाटेल, असा मनांत विचार येऊन कांही वर्षांपूर्वी ज्या ज्या लहानपणच्या गोष्टी आठवल्या त्याची टांचणें मीं करून ठेविलीं होती. त्यावरून माझ्या क्षुद्र जीवनाचें चरित्र मीं लिहावयास घेतले. पुढें आपल्यासारख्या यत्किंचित् माणसाचें चरित्र लिहिणें म्हणजे आपल्या मूर्खपणाचें प्रदर्शन जगासमोर करणे होय, असे मनात येऊन मीं लिहावयास घेतलेलें चरित्र तसेंच अर्धवट टाकून दिले. पण मध्यंतरीं माझ्या एका प्रेमळ मित्राच्या हातीं माझ्या टिपणाचे एक पान आले व माझे चरित्र लिहिण्याविषयीं त्याने फारच आग्रह केला. त्याचे मन मला मोडता येईना; कारण त्याचा व माझा तसाच जिव्हाळ्याचा संबंध होता. माझ्या दुसऱ्या मित्रानी पण मला फार भीड घातली, तेव्हां मीं हें माझें चरित्र लिहिण्यास सुरुवात केली.

माझा जन्म जेव्हां झाला त्यावेळची तारीख वगैरे मला कांहींच माहीत नाहीं. सन १८९१ च्या माघ महिन्यांत मी एका सोमवारीं, अमावास्येच्या व प्रतिपदेच्या संधींत, रात्र सरता सरता सूर्योदय होण्यापूर्वी जन्मलों ! ज्या वेळीं या मृत्युलोकीं मी प्रथम डोळे उघडले, त्याच वेळीं माझ्या मातेनें आपले डोळे मिटले ! मी जन्मलों ती वेळ बहुधा कुवेळ अगर व्यतिपात, शनीची वक्रदृष्टि, नक्षत्राचा क्षय यापैकीं कांहीं तरी खात्रीनें असलेंच पाहिजे, निदान मूळ नक्षत्र तरी असेलच ! माझ्या मातेने पुत्रमुख पहाण्यापूर्वींच आपले डोळे कायमचें झांकले !

घरांत नूतन बालक जन्मलें म्हणजे सर्वांस आनंद वाटतो. विशेषतः तो मुलगा असला तर विचारावयास नको ! पण माझ्या जन्मामुळे कोणालाच आनंद तर वाटला नाहींच परंतु उलट दुःखच झालें! माझ्यासारख्या दुर्दैवी मुलाचें कोडकौतुक कोण करणार? कसली पाचवी व कसले षष्ठीपूजन ! बाराव्या दिवशीं वाजंत्र्याच्या गजरांत बारसे वगैरे कांहींच झाले नाही. कित्येक दिवस पर्यंत माझे नांवहि ठेविलें नव्हतें. बाऱ्या, बाबू, बाळ यापैकीं ज्याचे तोंडीं जे येईल त्या नांवानें मला संबोधलें जात असें. माझे वडील

माझ्याकडे विशेष लक्ष देत नसत. मी त्यांचे प्रथमचेंच अपत्य असल्यामुळें आपल्या मातुश्रीच्या समक्ष माझ्याकडे पाहणें हिंदू रिवाजाच्या विरुद्धच होय. एखाद वेळेस कोणाच्या न कळत अपत्य प्रेमाचें भरतें येऊन मला उचलून घेण्याचें त्यांच्या मनांत आलें, तरी माझ्यासारख्या जरत्कारू सुदामदेवाला हात लावावयास त्यांना भय वाटत असावें. त्यांतूनहि त्यांनीं मला घेतलेंच तर मीं कानठाळ्या बसतील असा टाहो सुरू करावा, कारण माझ्या आजीशिवाय व भीमा दाईशिवाय मी इतर कोणाला स्पर्श करूं देत नसे. असें माझें बालपणचें वर्णन आजी करीत असे.

माझी आजी प्रथम कांहीं दिवस माझ्याकडे फारसें लक्ष पुरवीत नसे. कारण तिच्या आवडत्या सुनेच्या मुळावर माझा जन्म झाला असे तिच्या भोळ्या मनाला वाटत होते. माझ्या मातेच्या मृत्यूनंतर मी फार दिवस जगणार नाहीं असें सर्वांनीं भाकीत केलें होतें. परंतु माझें शरीर कृश असलें तरी माझी भूक दिवसेंदिवस एकसारखी वाढतच होती.त्यावरून माझेआयुष्यहि वाढत आहे अशी सर्वांची खात्री होऊं लागली. आजीहि नंतर माझ्याकडे जास्त लक्ष देऊं लागली. गाईम्हशीचें किंवा बकरीचें कसलेंहि दूध मला पचूं लागलें, ठराविक दूध पोटांत गेलें तरी अधिक दुधाच्या आशेनें माझें तोंड उघडे रहात असे; व दूध न मिळालें तर कधींहि न थाबणारे व कर्णकटु असें रडें सुरू होत असें.

मी तीन महिन्यांचा झाल्यावर माझें नांव ठेवण्यांत आलें. माझ्या आजोबाचें 'चिंतामणी' हें नाव त्यांच्या स्मरणार्थ मला देण्यांत आलें. पण माझी आजी मला "चदू" या नावानें संबोधीत असे. माझ्या खऱ्या नावाचा लोप होऊन मला सर्वच चंदू या नावानें ओळखूं लागले.मला समजूं लागलें तेव्हांपासून माझी आजी व भीमादाई या दोघीशिवाय मी कोणाजवळ कधींच जात नसें व त्या दोघीच मला सर्वस्व वाटूं लागल्या. कारण त्या दोघी माझ्यावर प्रेम करीत असत.

माझे वडील तीन चार वर्षांपासून +++ गावीं आपल्या वडिलांप्रमाणें वकिली करूं लागले होते. माझ्या आजोबांनीं आपल्या धंद्यात चांगला लौकिक मिळविला होता व हुशार वकील म्हणून त्यांची बरीच ख्याती होती. त्या मानानें पैसाहि बराच मिळविला होता. आपल्या मागें आपल्या मुलानें तोच धंदा करून यश व कीर्ति वाढवावी म्हणून त्यांनीं माझ्या वाडलांसवक ल होण्याचाच आग्रह केला.मॅट्रिक होऊन वकिलीची परिक्षा त्यांनीं दिली व वकिली सुरू करतांच आजोबांनीं आपली वकीली बंद करून या ऐहिक जगाचा वासहि बंद केला! आपल्या धंद्यांत मुलानें कीर्ति व नांवलौकिक मिळविला हें पहाण्याचा सुयोग त्यांना लाभला नाहीं. थोड्याच वर्षांत माझे वडील एक नामांकित वकीलांत मोडूं लागलें.

माझ्या वडिलांनी पुनः गृहस्थाश्रमी व्हावें म्हणून बऱ्याच लोकांनी त्यांना सांगून पाहिलें व पुष्कळ खटपटी केल्या. पण त्यांनीं प्रथम कोणास दाद दिली नाहीं. माझ्या आजीला आपल्या सुनेच्या अकालीं मृत्युमुळें फार दुःख झालें असल्यामुळें

कांहीं दिवस तिनेंहि त्या बाबतींत त्यांना कांहींच सांगितलें नाहीं. परतु आपल्या तरुण मुलानें असें जन्मभर विधुरावस्थेंत रहावें असें कोणत्या मातेस वाटेल बरें ? मी दीड दोन वर्षांचा झाल्यावर आजीनें भाऊंच्या मागें पुनः लग्न करण्याबद्दल टूमचण लाविली.(आजी व पुढें मीहि वडिलांस भाऊ म्हणत असें आणि त्याच नांवानें पुढें त्यांचा उल्लेख केल्यास बरें) इतर सर्व त्यांना भाऊसाहेब म्हणत. कांहीं दिवस त्यांनीं आजीला देखील दाद दिली नाहीं. " हं पाहूं. " इतकें बोलून ते स्वस्थ असत. पुढें पुढें जेव्हां घरांतून व बाहेरूनहि लग्नाबद्दल त्यांच्या मागें एकसारखा ससेमिरा लागला, तेव्हां लग्न करून आपल्या मागचा एकदाचा त्रास चुकवावा असें त्यांच्या मनांत आलें असावें. कारण पुढें एका ' केस ' चें काम जज्ज कोर्टांत चालावयाचें असल्यामुळें ते ठाण्यास गेले होते; त्या वेळीं तेथच्या एका गरीब घराण्याच्या चौदा पंधरा वर्षे वयाच्या मुलीला पाहून तिच्याशीं लग्न करण्याचें त्यानीं नक्की केलें. त्यावेळच्या मानानें मुलगी बरीच मोठी असून दिसण्यांतहि बरी होती.म्हणून ती मुलगी त्यांनीं पसंत केली. घरीं आल्यावर त्यानीं आजीचा विचार घेतला; आजीनें भाऊंची मर्जी पाहून ती मुलगी कबूल केली. कारण इतर कांही वृद्ध बायकाप्रमाणें आपलाच हेका चालविणारी आजी नव्हती. आपल्या मुलानें अखेरीस लग्न करण्याचे कबूल केलें यांतच तिला समाधान वाटले. नंतर थोड्या दिवसानीं फारसा गाजा वाजा न करतां भाऊंनीं द्वितीय संबंध केला.

भाऊंनीं दुसरें लग्न केलें त्याबद्दल त्यांना बिलकुल दोष देतां येणार नाहीं. ती गोष्ट कांहीं जगाविरुद्ध नव्हती उलट त्यांनीं लग्न केलें नसतें तरच आश्चर्य होतें ! चार पांच मुलांचे बाप अगर नातवांचे आजोबा नक्राश्रु ढाळून नाइलाजाने गुढग्याला बाशिंग बांधून चवथे पांचवे खेपेस नवरदेव ('नवरा मुलगा') बनून आपल्यापेक्षां दुप्पट तिप्पट लहान वयाच्या कोंवळ्या कुमारिकेशीं विवाह करण्याला तयार होतात; आपल्या अखेरीच्या दिवसांत कोणी तरी सत्तेचे माणूस सेवा करावयाला त्याना पाहिजे असतें व त्यामुळें त्या बिचारीचे अखेरपर्यंतचे दिवस सत्तेनें मातीमोल करण्याची त्यांना सत्ता आलेली असते, तसा प्रकार माझ्या भाऊंच्या बाबतींत घडला नव्हता.

---

## स्मृति दुसरी.

# नवी आई.



पाच वर्षे पुरीं होऊन मला सहावें वर्ष लागलें, वयाच्या मानानें नसत्या उठाठेवी व चौकश्या करण्याची वाईट खोड मला होती. भाऊंशीं मी फारसा बोलत नसे. माझें जें कांहीं चालें तें आजीजवळ. भाऊंचा जसा लौकिक वाढत चालला, तसा घरांत त्यांना फार थोडा वेळ मिळू लागला. आजीशीं बोलावयास देखील त्यांना बनत नसे.

घरीं असले तरी पक्षकारांचा गराडा त्यांच्याभोंवतीं असेच. कधीं काळीं त्यांना वेळ मिळून जर ते आजीशी घरगुती बाबतींत बोलत; तेव्हां जर मी आजीजवळ असलों, तर माझी टकळी बंद होत असे. त्यांच्याशीं तर नाहींच पण त्यांच्या देखत आजीशीं सुद्धां मी बोलत नसें, तेहि आजीच्या देखत माझ्याशीं कधीं बोलत नसत. आजी जवळ नसून मी एकटाच असलों तर ते माझ्याशीं बोलण्याचा प्रयत्न करीत असत, परंतु मी त्यांना पहातांच एकटा त्यांचेसमोर उभा रहात नसें, केव्हांच दुसरकिडे पळ काढी त्यांचा स्वभाव रागीट अगर क्रूर होता असें नाहीं; पण त्यांच्यासमोर जाण्याला मला धीर होत नसे एवढी गोष्ट खरी.ते कधीं कोणावर रागावत नसत,मलाहि कधीं एका शब्दानें त्यानीं दुखविलें नाहीं, मग मला असें कां वाटावें ईश्वर जाणें !

माझ्या नव्या आईला मी बाई म्हणत असें. माझ्या आठवणींत ती माझ्याशीं फारसें बोललेली मला आठवत नाहीं. मीहि तिच्याशीं कधींच फारसें बोलत नसें; जें कांहीं मागावयाचें सांगावयाचें तें आजीजवळ, घरांत आजीशिवाय जसें दुसरें कोणी माझें नाहींच असें मला वाटत असे. इतक्या अवधींत मला एक भाऊ व बहीण अशीं दोन भावंडें झालीं; परंतु एक जन्मताच व एक जन्मल्यानंतर महिन्याच्या आत मृत्युमुखीं पडलीं. त्यामुळें बाईला फार दुःख झालें ! शेजारणी पाजारणीच्या सांगण्या-वरून अलिकडे ती बरेच देवधर्म, व्रतें वगैरे करीत असे, आठवड्यांतून एक दोन तर उपास, पिंपळाला प्रदक्षिणा, उंबराची पूजा, तसेंच कांहीं परोपकारी बायांच्या मदतीनें गळ्यांत बांधावयाला ताईत, दंडाचे दोरे, उशाला ठेवण्याकरितां अंगारा असलेहि प्रकार करीत असे.

एकदां दिवे लागण्यापूर्वींच आजीनें मला दूधभात जेवावयास घातला व आता घटकाभर खेळून नंतर नीज असें सांगितलें.पण ते दिवशीं संकष्टी चतुर्थी होती व बाईला उपास होता हें मला माहीत होतें.म्हणून मी आजीला म्हणालों- " आजी, बाईनें पूजा केल्यावर नैवेद्याचा लाडू खाऊन मग मी निजेन." चतुर्थीला गणपतीच्या नैवेद्याला लाडू करतात, हें मला माहीत होतें. त्यावर आजीशीं खालील संवाद झालेला आठवतो.

" अरे, पूजेला पुष्कळ उशीर आहे, तोंपर्यंत तूं थोडाच जागणार आहेस ? तुझ्या-साठीं सकाळला मी लाडू ठेवीन."

" आजी, आज उपास कां करतात ग ?"

" आज चतुर्थी आहे, चतुर्थीचा उपास केला म्हणजे गणपतीबाप्पा प्रसन्न होतो."

" आणि मग काय करतो ? लाडू खायला देतो कां ?"

" नाहीं. आपण लाडू करून त्याला नैवेद्य दाखवितों."

" बरं, पण उपास केला म्हणजे तो काय देतो ?"

" तो उपास करणाराला आपल्यासारखा मुलगा देतो."

" सोंडेचा कां ?"

"सोंडेचा कसा ?" कांहींसें त्रासून आजी म्हणाली. "जा, नीज आतां. गणपती बाप्पा देव आहे बरं ? त्याची पूजा केली म्हणजे तो प्रसन्न होतो. व गुणी मुलगा देतो."

"बरं, काल पण बाईला उपास होता ना ?"

"हं. काल शनिवार होता."

"शनिवार केला म्हणजे काय होतं ?"

"शनिदेव प्रसन्न होतो."

"आणि तोहि आपल्यासारखा मुलगा देतो कां ग आजी ?"

"चल. वेडा कुठला !" इतकें आजी बोलत आहे तों कांहींसें घ्यायला बाई तेथें आली तिला उद्देशून आजी म्हणाली—

"मुली, मी येते बरं भाजी चिरायला."

"चिरून घेईन मी आपली !" कांहींसें झणकाऱ्यानें इतकें बोलून बाई तेथून झटक्याने निघून गेली. आजी त्यावर कांहींच बोलली नाहीं. मला वाटतें तिनें माझें शेवटचें वाक्य ऐकलें असावें. "दिवे लागले निज तूं आतां" आजीनें मला म्हटलें पण मला अशी झोंप कोठली यावयाला ? झोंपण्यापूर्वी रोज आजी एखादी तरी गोष्ट सागे व ऐकतां ऐकतांच मला झोंप लागावयाची. तसा आजही मीं तिला आग्रह केला. मी जेंव्हा ऐकत नाहीं असें तिनें पाहिले, तेव्हा मला तिने चिलिया बाळाची गोष्ट सागितली व ती पुरी होत आली तेव्हां झोंपेनें मला घेरल्यामुळें केव्हां माझे डोळे मिटले हें मला कळलें सुद्धां नाहीं.

दुसेर दिवशीं दुपारीं आजी देवसाठीं फूलवाती करीत बसली होती, मी तेथेंच खेळांतल्या गणपतीच्या चित्राची पूजा करीत बसलों होतों; बाई माडीवरच होती; इतक्यात आमची भीमा आली व हलकेच आजीला म्हणाली.

"आई, ही गोष्ट खरी आहे का हो ?"

"कसली ग भिमे ?" आजी जरा आश्चर्यानें म्हणाली व मीहि खेळतां खेळतां भिमी काय सांगते म्हणून ऐकूं लागलों.

"बाई कुठं आहेत ?" इकडे तिकडे पहात भिमानें अगदीं हळूच विचारलें.

"ती वर आहे वाटतं ? पण कायग ? तुला एवढं काय सांगायच आहे ? सांग लवकर पाहूं ?"

"मला बाई भीति वाटते सांगायला !" भिमा भीत भीत म्हणाली.

"हें बघ, तुला कांहीं सांगायचं असलं तर सांग लवकर पाहूं; नाहीं तर जा आपल्या कामाला !" आजी जरा तिच्यावर रागाऊन म्हणाली.

भिमीनें शक्य तितक्या जवळ जाऊन हलकेच कांहीं तरी आजीला सांगितलें. मी थोडया अंतराबर असल्यामुळें मला कांहींचं ऐकूं आलें नाहीं व ऐकूं आलें असतें

तरी अर्थ कळला नसताच. पण तिनें जें कांहीं सांगितलें तें ऐकून आजीचा चेहरा रागानें लाल झाला. भुवया चढवून आजी मोठ्यानें म्हणाली.

"खोटी गोष्ट. अगदींच खोटी गोष्ट. हे कुणाचं तरी तर्कट आहे झालं ! कुणी सांगितलं तुला?" रागानें तिचें अंग कांपत होतें. त्यावर भिमाहि मोठ्यानेच सांगूं लागली.

"मी तळ्यावर धुवायला गेलें होतें ना? तेव्हां तिथं ती रामाच्या देवळाजवळची गिरजाबाई त्या चिमाला सांगत होती."

"आम्हाला जी गोष्ट माहीत नाहीं, ती या गिरजाबाईला कोणी सांगितली? दुसऱ्याच्या घरच्या नसल्या उठाठेवी करायला यांना कसं कांहींच वाटत नाहीं?"

"पण, आपल्या शेजारची ती शीताबाई आहेना? तिनं तिला सांगितलं म्हणे ! शीताबाईकडं ती जेव्हां तेव्हां येते तिची ती मैतरीण आहे ना?"

"या शीताला कुणी सागितलं?" आजी अधिकच रागाऊन म्हणत होती.

"गिरजाबाई म्हणत होती शीताबाईनं आपल्या डोळ्यांनीं पाह्यलं. परवा आवसेच्या दिवशीं रात्रीं बारा वाजतां आपल्या घरासमोरच्या त्या कोपऱ्याच्या पिंपळाखालीं एकदम जाळ झाला. असं ती म्हणत होती म्हणून !"

"पण ही रात्रीं बारा वाजता बाहेर कशाला आली होती आगलावी!" संतापून आजी म्हणाली.

"बाहेर नाहीं आली? तिच्या घराच्या खिडकींत उभी होती, तिच्या मुलाच्या पोटांत दुखत होतं म्हणून ती कायसं औषध ध्यायला आली होती स्वयंपाक घरांत म्हणून तिला तें दिसलं, ती आणखीहि म्हणाली आधी केव्हांसा तिला जाळ दिसला, पण असेल कांहीं असं वाटून ती कुणाला बोलली नाहीं. तसंच रोज रात्रीं कुणी तरी रडत असतं असं तिला आज कधींपासून तरी ऐकूं येतं ! आम्हाला तर कुणाला कधींच कांहीं दिसलं नाहीं, अन् हिलाच कसं दिसलं देव जाणें?"

"भिमे," आजी डोळ्यांत आलेले अश्रु पुसत म्हणाली "तुला तर नाहींना हें खरं वाटत."

"हें काय विचारावं? आई, मला कसं खरं वाटेल हें? अहो, शीताबाईचं हें कांहीं तरी कुभांड आहे सारं झालं!"

"पण एखाद्याचं असं भलतं सलतं उठवावं म्हणजे काय म्हणावं त्याला? त्या शितीनं तिचं डोंबल पाह्यल असेल," एकदम संतापाचा अतिरेक होऊन आजी दांत ओठ खात म्हणाली; पण लागलीच शांत होऊन व डोळ्यांत पुनः आलेले अश्रु पुसून म्हणाली. "भिमे, तिच्यासारख्या देवमाणसावर हे असलं खोटंनाटं उठवणं काहीं चांगलें नाहीं. अग, ती गेल्यापासून कधीं कुणाच्या स्वप्नांत सुद्धां आली नाहीं, कां कधीं आम्हाला या घरांत, कां ती होती त्या खोलींत भीति वाटली नाहीं. आणि ती म्हणे या शीताला आतां दिसूं लागली? किती आश्चर्य?"

"" आम्हाला सुद्धां कधीं भीति कां भय वाटलं नाहीं बरं. " सहानुभूतीपूर्वक भीमा म्हणाली.

" मी आतां त्या शितीची चांगली खरडपट्टी काढते, थांब म्हणावं अशी दुसऱ्याची नसती उठाठेव करायला कुणी सांगितलं आहे हिला ?" रागानेंच आजी म्हणाली. इतका वेळ. दूर बसून मी हें सारें ऐकत होतो; पण मला त्यांतला कांहींच अर्थ कळत नव्हता. मी आजीजवळ गेलो व तिच्या गळ्याला मिठी मारून म्हणालो, " आजी, ही भिमा काय सांगते ग ?" आपल्या मांडीवर घेऊन माझे केस कुरवाळून आजी म्हणाली. " कांहीं नाहीं. तुला काय करायचं आहे ? जा. बाबूकडे खेळायला जायचं असलं तर भिमा पोंचवील तुला. " बाबूचे घर आमच्या घरापासून बरेंच लांब होतें, म्हणून मी एकटा त्याच्या घरीं जात नसे. बाबू मला फार आवडे, तो माझ्या बरोबरीचा होता. त्याचे वडील भाऊंचें मित्र होते व त्याची आई मला फार ममतेनें वागवीत असे. त्यांच्याकडे जेव्हां जावें तेव्हां कांहीं तरी खाऊ हा मिळायचाच ! बाबूला पाहून जसा मला आनंद होई तसा मला पाहून त्याला आनंद होत असे. आमचे दोघांचें फार चांगलें जमत असे. बाबूकडे जाण्याची आजीची परवानगी मिळतांच मला फार आनंद झाला व पुढें विशेष कांहीं न विचारतां कपडे घालून भीमाबरोबर मी बाबूच्या घरीं गेलो. तेथें गेल्यावर बाबूच्या आईने भिमाला कायसें विचारलें, त्यांत जे तुटक संभाषण माझ्या ऐकण्यांत आलें, त्यांतहि भूत, रात्रीं दिसणारा जाळ, सीताबाईनीं पाहिलें, असेंच अर्धवट शब्द मला ऐकूं आले. बाबूला पहातांच तो माझ्याकडे धांवत आला व त्या गडबडींत या दोघींच्या भाषणाकडे माझें बराबर लक्ष नव्हतेंच. आम्ही दोघे तर केव्हांच आमच्या उद्योगांत गढून गेलो !

त्यानंतर एकादशीच्या दिवशीं आजी देवदर्शनाला जायला निघाली असतां मला बरोबर नेण्याविषयीं मी तिला सांगूं लागलों, तेव्हां माझ्यावर जरा खोटा राग आणून आजी म्हणाली. "हं चला, जिथं मी जाईन तिथं तुला आलंच पाहिजे. चंदू, आतां का तूं लहान आहेस अक्षय माझ्या मागंमागं फिरायला. " असे म्हणत म्हणत ती माझे कपडे शोधूं लागली. कारण आमचे कपडे कधींच एका जागेवर नसायचें, एक माजघरांत, एक ओटाणांत एक आणखी कोठे तरी पडलेला असायच. आजीने आमचा सरंजाम शोधून आणला व आम्ही एकदाचे बाहेर पडलो. एकादशीमुळें आज रामाच्या देवळांत बऱ्याच बायकांची गर्दी होती. त्यांत आजीच्या ओळखीच्या किती तरी बाया होत्या, कारण आम्हाला ठिकठिकाणीं उभें रहावे लागत होते, व आजीला प्रश्न करणाऱ्या बायांना " हो, नाहीं, बरं आहे. " असें कांहीं तरी उत्तर द्यावें लागत होतें. रामाला प्रदक्षिणा घालतांना आम्ही जेव्हां रामाच्या मागच्या बाजूला आलो, तेव्हां तेथें दोघी तिघी बायका आपसांत कांहीं तरी हळुहळु बोलत होत्या.

आम्ही त्यांच्याजवळ जाईपर्यंत त्यांना आमचें अगदीं जवळ येणें कळलें नसावें, कारण पुढच्या भागापेक्षां त्या भागांत बराच काळोख होता. आजीनें माझा हात घट्ट धरून ती तेथेंच उभी राहिली. व त्या बायकाचें संभाषण आम्हाला स्पष्ट ऐकूं आलें. त्यापैकीं एकजण म्हणत होती. " खरंच बाई. याचा कांहीं तरी बंदोबस्त नको करायला ?!"

" हो, पण ती सासू करील तेव्हां ना ? ती काय बिचारी सासुरवाशीण; तिचं काय चालतयं घरांत. " दुसरी हेल काढून म्हणाली, त्यावर तिसरी जरा शब्दावर अधिक जोर देऊन म्हणाली.

" पण, असं कांहीं असलं तर नको पाह्यला ? हिचं नको कां चांगलं व्हायलां ? वडीलपणीं सासूनेंच कांहीं तरी उपाय करायला हवा ? अहो, आमच्या ओळखीचा एक चांगला पाहुण्या आहे. त्यानं कित्येकाला गुण दिले आहेत. पैसे बियसे कांहीं घेत नाहीं तो. मी सुद्धां त्याला सांगेन पाहिजे तर ! हो, कुणाचं आपल्या हातून बरं होत असलं तर काय झालं न करायला ? खरं कां नाहीं पार्वतीबाई ? "

" हो बाई ! आपल्या हातून कुणाचं कल्याण व्हावं असं कुणाला वाटणार नाहीं ? पण ज्याला पसंत पडेल त्याचं केललें बरं, नाही तर कशाला कुणाच्या भानगडींत पडा. म्हणतात ना ' धर्म करता कर्म ' आड यायचं नाहीं तर ? "

" तुमचं म्हणणं कांही खोटं नाहीं बाई, लोकांच्या पंचाईतीत आपण पडूंच नाहीं. " इतक्यांत एक बाई जरा पलिकडे उभी होती ती या बायांच्या जवळ येऊन म्हणाली.

" अहो, तुम्ही हें कुणाविषयीं बोलतां ? मलातर यांतलं कांहींच कळलं नाहीं काय ग आई, कोण हें ? "

" तुला कसं कळणार. " पार्वतीबाई म्हणाल्या. " तूं कालच आलीस सासरहून तेव्हां तुला काय ठाऊक. अग, ते विनायकराव वकील आहेत ना त्यांची पहिली बायको आपल्या सवतीला नडते म्हणतात ! म्हणून तर तिची बिचारीची मुलं जगत नाहींत. इतक्या दिवस सवतीलाच नडत होती, कोणाला दिसत नव्हती, पण आता तर रात्रीची साऱ्या घराभोंवती फिरते, व सर्वांना दिसते म्हणे ? तिचा तरी जीव कां गुंतू नये बरं, असं सोन्यासारखं घर अन् मुलगा टाकून गेली, चांगली होती बिचारी ! " आपणास वाईट वाटत आहे असा आव आणून पार्वतीबाई म्हणाल्या. इतका वेळ आजी स्वस्थ उभी राहून हें सारें ऐकत होती. त्यापैकीं एकीचें लक्ष आजीकडे जाऊन त्यांना गप्प रहाण्याला ती खूण करूं लागली.

" हं, चालूं द्या तुमचं " आजी अगदीं शांतपणें म्हणाली. त्या बाया आजीच्या या बोलण्यानें अगदीं थंड पडून गेल्या. आतां कांहीं तरी बोललें पाहिजे असें जाणून पार्वतीबाई आजीला उद्देशून म्हणाल्या.

" ही आम्ही आपली गप्प ऐकली आहे. खरं खोटं देवाला माहित, बाकी एखादी गोष्ट प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिल्या खेरीज माझा काहीं भरवंसा बसत नाहीं अशा गोष्टीवर ? पण असं कांहीं असलं तर चांगला बदोबस्त करावा नाहीं का?"

" पार्वतीबाई, माझी लक्ष्मी खरंच अगदीं लक्ष्मीच होती; ती म्हणजे मेल्यावर कुणाला त्रास देईल असं स्वप्नांत देखील यायला नको ! तिला जाऊन आज सहा वर्षें झाली ती कध्धीं कध्धीं कुणाच्या स्वप्नांत सुद्धां आली नाहीं, अन् ती आतांच कशी सगळ्याना दिसते व नडते ? हें मला काहींच कळत नाहीं ? मी या आठ दहा दिवसांत ज्याच्या त्याच्या तोंडीं आपलं हें ऐकते; जर ती भूत झाली असं तुम्ही म्हणता, तर इतकें दिवस ती कुणाला कशी दिसली नाहीं ? अन् आतांच कशी सर्वांना दिसूं लागला ? "

"आम्हाला तरी काय माहित ? मी तरी तेंच म्हणते पण ज्याच्या त्याच्या तोंडून असंच ऐकते आहे आपलं ? लक्ष्मी म्हणजे किती गुणाची होती, हें काय कुणाला माहित नाहीं ? बिचारी ती स्वर्गीं सोन्याची झाली, आपलं अहेवपण जिंकून गेली ! तेव्हा तिचा जीव मागें गुंतावा हें नवल नाहीं ? " पार्वतीबाई इतकें बोलून निघून गेल्या. त्यावर कांहीं न बोलतां दुसऱ्या बायकाहि एकएक गेल्या. आजी मात्र तेथें माझा हात धरून उभीच होती. तिने एक दीर्घ निःश्वास सोडलेला मी ऐकला ! त्यानंतर कांहीं न बोलतां आम्ही देवळातून बाहेर पडलों व आजी मला अगदीं ओढतच रस्त्यानें चालली होती. घरीं आल्यानंतर ती हातपाय धुऊन देवखोलींत गेली व देवापुढें हात जोडून किती तरी वेळ बसली होती; तिच्या डोळ्यातून एकसारखी पाण्याची धार वहात होती. ती कां रडते हे मला कांहीं समजलें नाहीं ! कित्येक प्रसंग असें असतात कीं ते पुष्कळ काळापूर्वी घडून गेले असले तरी ते कालपरवाच घडले असावे असे ताजे वाटतात, व त्याचे स्मरण हृदयात कायमचें टिकून रहातें ! तसाच हा एक प्रसंग होता. त्या वेळीं माझे वय जरी लहान होतें तरी हा देवळांतला संवाद माझ्या हृदयावर कायमचा राहिला ! तेव्हां मला त्यांतला कांहींच अर्थ कळला नसला तरी आतां तो चागला कळून आला ! लहान मुलाना भूताची फार भीति वाटत असते, भूतें फार वाईट असतात अशी त्याची समजूत असते. वाईट माणसेंच मेल्यावर भुतें होतात हें मला लहानपणीं माहीत होतें तेव्हां माझी आई भूत झाली आहे, असें ऐकून मलाहि वाईट वाटले ! माझी आई वाईट होती कां ? ती कशी होती ? भूत झाल्यावर ती कशी दिसत असेल? असें नानाप्रकारचें विचार माझ्या बालअंतःकरणात उद्भवत असत ! भूताच्या रूपानें तरी तिला एकदा पहावें असें मला फार वाटे !



## स्मृति तिसरी

# माता व पुत्र.



शेजाऱ्यापाजाऱ्यापासून आमच्या घरच्या नोकर चाकरापर्यंत सर्वांच्या तोंडून त्या दिवसांत मी दररोज कांहींना कांहीं तरी भूताच्याच गोष्टी ऐकत असें. ते भूत दुसरें तिसरें कोणी नसून प्रत्यक्ष माझी आईच आहे असे मला कळलें होते. भूताचे नाव ऐकतांच लहान मुलें व मोठीं माणसेंहि घाबरतात! मी कांहीं मोठा शूर नव्हतो. एखाद्या मोठ्या जंगी जटाधारीला खळऽ खळऽ चिमट्याचा आवाज करीत 'आऽऽलक बावाजींचा पुकार करतांना ऐकून आमची घाबरगुंडी उडून आम्ही असेल नसेल तेवढी शक्ति एकवटून यशस्वीरितीनें मागे पळ काढून आजीच्या आश्रयाला धांवत असूं! माझी आई भूत झाली आहे व ती सर्वांना दिसते, हें ऐकून मला कधीच भीति वाटली नाहीं! भूताचे नांव ऐकतांच मला भीति वाटत असे, परंतु माझ्या आइ-संबंधीं मला तशी भीति कधीं वाटली नाहीं. उलट भूत कां होईना, तशी तरी ती आपल्याला भेटावी अशी माझी फार इच्छा होती, पण ती कधीच तृप्त झाली नाहीं!

रविवार असल्यामुळें कोर्टाला रजा होती, पण भाऊंना सगळे दिवस सारखेच असत; रजेंत देखील त्यांना विश्रांति किंवा स्वस्थपणा मिळत नसे. घड्याळांत बाराचे टोले पडले, तेव्हां भाऊ स्नानाला उठले. ते जेवायला बसले, तेव्हां आजी तेथे दिसली नाहीं म्हणून त्यांनीं तिची चौकशी केली असावी; कारण जेवून उठल्यानंतर विडा खाण्यापूर्वींच ते आजी निजली होती तेथे आले. गेल्या रात्रीं आजीला बराच ताप आला होता व ती सकाळीं उठली नाहीं. मीहि तिच्याजवळ बसून कोठे तिचे डोकें चेप, कोठें पाय चेप अशी उगाच कांहीं तरी लुडबुड करीत होतों. माझें सारे जग काय तें आजी; तिला ताप आल्यावर मी दूर कोठचा जाणार! येरव्ही भाऊ येताच मी पळ काढला असतां, पण आज मी तेथेंच बसून राहिलों.

"आई, तुला केव्हां ताप आला? मला आतांच कळलें तुला ताप आला म्हणून?" भाऊ आजीजवळ बसून म्हणाले.

"रात्रीं जरा अंग कणकणून आलं. ताप फार नाहीं. म्हटलं सकाळीं उतरेल." आजी म्हणाली. त्यावर भाऊंनीं तिच्या कपाळाला हात लावून पाहिला व ते म्हणाले.

"थोडाकां ताप आहे हा? वः, आई, इतका ताप असून तूं मला कसें कळवलेस नाहीं? या धंद्यामुळें मला तर बिलकुल वेळ मिळत नाहीं बुवा! एखाद वेळीं अगदीं कंटाळा येतो. सकाळींच मी वैद्याला बोलावून आणलें असतेना? स्वयंपाक घरांत आज जेव्हां तूं दिसली नाहींस, तेव्हा मी चौकशी केली तर तुला ताप आल्याचें कळलें. आतां वैद्याला बोलावणें पाठवितों."

" अंह्, वैद्याबिद्याला बोलावण्याची कांहीं जरूर नाहीं. मला जराश्यानं बरं वाटेल. इतका कांहीं ताप नाहीं. म्हणून तर तुला नव्हतं सांगितलं.

" छे, बराच ताप आहे. वैद्याला दाखवावें हें चांगलें, मग जास्त झाल्यावर–"

मध्येंच आजी म्हणाली. " अरे, मला कांहीं जास्त होणार नाहीं बाबा ! तूं बिलकूल काळजी करूं नकोस.आमच्या सारख्या बिनखपाच्या माणसांना कांहीं व्हायचं नाहीं, आम्हाला म्हाताऱ्या माणसांना काय होणार आहे ! आतां मला बरं वाटले, " म्हातारीच्या डोळ्यातून दोन अश्रु बिंदु पडले.

" पण आई, मला तुझा खप आहे ना? निदान याला तरी तुझा खप आहेना?" माझ्याकडे पहात भाऊ म्हणाले. त्यानीं माझ्याकडे पहाताच मीं आजीच्या डोक्या-जवळ उशींत डोकें खुपसलें माझ्या अंगावर प्रेमाने हात फिरवून आजी म्हणाली.

" त्याचंहि काय आडणार आहे. माझ्याशिवाय ! त्याला एकदिवसाचा टाकून त्याची आई गेली, तरी त्याचं आयुष्य होतं म्हणून तो एवढा मोठा झाला. आतां माझ्यामागं तुम्ही त्याचे हाल कां करणार आहांत. माझे म्हातारीचें डोळे तुझ्या देखत लवकर मिटतील तर चागले या काळांत. " आजीचे ते शब्द ऐकून मी स्फुंदून रडायला लागलों. जसें कांहीं आजीनें खरेंच डोळे मिटले व मी या जगांत एकटा राहिलों. त्यावर भाऊ म्हणाले.

" हें बघ, तूं असें म्हणताच हा रडूं लागला. तेव्हा तूं आतां असें कांहीं म्हणूं नकोस व आपल्या आत्मारामपंताचे औषध घ्यायला कबूल हो कशी ! आता मी त्याना बोलावयला पाठवितों. "

" अरे चंदू, वेड्या, मी काहीं आजच मरत नाहीं बरं, चल ये माझ्याजवळ असा पाहूं ? ताप आला म्हणजे कुणी मरत नाहीं बरं ! तें तर मी उगच म्हटलं कांहीं तरी आपलं ! " असें म्हणून आजीने मला आपल्या पुढ्यांत घेतलें व मीहि तिला घट्ट मिठी मारून तिच्या जवळ निजलों. भाऊनीं एका गड्याला आत्मारामपंतांना बोलवायला पाठविला व वैद्य येई पर्यंत ते तेथेच बसले. माझें स्फुंदणें कमी झाल्यावर आजी भाऊंना म्हणाली.

" भाऊ, तुला एक विचारीन म्हणतें पण– "

" काय ? पण काय ? तुला काय विचारायचें तें विचार ना ? तूं असें काय म्हणतेस ? तुझ्या मनाप्रमाणें तूं कांहीं केलेंस तर तुला मी ना म्हणेल कां ? " किंचित् हंसून भाऊ म्हणाले.

" तूं नाहीं म्हणणार नाहीं रे, पण तुला पसंत पडेल कीं नाहीं. "

" मला पसंत न पडण्यासारखें असें काय आहे ? "

" दुसरं कांहीं नाहीं. म्हटलं या गंगाबाईला कोणाला तरी दाखवून पहावं असं वाटतं. "

“ कोणाला दाखवायचें आहे ? ” आश्चर्यानें भाऊ म्हणाले.

“ तिला कसली नडबिड कांहीं असली तर एकाद्या चांगल्या देवऋष्या– ”

“ छे, छे, आई, हेंच कां तूं विचारणार होतीस ? कसला देवऋषि आणि कसलें काय ? आपल्याला हें बिलकुल पसंत नाहीं बुवा ? हें कोणी तुला सांगितलं ? तुम्हां बायकांना आपली ही सवंयच आहे, जरा कांहीं झालें कीं भूतेंन् देवऋषि. मला तें कांहीं खरें वाटत नाहीं. ”

“ अरे, सारं खरं नसलं तरी आपण आपल्याकडून उपाय करून पहावा. त्यांत काय आपलं जातं. ”

“ अ–हं. माझा कांहीं या गोष्टीवर विश्वास नाहीं व मी माझ्या घरांत तसल्या भोंदू लोकांना मुळींच शिरूं देणार नाहीं. आपल्या घरांत कोणाला कांहीं झालेले मला तर माहित नाहीं ! कोणाला भूत बित लागलेलें मीं तर पाहिलें नाहीं ! मग या देवऋषींची काय जरूर आहे बुवा ? ”

कांहींशा थट्टेच्या स्वरांत भाऊ हें वाक्य बोललें. बहुतेक ते बाईला उद्देशून म्हणाले असावे ? कारण पलिकडच्या खोलींत दाराच्या आड बाई ऐकत उभी असावी असें वाटतें. भाऊंची दाराकडे पाठ होती, तरी बांगड्यांच्या आवाजावरून तेथें कोण असावें याचा त्यांनीं तर्क केला असावा.

“ हें पहा, भाऊ ” आजी माझ्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली. “माझ्या चंदूला बहिणभावंडं असावी असं मला वाटतं. दोन पोरं पाठोपाठ गेली; आज असतीं तर मुलगा चांगला तीन वर्षांचा असता. ”

“ पण आई, ती गोष्ट आपल्या हातची कां आहे ? ज्याला परमेश्वर जगवणार नाहीं त्याला, तुमचे हे देवऋषि जगवणार वाटते ! ज्याला संतती नाहीं, त्याला संतति देणार, ज्याचीं मुलें जगत नसतील त्याला प्रजापति करणारे ! परमेश्वराची तरी कशाला आपण पूजाअर्चा करावी ? या देवऋषींची करावी म्हणजे झालें ! ते सांगतील तसें नाचावें व मागतील तितके पैसे द्यावे म्हणजे काम फत्ते ! परमेश्वर देईल त्यांत सुख मानावें झालें. एक आहे तेवढा बस्स झाला. विनाकारण भाऊबंदकी नको. आपल्याजवळ कुठें आहे एवढी संपत्ति तर भागीदार पाहिजेत ? ”

भाऊ हंसत हंसत म्हणत होते, पण दाराआडून एक अस्फुट हुंदका ऐकूं आला.

“ असं काय बोलतो रे ! तुला आहे मुलगा पण तिला नको कां ? ” आजी म्हणाली.

“ मग हा नव्हे वाटतें ? हा सावत्र, असें. हो, हो. पाहिजे जरूर पाहिजे. देवऋषि प्रसन्न होऊन देणार वाटतें ? पण त्यांच्या तपःश्चर्येनें मिळत असला तर नको. ” अद्यापिहि भाऊ थट्टाच करीत होते. आजीच्या देखत इतकी थट्टा करतांना मी आजच त्यांना पाहिलें ! बाईसंबंधीं किंवा मुला संबंधीं ते आजीच्या देखत कधींच बोलत नसत,

" अरे भाऊ, देवऋषि कसलीं मुलं देतात, तूं आपला कांहीं तरी बोलतोस झालं, कुठं कांहीं नडाबिड देवाधर्माचीं भूताखे-" तिला थांबवून भाऊ म्हणाले.

" हं! आई, माझ्या कानावर जी गप्प आली ती तुला सुद्धां खरी वाटते कां? भूतें असतील जगांत पण ही गोष्ट संभवनीय आहे कां? छे! माझा विश्वास बसणार नाहीं या गोष्टीवर?"

आतां भाऊंचा चेहरा गंभीर झाला व तितक्याच गंभीरपणानें वरील वाक्य बोलून त्यांनी लांब सुस्कारा सोडला! आजीनेंहि चटकन आपल्या डोळ्याला पदर लावून अश्रू पुसून टाकले. भाऊंचा स्वभाव असा होता कीं, जी गोष्ट त्यांना पसंत नसे ती त्यांच्या घरांत कोणी केली तर त्याना ती खपत नसे. भूतासंबंधींच्या गोष्टी जरी बऱ्याच पसरल्या होत्या, तरी त्यासंबंधीं भाऊसमक्ष बोलण्याची कधीं कोणाला छाती झाली नाहीं.

" नाहीं, मला खरं वाटत नाहीं पण-" आजीचें वाक्य पुरें होण्यापूर्वीच वैद्य बोवानें खोलीत प्रवेश करून " कां, कसें आहे? प्रकृति आजारी आहे वाटतें? केव्हा पासून ताप आला?" असें म्हणत आजीजवळ बैठक ठोकली. भाऊंचें व आजीचे बोलणे तसेंच अर्धवट राहिलें. मला वाटते त्यानंतर त्या मातापुत्राचें एकत्र बसणें व संभाषण पुनः झाले नाहीं? पुढे आजी दीड दोन वर्षे जिवंत होती, पण भाऊंनाच वेळ मिळत नव्हता, कां, आजीच फारशी बोलायला गेली नाहीं, तें मला नीटसें आठवत नाहीं. पुढें जें एक कारण झालें तेंहि त्याच्या मुळाशीं असेल कदाचित्! आजीचा ताप विषारी नव्हता. तिला दोन दिवसांनीं बरें वाटलें व ती पूर्वीप्रमाणे घरांतील आपली कृत्यें करूं लागली. स्वस्थ एके जागीं बसलेलें आजीला कधींच आवडत नसे. सारा दिवस तिचा कांहीं ना कांहीं तरी उद्योगांत जात असे, ती फारशी झोंप सुद्धां घेत नसे; व रिकामपणा तर तिला माहीत नव्हताच. दुपारच्या वेळीं ती कसलीना कसली तरी पोथी वाचीत असे, आणि त्यांतल्या गोष्टीं मला रोज रात्रीं सांगत असे. तिची स्मरणशक्ति फार चांगली होती, तिनें मला ज्या गोष्टी सांगितल्या त्या कायमच्या माझ्या स्मरणांत राहिल्या, व बरेंच मोठेपणीं जेव्हां मीं स्वतः वाचून पाहिल्या, तेव्हां त्यांतली दरएकाचीं नांवे व वर्णनें जशी होतीं तशीच तिनें सांगितलेलीं मला आठवतांत. आमच्या समोरच मुनसफाच्या येथें रोज संध्याकाळीं घरगुती शाळा भरत असे, म्हणजे एक वृद्ध पंतोजी मुनसफांच्या मुलांना व आसपासच्या मुलांनाहि त्यांच्या ओटीवर बसून शिकवीत असत, भाऊंच्या सांगण्यावरून मीहि माझी पाटी घेऊन तेथें शिकावयास बसत असें. एके दिवशीं आमचे मास्तर कांहीं पौराणिक गोष्ट सांगत होते; ' हिंदुस्थानाला भरतभूमि कां म्हणतात, म्हणून त्यांनीं सर्व मुलांना प्रश्न केला, पण कोणालाच उत्तर देतां आलें नाही. कोणी बोलत नाहीं असें पाहून मी म्हणालों, " भरत नांवाच्या दुष्यंत राजाच्या मुलाच्या नांवावरून भरतभूमि हें नांव पडलें." त्यावर मास्तरांनीं मला शाबासकी दिली व फार हुशार मुलगा म्हणून माझी

वाखाणणी केली. ते इतर मुलांना म्हणाले कीं, हा तुमच्याहून लहान असून त्याला सांगतां आलें, पण तुम्हांला कोणाला सांगतां आलें नाहीं. त्यावेळीं माझी छाती गर्वानें फुलून बरीच पुढें आली. वास्तविक भरताची गोष्ट आजीनें मला आदले रात्रींच सांगितली होती. म्हणून ती माझ्या लक्ष्यांत होती, त्या काळीं आजीसारख्या वृद्ध स्त्रियांना फारसें वाचतां लिहितां येत नव्हतें. पण आजीला चांगले घडघड वांचतां येत असे. रोज तिसरें प्रहरीं कांहीं स्त्रिया तिच्याजवळ पोथी ऐकावयाला येऊन बसत असत.

---

## स्मृति चवथी.

# आजीचा मृत्यु.



कित्येक गोष्टी अशा असतात कीं, त्या आपल्या अगदीं बालपणीं घडल्या असल्या तरी त्याचें स्मरण आपणास चांगलें रहाते. कित्येक प्रसंग तर बिलकुल महत्वाचें नसतां देखील लक्षांत ठळकपणें राहून जातात. साधारणपणें चारपाच वर्षे वयापासून ठळक ठळक गोष्टींचें आपणांस चांगलें स्मरण रहातें, असें माझ्या अनुभवावरून मला वाटते. लहानपणीं बालकांची वृत्ति हंसण्या खेळण्याकडे विशेष असते, व काळजी म्हणजे काय पदार्थ आहे याची कल्पनाहि नसते. परंतु कित्येक प्रसंग असे असतात कीं अगदीं अज्ञान बालकाला गंभीरपणा येऊन आपण पुढें काय करावे असा विचार पडतो. माझ्या बालपणच्या ज्या गोष्टी माझ्या लक्षात अद्यापिहि ताज्या राहिल्या आहेत, त्याबद्दल माझें मलाच आश्चर्य वाटतें कीं, त्या अगदी जशाच्या तशाच कशा मला आठवतात? कित्येक तर मुळींच महत्त्वाच्या नाहीत, परंतु त्या जशा माझ्या मनांत येत गेल्या व मला आठवत गेल्या तशा मी लिहून काढल्या आहेत. माझ्या आयुष्यांत कसकसा बदल होत गेला त्या विषयींच मी आतां लिहिणार आहें. भाऊंचा आणि आजीचा संवाद झालां तें मी लिहिलें आहेच. आजीला नासधूस झालेली अगर विनाकारण बसून चकाट्या मारणें मुळिच आवडत नसे. ती स्वतः पुष्कळ काम करीत असे आणि बाईलाहि म्हणत असें कीं, 'हें संसाराचं काम तुझं आहे, तेव्हां तूं आतां चांगलं लक्ष पुरवून काम केलं पाहिजे, बाई काम करीत नव्हती असें नाहीं, पण ज्या बाबतींत अवश्य लक्ष्य पुरविले पाहिजे तिकडे ती फारसें लक्ष्य देत नसे. संसाराच्या अगदीं बारीक सारीक कामाकडे आजीलाच लक्ष्य पुरवावें लागत असें. भाऊंनीं शेतीभाती बरींच घेतली असल्यामुळें वर्षाला लागणारा दाणादुणा आमच्या शेतीचाच येत असे. दाणा घरीं आला म्हणजे तो नीटनेटका करून त्याची

व्यवस्था करून ठेवणें आजीलाच करावें लागे. त्या दिवसांत आजीला बिलकुल विश्रांति मिळत नसे. हें निवड, तें भर, तें भरडून ठेव, त्याला ऊन्ह देऊन ठेव वगैरे वगैरे तिला किती तरी करावें लागे.तसेंच ढोरागुरांचेंहि पहावें लागत असे. हीं सर्व कामें करायला नोकर होते; परंतु नोकर लोकांवर सर्व कामें सोंपवून आपण तिकडे मुळींच न पहाणें तिला पसंत नव्हतें. तिचें म्हणणें असें कीं, आपल्या सारखें काळजीनें नोकरलोक कामें करीत नाहींत, प्रत्येक बाबत आपण स्वतः पाहिलीच पाहिजे. कोठें नासधूस झाली ती आपणास कळते व नोकरांवर वचक बसून तें कामें चांगलीं करतात. ती कोणावर विनाकारण रागावत नसे, पण ज्याचा दोष असेल त्याला रागें भरत असे. प्रत्यक्ष भाऊंच्या हातूनहि जर एखादी चूक झाली, तर ती त्यांनाहि सौम्य शब्दांनीं रागावत असे. नोकरांना रागावयाचें झालें तरी सौम्य शब्दांतच रागावत असे. कोणाच्या अंगावर फार मोठ्यानें ओरडतांना मीं तिला कधींच ऐकलें नव्हतें. जी गोष्ट भाऊंना पसंत नसेल, ती त्यांना विचारल्याशिवाय ती कधीं करीत नसे. आपण वडील आहोत मुलाला काय विचारायचें असें वाटून ती कोणतीच गोष्ट करीत नसे. आजोबाच्यावेळेस ती जशी आपल्या मनाप्रमाणें वागत होती, तशी आतां वागत नसे; तिचा स्वभाव फार मानी होता. भाऊ तिला कधीं काही बोलत नसत, उलट कोणत्याहि कामांत तिचा विचार घेतल्या खेरीज ते ते काम करीत नसत. ती कांहीं वावगें करणार नाहीं याबद्दल त्यांना पूर्ण खात्री होती. तिची सल्लामसलत घ्यायला किती तरी मंडळी येत असत. त्यावेळच्या हुशार बायकात तिची गणना होत होती.

आपल्या मुलाच्या संसाराची नासधुस न होण्याबद्दल गेल्याबद्दल आजी फार काळजी घेत असे. ती बाईलाहि वारंवार सांगे कीं, " संसारांत चांगलें लक्ष देऊन काम करावे, संसार हा सुईच्या अग्रासारखा बारीक आहे व उधळला तर मुसळासारखा आहे. माझा संसार होऊन गेला, मला आतां काय करायचं आहे? तुनं तूं पाहिलं पाहिजे." परंतु बाई तिकडे विशेष लक्ष देत नसे. जेवढें काम आजी सांगे तेवढेंच ती करी. तिला साधारण वाचतां लिहितां येत असें, तसेंच गळपट्टा विणणें, सुताचा रुमाल विणणें वगैरेहि देत नसें. विणावयाला शिकण्याच्या निमित्तानें आमच्या शेजारीं रहात असलेल्या सीताबाई ( ज्याना माझ्या आईचें भूत दिसत होतें त्या ) अलीकडे आमच्या बाईकडे रोज येत असत. बाईहि केव्हां केव्हां त्यांच्या घरीं जात असे. पुढें पुढें त्यांची इतकी मैत्री जमली कीं, दुपारचीं जेवणें होऊन भाऊ पुढच्या दारानें कोर्टांत जायला निघाले कीं, सीताबाई मागच्या दारानें आंत आल्याच. जेमतेम बाईचें खरकटेउष्टें आटोपलें कीं, त्या वर माडीवर जाऊन बसत त्या पांच वाजतां भाऊंची घरीं यायची वेळ होईपर्यंत बसत. एके दिवशीं सीताबाई संध्याकाळीं घरीं गेल्यावर आजी बाईला म्हणाली.

" अग, गंगाबाई ही शीताबाई अकरा वाजले नाहीं तर रोज येऊन बसते;

ब्रिला आपल्या घरीं कांहीं कामं आहेत कां नाही. तिची नणंद आहे तिला काम करायलाँ म्हणा; पण इथं तुलाहि कांहीं काम करूं देत नाहीं ! हो, कुणी येऊन बसलं म्हणजे माणसांनीं काम तरी कसं करावं ? वालबिल आतां निवडून ठेवले पाहिजेत. अजून डाळीडुळी व्हायच्याच आहेत. एक एक हळूं हळूं करतां करतां आतां हे दिवस निघून जातील" त्यावर बाई कांहींच बोलली नाहीं. दुसऱ्या दिवशीं नित्य नियमाप्रमाणें सीताबाई जेव्हां जावयास निघाल्या. तेव्हां आजीला ऐकूं जाईल एवढ्या मोठ्या आवाजानें बाईला म्हणाल्या.

"गंगाबाई, मी उद्यापासून येणार नाहीं हो तुमच्या घरीं ! माझ्यामुळं तुमचं काम रहातं ! म्हटलं एवढा नवीन टांका शिकून घेतला असता एकदां म्हणजे झालं, पण माझं तुमच्या घरीं येणं पसंत नाहीं तेव्हां न आलेलं बरं."

बाहेर अंगणांत वाळत घातलेली डाळ आजी गोळा करीत होती, मीहि माझ्या मनीमांजरीच्या पिलाला दोन्ही हातांत घट्ट धरून तेथेंच उभा होतों. सीताबाईचे शब्द आजीनें ऐकलें होते, ती त्यावर सीताबाईला शांतपणें म्हणाली.

"सीताबाई, तूं येऊं नको असं मी कांही म्हणत नाहीं. काल मी गंगाबाईला म्हटलं तिनं तुला सांगितलं म्हणून तुला राग आला असेल, पण हे कामाचे दिवस आहेत तेव्हां कामं तर झाली पाहिजेत ना ? मी एकटीनं किती करावं ? तुम्ही बरो-बरीच्या आहांत, तेव्हां एके ठिकाणी बसायबोलायला कां नाहीं म्हणतें."

"मी कांही उगाच चकाट्या पिटायला नव्हते आलें. शिकायला आलें होतें. नाहीं शिकले म्हणून कुणाचं अडतंय थोडंच." सीताबाई फणकाऱ्यानें एवढें बोलून चालत्या झाल्या. आजी कांहींच बोलली नाहीं. खरोखरीच त्यानंतर दोन चार दिवस सीताबाई आमच्या येथें आली नाहीं. सीताबाई आमच्या शेजारी रहात म्हणून वर आलेंच आहे. त्यांची विहिर आमच्या कुंपणाजवळ होती. सीताबाई आमच्या घरून गेल्यानंतर दोन तीन दिवसांनीं सकाळीं माझा मोत्या (मनीचे पिलूं) माझ्या हातून निसटून कुंपणांत दडून बसला, त्याला शोधीत शोधीत मी तेथें गेलों तों सीताबाईच्या विहिरीवर पुढील संवाद मला ऐकूं आला. सीताबाई एका बाईला सांगत होती.

"अहो, त्या म्हातारीला आमचं एके ठिकाणी बसणं बोलणें सुद्धां खपलं नाहीं एक सून मेली तरी दुसरीला चैन पडूं देत नाहीं. सारा दिवस आपली कटकट कटकट चाललेली असते. सून चांगली म्हणून ऐकून घेते माझ्यासारखी तर कधीं ऐकून घ्यायची नाहीं. ऐकून तरी किती घ्यायचं त्याला कांहीं सीमा! कुठं मी घटकाभर जात होतें तिच्याकडं तेंहि पहावलं नाहीं!" त्यावर जिच्याशीं त्यांचा संवाद चालला होता ती स्त्री म्हणाली. " पहिल्या सुनेला तर कधीं कांही बोलत नव्हती म्हातारी, त्या सासूसुनांचं तर चांगलं बनत होतं."

"हो. ती सून लाडकी होती. ही आपली गरीब आहे म्हणून तिच्या भंवती

कटकट व त्रास. ती म्हणे फार शहाणी होती, फार सज्जन होती, पुष्कळ काम करीत होती. ही वाईट कां आहे ? पण हिनं कांहीं केलं तरी तें वाईटच म्हणायचं. या म्हातारीला आतां हें कांहीं शोभत नाहीं. तिचा संसार घरकार-भार तिच्या हातांत द्यावा. ती करेल आपोआप, हिनं कशाला सगळ्यांत लक्ष घातलं पाहिजे, स्वस्थ देवाचं नांव घेत बसावं. सुनेला काहीं करतां कां येत नाहीं. ती काय? आता लहान कां आहे. तिला सारं कांहीं कळतं पण या बयाच्या कटकटीमुळं ती क-शांतच लक्ष घालित नाहीं. आपला संसार स्वतंत्रपणानं करावा असें तिला वाटत न-सेल कां? चला बाई मला काम आहे घरात लोकांच्या उठाठेवी आपल्याला कशाला?''

हें सर्व आजीला उद्देशून त्या बोलत होत्या, तें माझ्या तेव्हांच लक्षांत आलें. आजीला जाऊन सांगावे, असें माझ्या मनात येऊन तेवढ्यासाठीं मीं धांवत घरांत गेलोहि, पण आजी सोवळ्यांत स्वयंपाक करीत होती व बाई तेथेंच कांहीं तरी करीत होती. बाईच्या समक्ष सीताबाईची कागाळी करण्याचें मला धैर्य झालें नाहीं; व ती गोष्ट तितकीच राहिली.

एकदा आजीनें बाईला सांगितलें. '' गंगाबाई, मी देवपूजेला जाते. चुलीवर लोणी कढायला ठेवलं आहे, इकडे लक्ष असूं दे. कढलं म्हणजे उतरून ठेव. '' इतकें सांगून आजी देवघरांत पूजेला गेली. त्या दिवसात मी बहुतेक स्वयंपाकघर, देवघर, किंवा आंगण जेथें आजी काहीं काम करीत असें तेथेंच असायचा. आजी पूजेला बसली मीहि तिच्यामागें दारांत बसून मला जेंवढे अंक येत होते, तेवढे मोजित बसलो. मधून मधून आजीला प्रश्न करीत होतो, '' देवाची पूजा केली म्हणजे काय होतं, हा देव कोण ? या देवाला काय म्हणतात ? ते कुठं रहातात, खातात काय निजतात कुठं ? वगैरे कांहीं तरी विचारून आजीला त्रास देत होतो. माझ्या काहीं प्रश्नांचीं आजी उत्तरें देई, मधून मधून माझ्या भलभलत्या प्रश्नामुळें रागावत पण होती; माझी मात्र एकसारखी टकळी चाललीच होती. इतक्यांत विस्तवावर तूप साडून वास येतो तसा वास येऊं लागला. तेव्हां चुलविर ठेवलेलें लोणी उतास येऊन चुलींत पडत असावें, असें वाटल्यावरून आजी पूजा तशीच टाकून घाईघाईनें स्वयंपाकघरांत आली, पहाते तों बरेंच लोणी भरभर चुलींत सांडत आहे व तुपाच्या संयोगानें **अग्नी-देव प्रसन्न होऊन** जाळ छपरापर्यंत जाऊन भीडला आहे ! चलाखी करून आजीनें प्रथम तुपाचें पातेलें खालीं उतरलें व जाळावर पाणी टाकलें. थोड्यांत चुकलें नाहीं तर तें दिवशीं घर जळण्याचीच पाळी आली होती. स्वयंपाकघराचें छप्पर ठेंगणें होतें व चुलीचा जाळ अगदीं छपरापर्यंत भिडला होता. '' गंगाबाई, अग गंगाबाई ! '' आजीनें हांक मारताच बाई तेथें आली. तिला आजी जरा रागानेंच म्हणाली. '' अग, कुठं गेली होतीस, इथं लोणी कढत होतं तें पाह्यला सांगितलं होतं ना तुला ? ''

'' कुठं नाहीं इथंच होते. '' साळसूदपणानें बाई म्हणाली. परंतु ती मागच्या दारीं सीताबाईशीं बोलत असावी. कारण सीताबाईला घाईघाईनें जाताना मी पाहिलें.

ती आतांशीं आमच्या घरीं जरी येत नव्हती; तरी आजी इकडे तिकडे असली कीं, उभ्या उभ्या चार दोन शब्द बोलून झपाट्यानें जातानां तिला मी कित्येक वेळां पाहिले होतें. मग बाईशीं तिचें एवढें काय हितगुज चालें तें मला माहीत नव्हतें.

" इथंच होतास ? " आजी जरा स्वर चढवून म्हणाली. " तूप जळायला लागलं म्हणून पूजा करतां करतां मी धावत आले, तेव्हां तर तूं इथं नव्हतास. येवढ्यां थोरल्या तुपाचा नास झाला आणि घर पेटतापेटतां राह्यलं, घटकाभर मला यायला उशीर होता, तर खात्रीनें घर पेटलं असतं ! खरंच बाई अलीकडच्या मुलींचं घरांत मुळींच लक्ष नाहीं अगदीं ! काल त्या डाळीचं असंच केलं, सारी गाईनं खाल्ली. आज घर जळायची पाळी आली ! आतां तुला आपला संसार कळत नाहीं कां ? मला कशाला हवी आतां ही काळजी न यातायात ! तुम्ही पहात नाहीं म्हणून मला जिथं तिथं डोकें खुपसावं लागतं ! अशावरून बोललं म्हणजे सासू वाईट ! " आजीच्या बोलण्याने बाईचे नाकडोळे लाल झाले. तिने आजीला कांहीं उत्तर दिलें नाहीं, पण त्या दिवशीं ती जेवली नाहीं व एकसारखी रडत होती. आजीनें पुष्कळ आग्रह केला पण ती संध्याकाळीं सुद्धा अन्नाला शिवली नाही. भाऊंना ही हकीकत माहित नव्हती. त्या दिवशीं कोर्टांतून ते पुष्कळ उशीरा आले व बऱ्याच रात्रीपर्यंत काम करीत होते.

दुसऱ्या दिवशीं भाऊ जेवावयास पाटावर बसले होते व बाई वाढीत होती; परंतु अद्यापि तिचें नाकडोळे लालच होते. आजी चुलीजवळ बसली होती. जेवतां जेवतां भाऊ आजीला म्हणाले.

" आई, काल काय झालें ग ? "

" काय झालं ? " भाऊ कशाबद्दल विचारतात हें न कळून आजीनें विचारलें.

" अग, कसली तुपाची आणि कसली भानगड झाली ? मला पुरतें ठाऊक नाहीं पण काल कायसें तूप जळालें अशीं मी गोष्ट ऐकली." भाऊंचे हे शब्द ऐकून बाई अधिकाधिकच सूं सूं करूं लागली. त्यावर आजी स्वयंपाकघराच्या दाराजवळ येऊन म्हणाली.

" हो. भाऊ, काल बघ घर जळतां जळतां राह्यलं. "

" म्हणजे ? " आश्चर्यानें भाऊ उद्गारले ! " घर जळत होतें ? "

" तूप जाळावर पडून जाळ अगदीं छपरापर्यंत गेला होता.थोडक्यांत चुकलं. "

" घराला कांहीं झालें नाहीं ना ? "

" जरा पाह्यल नसतं तर पेटलंच असतं. अरे लोणी चुलीवर कढायला ठेवलं आणि मी पूजेला गेले, हिला-गंगाबाईला-म्हटलं तूं जरा इकडे लक्ष दे. तर ती तिकडं कुठं गेली असेल; इतक्यांत लोणी उतास जाऊन भडका झाला. '

" असें किती लोणी होतें ? " पुनः भाऊंनीं विचारले.

" असेल चारपांच शेर. "

" गेलें तर गेलें लोणी. दुसरें आणा. घर जळलें नाहीं हें बरें झालें ! " जरा थांबून भाऊ म्हणाले. " आई, तूं कशाला आतां या भानगडी करतेस ? ज्याचा संसार आहे त्याला तर काळजी नाहीं, मग तूं कशाला आपल्या भोंवती त्रास करून घेतेस ? दिवसेंदिवस तुझ्यानें ही दगदग होते कां ? स्वस्थ हरी हरी करीत बसावें झालें. होईल काम नाही तर राहील. घरसंसारांत लक्ष घालायला आतां काय झालें ? " त्यावर आजी कांहींच बोलली नाहीं. वरीलप्रमाणें बोलून भाऊंनीं जो अर्थ ध्वनित केला होता तो तिच्या लक्षांत आला असावा. कारण त्या दिवसापासून तिनें घरांतलें लक्ष अजिबात् काढून टाकलें. ती आतां कांहींच पहात नसे; कोणतीहि वस्तु ठेवीत नसे, कोणाला रागावत नसे, घरांत आहे कां नाहीं हे सुद्धां कळत नसे. ती आपला बहुतेक वेळ पोथी वाचण्यात घालवीत असे. माझ्याशीं जें काय बोले तेवढेंच. कित्येक वेळा कोणाला दिसणार नाहीं अशारीतीनें अश्रू ढाळतांना मी तिला पाहिलें होतें. परंतु बालस्वभावामुळें ती कां रडत असे याचें कारण माझ्या लक्षांत येत नसें. हलुहलु तिनें संध्याकाळचे जेवण सुद्धां बंद केले, ती अगदी कडकडीत उपवास करीत असे, अशारितीनें तिनें देहदंडाचें व्रत चालविलें होतें.पाचसहा महिन्यांत तिचें शरीर अगदीं कृश होऊन गेलें, चालतांनां तिचे पाय कांपत असत. तिच्या शरिरांत व स्वभावांत पडलेला फरक भाऊंच्या देखील लक्षांत आला नाहीं. तिच्या ओळखीच्या कांहीं बाया म्हणत कीं, ' तुम्ही घरांत अहांत का नाहीं, हें अलीकडे कळतच नाहीं. ' त्यावर तिचें उत्तर असें असें कीं ' सारा वेळ आतां देवधर्मांत घालवते, आतां दुसरी दगदग होत नाहीं. आतां म्हातारपणी दुसरं काय करायचं आहे ? ' आणि खरोखरीं सकाळीं बराच वेळ ती पूजेअर्चेत घालवी, दुपारीं पोथीपुराण वाची व संध्याकाळीं देवदर्शनाला जाई व पुढें जेव्हां तिला चालवेना तेव्हां देवघरांत देवासमोर बसून कांहीं तरी स्तोत्रें वगैरे म्हणण्यांत वेळ घालवी. रात्रीं निजेपर्यंत ती भक्तिपूर्वक देवाचीं पदें, भजनें म्हणत असे. कधीं कधीं देवापुढें बसून आणि डोळ्यांत अश्रू आणून देवाची ती करुणा भाकी, " देवा ! सोडव मला तूं आतां ! मला तूं किती आयुष्य दिलं आहेस ? " असेंच कांहीं तरी तिच्या तोंडून मी उद्गार किती तरी वेळा ऐकले असतील ! रात्रीं मी आजीजवळच निजत असे. कित्येक वेळां तिनें मला आपल्या हृदयाशीं घट्ट धरावें. कांहीं तरी हलुहलु बोलावे व अश्रू ढाळावें. ती काय बोले तें मला ऐकूं येत नसे. पूर्वीप्रमाणें ती आतां मला पुराणांतल्या गोष्टी सांगत नसे. मी फारच आग्रह केला तर " बाळ, आतां तूं लवकर विद्या शीक म्हणजे तुला वाचतां येईल. मला आतां गोष्टी आठवत नाहींत. " असें म्हणे व डोळ्यांतून आलेलें पाणी पुसूं लागे. मग मीहि तिला फार आग्रह करीत नसे.

कित्येक दिवसांपासून आजी आजारी होती. आतां तर तिला उठून बसण्याची सुद्धां शक्ति नव्हती. आजी पडून राहिल्यापासून मला मात्र कसेसेंच वाटूं लागलें. मी तिच्या जवळून दूर होत नसे. आत्मारामपंताचें औषध तिला सुरूं होतेंच. परंतु दिवसें-

दिवस तिची प्रकृती क्षीण होत चालली होती. ती फार दिवस जगणार नाहीं असें वैद्य व भाऊ यांच्या संभाषणावरून व गंभीर चेहऱ्यावरून मला कळून चुकलें.

मनुष्य प्राणी किती आपमतलबी असतो पहा ! मी त्यावेळीं जरी आठ वर्षांचा होतो, तरी आजीपाठिमागें आपलें कसें होईल असें वाटून मला अतोनात वाईट वाटलें. माझ्या सुखाचीच मला काळजी पडली ! आईच्या मागें माझा सर्व प्रतिपाल आजीनें करून आईची उणीव मला भासूं दिली नव्हती. मातृसुखाला मी जरी आंचवलो होतो, तरी आजीमुळें मला कांहीं वाटलें नाहीं. तीच आजी आता मला सोडून जाणार ही कल्पना येतांच मला काय वाटले ते सांगणे कठीण आहे. लहानपणीं ज्या मुलाची माता मृत होते त्याची कशी स्थिति असते याचा अनुभव मला पुढे चागला आला. लहान बालकाला अज्ञानदशेंत जेवढें स्त्रियांच्या सहवासांत रहावे लागते, तेवढें पुरुषांच्या सहवासांत रहावें लागत नाहीं. चांगलें कळूं लागेपर्यंत ज्या स्त्रियांची संगत त्यांना असते व त्यांचे जसें बरें वाईट स्वभाव असतात, तसें त्यांना वळण लागून त्यांच्या मर्जीप्रमाणें त्यांना रहावें लागतें. आजी या दुखण्यातून बरी होणार नाहीं हें कळून माझ्या कोंवळ्या अंतःकरणाला जो धक्का बसला त्यानें माझा व्रात्यपणा, दांडगेपणा वगैरे बालपणचे गूण एकदम थंड पडून गेले ! माझ्या अंगांत पोक्तपणा आला ! माझ्या मनावर फार विलक्षण परिणाम झाला ! त्यानंतर पुढें मी घरांत कधींच दांडगाई केली नाहीं.

ज्यावेळीं आजीचा अंतकाल अगदीं समीप आला, त्यावेळीं आजीनें मला आपल्याजवळ घेतलें. भाऊ तेथेंच बसले होते. आजी शेंवटपर्यंत चांगली शुद्धींत होती. तिनें मला जवळ घेऊन माझ्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवित भाऊला उद्देशून म्हटलें, " भाऊ, कधीं ना कधीं तरी माणसाला मरायचं असतंच, त्यांत तुला येवढं कशाला वाईट वाटतं?" कारण भाऊंच्या डोळ्यांतून अश्रू येत होते व ते आजीला दिसूं नये म्हणून ते प्रयत्न करीत होते. आजीचें जसें भाऊवर प्रेम होतें, तसें भाऊंचेहि आजीवर प्रेम होतें. आपली प्रेमळ आई आतां यांतून जगत नाहीं असें वाटून त्यांना वाईट वाटत असल्यास नवल नाहीं. थोडावेळ थांबून आजी म्हणाली,

" माझे डोळे तुझ्या देखत झांकल्यावर आणखी काय पाहिजे! पण भाऊ, तूं आतां या चंदूकडे जरा लक्ष देत जा. गंगाबाई त्याला कांहीं त्रास देणार नाहीं. पण माझ्या मागं त्याला अगदीं कससंच वाटेल. तो लहान आहे, आईच्या मागं तो मलाच आई समजत होता-" पुढें तिचा कंठ भरून आल्यामुळें व बोलण्याचे अधिक श्रम झाल्यामुळें ती जरा स्वस्थ राहिली. भाऊंच्यानेंहि कांही बोलवेना ! मी तर आजीच्या गळ्याला मिठी मारून ओक्साबोक्शी रडूं लागलों. कांहीं वेळानें आजी मोठ्या प्रयासानें म्हणाली,

" माझा जीव याच्याचसाठीं तुटतो. तूं त्याचा बाप आहेस-तुम्ही कोणी त्याला दुःख देणार नाहीच पण-" तिच्यानें पुढें बोलवलें नाहीं. "त्याची बिलकूल काळजी करूं नको." असें जेव्हां भाऊंनीं सांगितलें, तेव्हां कोठें तिला जरा बरें वाटलें. क्षणभरानें



तूं आतां या चंदूकडे जरा लक्ष देत जा. प्र० ४ थें ( पृ० २० )

माझ्या पाठीवरून हात फिरवून, केंस कुरवाळून तिनें मला दुसरीकडे नेण्यास भाऊंना खूण केली. भाऊंनीं आजीच्या पुढ्यांतून मला उचलून घेतलें. माझ्या आठवणींत आजच प्रथम भाऊंनीं मला उचलून घेतलें होतें. दाराजवळ भीमा उभी होती, तिला त्यांनीं मला दुसरीकडे घेऊन जाण्यास सांगितलें; पण मी तेथून हाललो नाहीं. भीमाच्या कमरेला मिठी मारून मी रडत होतो. व ती माझी समजूत करतां करतां आपणहि रडत होती.

झालें ! भाऊंच्या मांडीवर मस्तक ठेऊन आजीनें आपला या जगांतला जीवनक्रम आटोपला ! ज्यावेळीं आजीनें मृत्युलोकीं देह ठेऊन स्वर्गलोकांत आपला पाय ठेवला, त्याचवेळीं बाईच्या आईनें आमच्या घरांत कायमचा पाय ठेवला !

---

## स्मृति पांचवी.

# कांहीं आठवणी



माझ्या आजीच्या मृत्युमुळें मला किती दुःख झालें, त्याची कल्पना करणें अशक्य आहे ! मला आतां अगदीं एकटें एकटें वाटूं लागलें. भाऊंनाहि दुःख झालें, बरेंच दिवसपर्यंत ते उदासीन दिसत होते; परंतु हळुहळु ते आपल्या कामांत तिचें दुःख विसरले. मला मात्र वारंवार आजीची आठवण होऊन रडूं येत असे. घरांत माझें आतां ममतेचें कोणी नाहीं, असें मला वाटूं लागलें. आजी ज्या वेळीं मृत्यु पावली त्याच वेळीं बाईची आई आमच्या घरीं आली असें मी लिहिलें आहे. बाईचें लग्न होऊन सात वर्षे झालीं असतील तेवढ्या अवधींत बाई एकदाच काय ती माहेरीं गेली असेल. बाईला एक लहान भाऊ व तिची आई हीं दोनच माणसें काय तीं होतीं. भाऊंनीं त्यानंतर बाईला कधीं ठाण्यास पाठविली नाहीं. तिच्या आईला अगर भावास भेटावयाचे असल्यास त्यांनींच येथें येऊन भेटत जावें असें भाऊंनीं सांगितल्यावरून बाईची आई भेटायला आली होती व त्याच वेळीं माझी आजी वारली ! आतां बाई घरांत एकटीच व माई ही एकटी म्हणून माई ( माझी दुसरी आजी-बाईची आई ) नीं कांहीं दिवस तेथेंच मुक्काम केला व पुढें तर त्यांचा मुक्काम कायमच झाला. पुढें आम्हीं सर्वच त्यांना माई म्हणूं लागलों. माई आल्यानंतर एक महिन्याच्या आंत त्यांचें चिरंजीव गंगाधरराव येऊन दाखल झाले. गंगाधररावाला आम्ही मामा म्हणावें, म्हणून ते आले त्या दिवसापासून आम्हांला त्यांस मामा म्हणण्याची ताकीद देण्यांत आली. तेव्हां यापुढें त्यांना मामा म्हणून संबोधण्याला हरकत नव्हती.

मरणापूर्वी अलिकडे आजी घरांत मुळींच पहात नव्हती, त्यामुळें घरांत बरीच अव्यवस्था झाली होती. कित्येक वस्तू वेळच्या वेळीं न पाहिल्यामुळें त्यांचा नाश होऊन त्या आजीच्या नकळत फेकून देण्यांत आल्या होत्या, कित्येक खपाच्या वस्तू

सीताबाईकडे वाजवीपेक्षां जास्त गेल्या होत्या, नोकरलोक वेळेच्यावेळीं कामें न करीत गेल्यामुळें घरांत ज्या खोल्यांचा जास्त खप नसे त्यांत कोपऱ्यांत कोळ्यांचीं घरें व धुरळा सांचला होता. बाईच्या लक्षांत या गोष्टी येत; परंतु बाईला मूळपासूनच असल्या कामाचा कंटाळा असे व तिने नोकराला काम सांगितलें असतां ते फारसें तिकडे लक्ष देत नसत. आजीचा सर्वांना वचक असे तितका बाईचा वचक त्यांना वाटत नसे. माई घरांत राहूं लागल्यावर ही घरांतली एकंदर अव्यवस्था पाहून, आपल्या मुलीवरचा संसाराचा भार हलका करण्याला त्यांनीं तेथेंच रहाण्याचा विचार केला. माईनीं हळूहळू घरांतला सर्व कारभार आपल्या हातीं घेतला; त्यामुळें बाईला आतां पुष्कळ हलकें वाटूं लागलें. गडी माणसावर तर काय, पण मुक्या प्राण्यावरहि माईनीं इतका दरारा बसविला कीं, माझी आवडती मनी व तिचीं दोन पिल्लें मोत्या आणि चंदी ही सुद्धां घरात शिरायला भीत. बिचारा माझा टिप्या कुत्रा तर आंतल्या बाजूला फिरकेनासा झाला ! यदाकदाचित तो आंत आलाच तर त्याला कशाचा तरी भयंकर टोला बसे व तो चीं–चीं करून जो बाहेर पळे तो किती तरी वेळपर्यंत अंगणांत सुद्धां येत नसे. कुत्र्यामांजराबरोबर माझ्यावरहि बरीच पुष्पांजली होत असे. नोकरलोक माईंना जरी भीत व सर्व कामें करीत, तरी वेळ येतांच माईंची निंदा करीत व आजीची स्तुति करीत.

एके दिवशीं सकाळी मी व टिप्या अंगणांत खेळत होतो. एक रबराचा चेंडू मी त्याच्याकडे फेकी व तो तो तोंडांत धरून माझ्याकडे घेऊन येई, पुनः मी तो दूर फेकून द्यावा व त्याने धांवत जाऊन तोंडांत धरून आणावा असें चार दोन वेळ झालें. माई सोंवळ्यानें विहीरीचें पाणी भरत होती; माईनीं भरलेली घागर आणावयाला व तिकडून टिप्या तोंडांत चेंडू घेऊन यायला; त्याचा धक्का माईच्या पायाला ओझरता लागला व त्याचे सोंवळें विटाळलें ! टिप्याचें ते कृत्य माईंना सहन न होऊन त्या फार रागावल्या व रागारागाने भरलेली घागर त्यांनीं जोरानें टिप्याच्या मस्तकावर हाणली. त्याबरोबर तो किंकाळत जमिनीवर लोळूं लागला. मी धांवत धांवत त्याच्या-जवळ आलो व त्याला उचलून मांडीवर घेतलें. त्याचे मस्तक फुटून त्यांतून रक्ताची धार वहात होती. प्रथम मोठमोठ्यानें किंचाळून नंतर तो हळूहळू ओरडूं लागला. माईचे तोंड चालूच होतं. "जळ्ळं मेलं अवलक्षणीं कुत्रं. माझं सोंवळं विटाळलं मेल्यानं आतां मी पुनः सोंवळं नेसेन तेव्हां चुलीला लागीन. मी नव्हती कधीं असलीं कुत्रीं न मांजर घरांत बाळगलेलीं पाहिलीं. सारा मेला बाटगा व्यवहार कोळ्या-माळ्यासारखा ! माझ्या अंगावर खेकरून "कार्ट्या, येऊं तर दे तुझं कुत्रं अन् मांजर माझ्या तडाक्यांत, मारूनच टाकीन मेल्यांना. येवढा मोठा घोडा झालाय् तरी आपला सारा वेळ त्या कुत्र्यामांजरांत धिंगाणा घालतोय्. लाज नाहीं वाटत; आणखी वर रडून दाखवतो आहे." टिप्या अगदीं निपचीत पडला होता, म्हणून मी खरोखरीच रडत होतों. त्याच्या पाठीवर मी हात ठेऊन बसलो होतो व तो क्षणोक्षणीं

डोळें उघडझांक करून माझ्याकडे अगदीं केविलवाण्या नजरेनें पहात होता. त्याची बहुतेक हालचाल बंद झाल्यासारखीच होती! धीमेधीमे त्याचा श्वासोश्वास चालला होता. माझ्यानें न रहावून मी माईला म्हणालों,

" माई, टिप्याला फार लागलं आहे, तो मरेल कां हो ? "

" मरेना का मेला तर ! बरं होईल घरांतली पीडा जाईल एकदांची ! तूं बस रडत त्याला घेऊन. " माई असें चवताळून म्हणत घरांत गेल्या. मी टिप्याला घेऊन बसलों होतोंच. इतक्यांत भिमा कांहीं कामाला तेथें आली; मला त्या कुत्र्याजवळ रडतांना पाहून ती माझ्याजवळ आली व काय झालें म्हणून विचारूं लागली. टिप्याच्या डोक्यांतून बरेंच रक्त वहावून माझ्या अंगालाहि लागलें होतें. टिप्या मेला हें जाणून भिमानें मला उठविलें व त्याला काय लागलें, कसें लागलें म्हणून ती मला हळुहळु विचारूं लागली. मी रडत रडत कांहीं तरी तुटक अशीं तिला उत्तरें दिलीं. त्यावरून त्या गरीब मुक्या प्राण्याचा कसा अंत झाला हें भिमाला समजलें व तिलाहि वाईट वाटलें. तिनें माझी पुष्कळ समजूत केली.

टिप्या मेला तो सबंध दिवस मी रडत होतों; मला जेवणखाणदेखील सुचेना. त्या दिवशीं कांहीं कामाला भाऊ बाहेरगावीं गेले होते, त्यामुळें त्या गरीब प्राण्याचें मरण कसें झालें ही गोष्ट त्यांना कळली नाहीं. आणि कळूनहि ते काय करणार ? दुपारीं जेवायला बसलों तरी मला रडूं येतच होतें, जेवावेंसें मला वाटेना, पण तसें सागण्याचे मला धैर्यहि होईना ! मी कसा तरी जेवायला बसलों. जेवतांना मला डोळे पुसताना पाहून माई माझ्यावर एवढाले डोळे काढून म्हणाली,

" काय मेलं अभद्र कार्टे, पानावर बसून रडतंय ! हं, खबरदार असा वेळ न् वारी पानावर बसून रडलास तर ? माझ्या कामास नाही पडायचं ! ते मेलं अवलक्षणीं कुत्रं मेलं काय अन् त्याच्यासाठीं हा गाढव रडतोय काय ! काय झालं रडायला, हं, काय झालं ? थांबतोस का नाहीं ? का तुलाहि देऊं एक चागला तडाखा. " असें म्हणत म्हणत खरंच ती हात उगारून माझ्याजवळ आली. आता आपणासहि टिप्या-सारखे यमसदन पहावयाला जावें लागणार असे वाटून माझे तर हातपाय थरथर कापूं लागले. थोडक्यांत चुकलें नाहींतर मलाहि त्या दिवशीं टिप्याची संगत करावी लागली असती. मामा माझ्या शेजारींच जेवावयास बसले होते; ते माईला म्हणाले, " हं, हं, माई, तूं काय करतेस हें ! तुझं काय जातं तो रडतो तर ? त्याचा कुत्रा मेला म्हणून तो रडतोय्. " माईकडे पाहून डोळे मिचकावित मामा पुनः म्हणाले " माईसाहेब, तो बिचारा तुमच्या रागाच्या तडाक्यांत सांपडून मेला बरं कां. "

" हं, पुरे पुरे तुझं शहाणपण आतां, मेलं कुत्रं तर पाप गेलं, त्यांत काय वाईट झालं ! असं पानावर बसून रडलेलं मला नाहीं आवडत. " कांहींशी नरम पडून माई म्हणाली. " मेलं हें कार्टे आहेच अवगुणी, उपजलं नाहीं तर आईला खाऊन बसलं, दोन सोन्यासारखी माझ्या बनीचीं मुलं पण खाल्लीं, आजीलाय खाऊन बसलं ! आत

तरी कुणाला खायचं आहे बाबा तुला ? त्या बापाला तरी राहूं दे सुखाचा, एखादी मेली पोर्टी असतातच अशा पायगुणाची ? साऱ्या घरांदाराचं वाटोळं करायला जन्म घेतात.'' माझ्याकडे तिरस्कारानें पहात माई म्हणाली. माझी आई, आजी व दोन भावंडे मेलीं तो जसा माझाच अपराध होता ! येणारे अश्रू माझ्या डाव्या मनगटाला मी क्षणोक्षणीं पुसत होतों; केव्हां एकदां येथून बाहेर जायला मिळेल म्हणून पुढ्यांतला भात भरभर पाण्याच्या घोटाबरोबर घशाखालीं उतरवीत होतो; कारण पानावर भाताचें एकहि शीत शिल्लक राहूं देणें म्हणजे भयंकर अपराध करणें समजलें जात होतें !

"माई, माणसाला माणसं खातांना आपण नव्हतो बुवा कधीं पाहलीं ! मग हा चंदू कसाग एवढीं माणसं खाऊन गेला ! संभाळ हो तुला आणि मला सुद्धां तो एखादे दिवशीं खाऊन टाकील !'' डोळे मिचकावित हंसत हंसत मामासाहेब आपल्या आईची थट्टा करण्याच्या हेतूनें म्हणत होते. माझा जीव मात्र खालीवर होत होता. न जाणों मला खरोखरीच राक्षस समजून माईसाहेब माझ्या डोक्यांत चुलीतलें जळतें लाकूड तर घालणार नाहींना ? चिरंजीवाच्या थट्टेने माईसाहेब फारच चवताळल्या, माझ्या-कडचा मोर्चा फिरवून त्या आपल्या चिरंजिवाकडे वळल्या.

"मेल्या गंग्या, माझी थट्टा करतोस काय ! थाब मेल्या तुलाहि दाखवतें आतां. मेला इथं आल्यापासून फारच शेफारला आहे !'' गंगोबा त्यांचेच चिरंजीव ते थोडीच त्यांना हार जाणार होते !

"हो, खरंच माई, इथं आल्यापासून तुला सुद्धा फारच तोंड सुटलं आहे ज्याला त्याला शिव्या द्यायला ! आतां इथं रिकामपण मिळतय् बडबड करायला, तिथं बरं होतं—''

माई क्रुद्ध वाघिणीसारखी हातांत जळकें लाकूड घेऊन गंगोबाच्या अंगावर धांवली, गंगोबा हंसत हंसत पानावरून ऊठून पळून गेले व ही संधी साधून मीहि मुकाट्यानें उठून आंचवायला गेलो. हा सर्व प्रकार बाई पहातच होती, तिनें मोठ्या शिकस्तीनें माईची समजूत केली.

माझा टिप्या मेल्यानंतर दोनतीन दिवसाची गोष्ट असेल, सीताबाईचा मुलगा गोपू याजबरोबर खेळायला त्याच्या घरीं मी गेलों. तें दिवशीं शनिवार असल्यामुळें पहिल्या सुट्टींत गोपू घरीं आला होता. गोपूला त्याच्या वडिलांनीं एक वर्षापूर्वीच शाळेंत दाखल केलें होतें, मी अद्याप शाळेंत जाऊं लागलों नव्हतो. आजीच्या मरणा-पूर्वी मला शाळेंत घालण्याचा भाऊंचा विचार होता; परंतु जरा मोठा झाल्यावर पाठवूं सध्यां तो लहान आहे, असें आजीच्या सागण्यावरून भाऊंनी मला शाळेंत घातलें नव्हतें. पुढें घालणार तर आजी वारली त्यामुळें आजीचा जरा विसर पडल्यावर शाळेंत दाखल करण्याचा भाऊंचा विचार होता. मी नऊ वर्षांचा होईपर्यंत शाळेंत न जाण्याचें आणखीहि एक कारण होतें. मुन्सफांच्या घरीं जे मास्तर येत त्यांनीं भाऊंना

असें सांगितलें कीं, 'याला शाळेंत घालण्याची घाई करूं नका.' त्याचा अभ्यास मी दुसरीपर्यंत घरीं करवून मग तिसऱ्या वर्गात दाखल करूं. ती गोष्ट भाऊंनीं कबूल केली.

गोपूचें व माझें फारसें पटत नसें, तरीं घरी बसून कंटाळल्यामुळे माईंना विचारून मी गोपूच्या येथें गेलों. गोपू पुढच्या ओटींवरच होता. मला पाहतांच त्यानें प्रश्न केला.

"कारे चंद्या, कशाला आलास रे ?"

"कांहीं नाहीं. तुझ्याशीं मी खेळायला आलों आहे." मी म्हणालों.

"पण हें बघ चंद्या, माझ्या आईनं मला इथंच खेळायला सांगितलं आहे. तिनं ती डाळ घातली आहे वाळत अन् मला इथं बसवलं आहे राखण. मला तर कंटाळा आला एका जागीं बसून, बरं, झालं तूं आलास ?"

"बरं. तर आपण इथंच खेळूं." मी म्हणालों. त्यानंतर घटकाभर आम्ही तेथेंच खेळत होतो. पण गोपूला एके जागीं खेळण्याचा आतां कंटाळा आला; त्याची आई व आत्या कोठें तरी गेल्या होत्या, त्या लवकर कांहीं परत येणार नाहीं असें तो म्हणाला, व मी नाहीं--नाहीं म्हणत असतां मला बळेंच त्याच्या घराच्या मागील दारीं धेऊन गेला. तेथें एक पेरूचें झाड होतें; मला झाडावर चढावयास सांगून आपण झाडाखालीं पेरू वेचावयाला उभा राहिला. सीताबाई त्या पेरूच्या झाडाला कधीं कोणाला हात लावूं देत नसत. गोपूनें एकदां पेरू तोडल्याबद्दल त्यालाही मार खावा लागला होता. आई घरीं नाहीं ही संधी त्याला फावली. मला झाडावर चढण्याचा चांगला अभ्यास होता, म्हणून त्यानें मला गोड गोड बोलून हरभऱ्याच्या झाडावर चढवून नंतर पेरूच्या झाडावर चढविलें. बालस्वभावाला अनुसरून पुढचा मागचा विचार न करून मी वानरासारखा भराभर झाडावर बऱ्याच उंच चढून गेलों व तेथून पक्के पक्के पेरू खालीं गोपूकडे टाकूं लागलों. खालीं आल्यावर तुलाहि देईन असें तो मला सांगत होता व जो पेरू मी टाकी तो तो खाऊन टाकीत होता. मी एकहि पेरू चाखून पाहिला नव्हता; परंतु मला जी बक्षिशी मिळाली ती मात्र मी कधींच विसरणार नाहीं. इतक्यांत सीताबाईचा शब्द माझ्या कानावर आला. त्या आल्याचें गोपूलाहि कळलें, कारण मला झाडावर तसाच लटकत ठेऊन त्यानें तेथून केव्हांच पोबारा केला.

त्या येण्यापूर्वी आपण चटकन् झाडावरून उतरून जावें म्हणून मी लवकर लवकर उतरूं लागलों; पण मी अर्ध्या झाडावर आलों असेल इतक्यांत सीताबाईची स्वारी तेथें येऊन दाखल झाली. आतां मात्र आपली धडगत नाहीं असें वाटून माझी छाती धडधड उडूं लागली. खालीं उतरल्यावाचून गत्यंतरच नव्हतें. काय होईल ते होवो, असें वाटून एखाद्या भयंकर अपराध्याप्रमाणें मी खालीं उतरलों. माझे पाय जमिनीला लागतांच माझें मनगट विषारी सर्पदंशानें वेदना झाल्याप्रमाणें सीताबाईनीं घट्ट धरून ठेवलें. त्या क्षणभर कांहींच बोलल्या नाहींत; त्यांच्या त्या वेळच्या स्वरूपावरून

त्यांना अतोनात राग आला आहे असें दिसत होतें. माझ्यावर दांत ओठ चावून त्या क्रोधकंपित स्वरानें म्हणाल्या.

" कार्ट्या, चल, आतां तुला माईकडेच घेऊन जाते. " इतकेंच त्यांचे शब्द; पण माझ्या काळजाचें पाणी करून टाकावयाला पुरें होते ! त्यावर एकहि शब्द न उच्चारतां त्या मला फरफरा ओढूं लागल्या. एखाद्या बोकडाला बली द्यावयाला नेत असतां त्याला देखील आपल्या स्थितीचें एवढें वाईट वाटत नसेल, तशी त्यावेळीं माझी स्थिती झाली !

पुढच्या दारीं येतांच आणखीहि एक माझी चुकी नजरेस आली ! जेव्हां मी फाटकांतून आंत आलों, तेव्हां अजाणतेपणीं फाटकाचें दार माझ्या हातून उघडें राहून गेलें; मागल्यादारीं जाऊन परत येईपर्यंत त्याची आठवण राहीली नाहीं. त्यामुळें माझ्यावर सूड उगवायलाच कीं काय कोणाची तरी गाय आंत शिरून ती वाळत घातलेली डाळ सर्व सफ्फा करून भुईवर इकडे तिकडे पडलेले दाणे शोधून शोधून खात होती. डाळ गाईने खाल्ली म्हणून सीताबाई आधीच रागावल्या होत्या. व त्यांत पेरू तोडलेले कळलें. इतक्यांत ओटीवरच्या खोलींत गोपोबा दडून बसले होते, ते बाहेर येऊन म्हणाले, " आई, या चंद्यानीच फाटक उघडं टाकलं ग. " म्हणून ओक्साबोक्सी रडूं लागले. तेव्हां तोहि अपराध आमच्याच गळ्यांत बांधण्यांत आला.

सीताबाई मला ओढून आमच्या घरी घेऊन आल्या. त्यांनीं माझा हात इतक्या जोराने धरला होता कीं, तो एखाद्या लोखंडाच्या सांपळयात अडकला आहे असे मला वाटत होतें.

बाई एक कादंबरी वाचून दाखवित होती व माई तांदूळ निवडता निवडतां तीं ऐकत होती. आम्ही आंत जातांच दोघींनीहि आपआपल्या कामांतून आमच्याकडे दृष्टी वळविली. सीताबाईला पाहून माई म्हणाली " काय झालं हो सीताबाई ? "

" माई, हा चोर पहा पकडून आणला आहे ! " सीताबाई मला पुढें लोटून म्हणाल्या. "माझ्या पेरूच्या झाडावर चढून सारे पेरूं झोडून टाकले या कार्ट्यांनी, अन माझी इतकी थोरली डाळ गाई जवळून खाववली. काय करूं याला, सांगा आतां काय करूं " रागारागानें सीताबाई थरथरा कांपत होत्या.

" काय ? पेरूच्या झाडावर चढला होता ? " आश्चर्यानें माई म्हणाल्या.

" अहो, काय सांगू तुम्हाला. आम्ही दोघी जरा त्या ह्यांच्याकडे गेलो होतो आणि गोप्याला मी डाळीजवळ राखण बसवला होता. तर या परिसपुतळयानं " तेथें माझें मनगट अधिक घट्ट आवळून " त्याला खेळायला नेला. आम्ही आलों तर फाटक उघडच अन् कोणाचीशी गाय आंत शीरून खुशाल तेवढी सारी डाळ खाऊन गेली, म्हणून मी गोप्याला हांक मारली तर तो कुठं दिसेना. तशींच मागच्या दारीं आले, तर हा आपला पेरूवर चढून पेरू खातोय ! मला पाहिल्यावर मग कुठं जाणार म्हणा. आला खालीं तो तसाच तुमच्याकड पकडून आणला. पुढचं फाटकही यानंच

उघडं टाकलं असं गोपू म्हणाला. कध्धी कध्धी कुणाला मी या झाडांला हात लावूं देत नाहीं, अन् हें पहा ढालगज कार्टे ! नव्हत बाई असं कुठं पाह्यल लोकांच्या वस्तींचा देखील नासधुस करायचा. हें काय असलं लक्षण ? " क्षणोक्षणीं सीताबाईच्या रागाची कमान चढत होती. सीताबाईचें बोलणें पुरें होईपर्यंत माई माझ्याकडें भुवया चढवून व नाकपुड्या विस्तृत करून पहात होती. सीताबाईचें बोलणें संपतांच एखाद्या चवताळलेल्या वाघिणीप्रमाणें माई माझ्या अंगावर चाल करून आली. तिनें माझे दोन्ही कान इतक्या जोरानें धरले कीं, माझ्या सर्वांगाचे रक्त सळसळून माझ्या डोळ्यापुढें काजवे चमकूं लागले ! एवढा वेळ दाबून ठेवलेले रडे आता माझ्या स्वाधीन न राहून एक दम जोरानें बाहेर पडूं लागलें.

" कार्ट्या, चोऱ्या करूनसवरून पुनः रडून दाखवतोस काय ? " माई ओरडून म्हणाली. इकडे माझ्या तोंडांत, हातावर, पाठीवर सपासप सपाटे चाललेच होते. " दम धर. तुझ्या त्या हाताना चागले चरचरून डागच दिले पाहिजेत. हं, खबरदार रडलास तर ! " दात ओठ खाऊन " मेल्याची जशी काय आई मेली आहे, मेला चंडाळ केवढा भोकाड पसरून रडतो आहे. जरा कुठं हात लावला नाहीं तर जसं आकाशपाताळ एक केलं गाढवानं. " आतां मात्र मला सहन होईना. पलीकडच्या दाराआड भिमा उभी होती, तिच्या डोळ्यांतून पाणी येत होते, तें ती पुसत होती. काय करील बिचारी ! त्या महामायेच्या हातून मला सोडविण्याची कोणाची छाती होती ? इकडे सीताबाई स्मित करीत होती. घड्याळात पांचाचे टोले ऐकून बाई माईला म्हणाली.

" पुरे झालं माई ! जाऊं दे आता "

" जाऊं दे ? " अधिक ओरडून व मला एक जोराचा छातींत टोला देऊन माई म्हणाली. " जाऊं दे काय ! असलं हे आतापासून चोरीचं लक्षण चागलं काय ? हा पुढं मोठा बिलंदर चोर होईल चोर या लक्षणानं ! त्याला बोलून बोलून माझं तर मस्तक पिकून गेलं.किती बाई बोलावं तरी,बोलणारालाहि लाज वाटते पण करण्या करणाराला काहीं वाटत नाहीं." पुनः एक जोराचा प्रहार बसला तो मला सहन न होऊन मी खालीं पडलों. त्यानंतर काय झालें ते मला कळले नाहीं. मी जेव्हा डोळे उघडून पाहिले तेव्हा पडवींतल्या आडगळीच्या खोलींत मी पडलो आहे असे मला आढळलें. मी येथें का पडून राहिलो याचें बराच वेळ पर्यंत मला स्मरण होईना. हळुहळु दुपारपासून घडून आलेल्या सर्व गोष्टी माझ्या स्मरणांत येऊं लागल्या . आता दिवस मावळून काळोख पडूं लागला होता. त्या खोलींत बऱ्याच उंचावर एक लहानशी खिडकी उघडी होती त्यांतून बाहेरचा संधिप्रकाश दिसत होता. बाहेर माणसांच्या बोलण्याचा खोलखोल अस्पष्ट अवाज ऐकू ऐत होता. बराच वेळ झाला तरी खोलींत कोणी येईना तेव्हां मीच हळुहळू उठून दाराजवळ गेलों तर दार बंद ! दुसऱ्या दाराजवळ गेलो तर तेंहि बंद ! मला तेथें कोंडून ठेवण्यांत आलें आहे असें आतां माझ्या लक्षांत आलें.

खोलींत बरींच अडगळ असल्यामुळें कित्येक अडगळ सामानाचें विचित्र आकार दिसून मला भीति वाटत होती. खिडकींतून बाहेर पडण्याचा मी विचार केला, पण खिडकी बरीच उंच असल्यामुळें माझा हात पुरेना. मला कोणीतरी घटका अर्ध घटकांनीं सोडविल अशी आशा होती. त्या आशेवर मी किती वेळ काढला. पण मला सोडवायला कोणीच आलें नाहीं. भाऊ आले म्हणजे तरी माझी सुटका होईल असें मला वाटत होतें; परंतु ते दिवशीं भाऊ जरा उशिरा घरीं आले व घाईघाईनें जेवण उरकून कोठेंसे बाहेर कामाला निघून गेले. त्यानंतर पुष्कळ उशीरां ते घरीं आले ही गोष्ट नंतर मला भिमाकडून कळली.

हळुहळु घरांतली सामसुम होत चालली, पण माझ्याकडे कोणीच आलें नाहीं. आतां मात्र माझा धीर खचून मी रडूं लागलों व माझ्या मनांत नानातऱ्हेचें विचार येऊं लागले. जन्मतांच आई मरण पावली।तरी आजीनें मला कोणत्याहि बाबतींत उणे पडूं दिले नव्हतें.

आज माझी आई किंवा आजी असती तर मी असा उपाशी, काळोखांत एकटा भुईवर पडून राहिलों असतो काय ? माझ्या हातून कांहीं चूक झाली असतां त्यांनीं मला एवढी जबर शिक्षा केली असती काय ? देवा ! माझ्या आईला आणि आजीला तूं तुझ्याकडे घेऊन गेलास, मला कां नाहीं नेलंस ? मला एकट्याला इथं कशाला ठेवलं आहेस ? मलाहि तुझ्याकडे घेऊन जा. इथं रहाण्यापेक्षा मी तुझ्याकडे आनंदानें येईन. माझ्यावर ममता करणारं आतां कोण आहे ! भाऊहि माझ्याकडे पहात नाहींत व त्यांनी ही हकीकत कोण सांगणार ? देव दयाळू असतो असं आजी म्हणत असे; पण तूं माझ्यावर कां बरं दया करीत नाहीस ? माझ्या हातून तुझा कांहीं अपराध झाला आहे कां ? असें व अशाच सारखें माझ्या अल्पबुद्धीला सुचणारे विचार माझ्या अंतःकरणांत येत होते. पोटांत भूक सपाटून लागली होती, अंग सारें ठणकत होतें, कोठें खट्ट झालें तरी भीतीनें सर्वांग गारठून बोबडी वळत होती. प्रथम कांहीं वेळ मला इतकी भीति वाटली कीं या भीतीनेंच माझा प्राण जाईल कीं काय असें मला झालें ! परंतु हलके हलके माझ्या हृदयावरचें भीतीचें दडपण कमी कमी होत गेले. कोणत्याहि गोष्टीविषयीं प्रथम आपणास केवढेंहि भय वाटलें, तरी त्या स्थितीची आपल्याला संवय झाल्यावर त्याचा दाब कमी होऊं लागतो. मी तेथें किती वेळ रडत होतो याची मला बरोबर कल्पना नाहीं. माझ्या तशा त्या स्थितींतही बऱ्याच वेळानें निद्रेनें आपला अम्मल माझ्यावर बसविला व मी माझें दुःख विसरून गाढ झोंपी गेलों. रात्र किती झाली होती हें मला माहित नाहीं. पुष्कळ वेळानंतर मला एक स्वप्न पडलें. त्यांत देवाला माझी करुणा येऊन आपल्याकडे नेण्याकरितां त्यानें मला एक विमान धाडलें व देवदूत हंसत हंसत हलकेंच मला उचलून विमानांत ठेवीत आहेत असें मला वाटलें. मी चटकन् जागा झालों आणि पहातो तों खरेंच माझें डोकें कोणी तरी हलकेंच उचललें, मी घाबरून किंकाळी मारणार तर माझ्या कानांत हळूंच कोणी तरी पुढील शब्द उच्चारले.

“ हूं भिऊ नको बाळा, मी आहे. इकडं पहा. ” बोलणाऱ्या व्यक्तीकडे पाहिलें तर ती भीमा होती. त्या लहानशा खिडकींतून चंद्राचा स्वच्छ प्रकाश तोंडावर पडला होता त्यामुळें मी तिला चटकन ओळखलें. तिला पहातांच माझ्या रडण्याला एकदम भरतें येऊन मी तिच्या गळ्याला घट्ट मिठी मारली.

“ चूप बाळ, चूप. ” आपले अश्रू पुसून भीमा हलक्या अवाजांत बोलत होती. “ मोठ्यानें रडूं नको नाहीं तर बाहेर ऐकूं जाईल. माझं बाळ तें आज अगदींच उपाशी आहे. ” असें म्हणून पुनः ती रडूं लागली व मला घट्ट पोटाशीं धरलें. “ काय करूं बाबा, माझा जीव पुष्कळ तळमळला पण मी काय करणार ? ”

“ भीमा, मला तूं बाहेर ने ग, मला इथं भीति वाटते ! ”

“ बाबा, मी कशी नेऊं तुला बाहेर ? ”

“ मग तूं कशी आलीस ग ? ”

“ दाराला बाहेरून नुसती कडीच आहे, म्हणून मला येता आलं, पण तुला आज सगळी रात्र इथंच ठेवायचा आहे. माईंनी सगळ्यांना ताकीद दिली आहे. तेव्हां तुला मी कसा नेऊं बाहेर. ” असें म्हणून तिनें दीर्घ श्वास सोडला व डोळें पुसूं लागली.

“ भिमा, मला भूक लागली आहे ग ” असें मी म्हणतांच तिनें आपल्या जवळची एक लहानशी पुरचुंडी काढली. माझ्यासाठीं बाजारांतून चणेकुरमुरे तिनें विकत आणले होते. त्यानें मला जरा बरें वाटलें. पुनः एकदां मला पोटाशीं धरून ती जावयाला निघाली. तिचा पदर घट्ट धरून मी म्हणालों,

“ भिमा, तूं जाऊं नकोस. नाहीं तर मला तरीं बाहेर ने. ” तिनें माझी पुष्कळ समजूत केली. शेवटीं मी बाहेरच्या बाजूला दाराजवळ निजते असें सांगितलें, पण कांहींकेल्या माझी समजूत होईना. मी येथें आल्याचें जर माईंना कळलें, तर त्या आपल्या दोघांवरहि रागावतलि असें जेव्हां ती म्हणाली, तेव्हां तिला जाऊं द्यायला मी कबूल झालों. तूं दाराजवळ मात्र निज असें मी तिला बजावून सांगितलें. तिनेंहि तें कबूल केलें.

---

## स्मृति सहावी.

# शाळेंत पाठवणी.



दुसऱ्या दिवशीं सकाळीं भाऊ उठण्यापूर्वीच त्या कारागृहांतून आमची सुटका झाली; ‘ ही गोष्ट भाऊंच्या कानावर गेली तर खबरदार ’ म्हणून माईंनीं मला बजावून सांगितलें. माईंच्या हुकुमाविरुद्ध वर्तन करण्याची आमची छाती नव्हतीच.

आजीच्या मरणानंतर भाऊं माझ्याशीं बोलत; परंतु मला समजूं लागल्यापासून त्यांच्याशीं मी फारसा बोलत नसे. मला त्यांच्यासमोर उभें रहाण्याला व बोलण्याला एक प्रकारचा संकोच वाटत असें त्यामुळें मी क्वचितच त्यांच्यासमोर जात असें व ते विचारतील तेवढ्याच प्रश्नांचीं उत्तरे देत असे. इतर कांहीं मुलाप्रमाणें घरांत होणारी बारीक सारीक बाबत वडिल माणसें घरांत आल्याबरोबरत्यांच्याजवळ पाढा वाचण्याची मला संवय नव्हती. तशी संवय जरी असती, तरी माईसाहेबांच्या विरुद्ध एकहि शब्द उच्चारण्याची कोणाचीच मगदूर नव्हती. अर्थात माईसाहेबांकडून आम्हाला जें बक्षीस मिळत असें ते भाऊंच्या कानावर जाण्याला मार्ग नव्हता.

त्या दिवसापासून पुनः कधींहि मी सीताबाईच्या घरांत पाऊल टाकले नाहीं. आता माझी स्थिति अशी झाली होती कीं, मला बाहेर कोठेंहि खेळावयास मिळत नव्हतें. बाबूच्या घरींसुद्धां मी कित्येक दिवसांत–नव्हे माहिन्यांत गेलो नव्हतो. घरात आतल्या बाजूला तर मी कारणाशिवाय जातच नसे. बाहेर ओटीवर अगर मधल्या ओठाणांत मी खेळत असलों तरी माईचे डोकें उठत असें. पाटी घेऊन कांहीं अभ्यास करूं लागलो तर, हे आतां मोठें विद्वान् होणार, म्हणून माझ्यावर टीकेला सुरुवात होत असे. तेव्हा माझी मलाच लाज वाटून, माझी पाटीपुस्तके बाजूला ठेऊन एका कोपऱ्यात गुन्हेगाराप्रमाणें मुकाट्यानें बसून रहावें. माझ्या या स्थितीचा मला इतका कंटाळा आला कीं, भाऊ आतां मला शाळेंत घालतील तर बरें असे मला वाटूं लागलें. कित्येक मुलाना शाळेत जायचा कंटाळा येत असेल, पण मला तर असें झाले होतें कीं मी केव्हां एकदां शाळेंत दाखल होतो.

शेवटीं एकदाचा तो दिवस उगवला व मला तेथल्या मराठी शाळेत तिसऱ्या इयत्तेत दाखल करण्यांत आलें. गावांत भाऊंचें वजन चांगलें होतें व माझा दुसरीचा अभ्यास चांगला झाला असल्यामुळें आमच्या हेडमास्तरांनीं मला एकदम तिसऱ्या वर्गांत बसाविलें. माझा मित्र बाबूहि माझ्याच वर्गांत होता, त्यामुळें मला किती आनंद वाटला याची कल्पनाच होणार नाहीं. कारण बाबूची आतां रोजच भेट होणार होती. माझा दुसरीचा चांगला अभ्यास करवून मला तिसऱ्या वर्गांत बसविण्याची सारी खटपट आमच्या ‘ तात्या पंतोजी ’ मास्तरांचीच होती. त्यांचा माझ्यावर फार लोभ असे. ते माझ्याशीं फार प्रेमळपणानें वागत. मी शाळेंत जरी जाऊं लागलों तरी माझें जेथें अडेल तेथें त्यांची मदत मला मिळत असे. कोणावर रागावतांना मी त्यांना पाहिलें नाहीं. लहान मुलांना गमतीनें विद्येची गोडी लावण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती. त्यांच्याविषयीं मला लहानपणापासून फार आदर वाटत असे.

शाळेंत जाऊं लागल्यापासून बाबूची व माझी दररोज गांठ पडूं लागली. इतर मुलांच्याहि ओळखी झाल्या. आतां घरांतला त्रास मला हलका वाटूं लागला. बहुतेक सारावेळ माझा आतां अभ्यासांत जाऊं लागला. शाळेंतून घरीं आल्यावर मला विशेषसें खेळण्याला साधन नसल्यामुळें मी कांहीं तरी अभ्यासच करीत असे. व पुढचा

अभ्यास तात्यामास्तर जवळून शिकत असे. त्यामुळें शाळेंत नेहमीं माझा नंबर पहिला असे. मी मागून येऊन पहिला नंबर पटकावितो याबद्दल कित्येक मुलांना माझ्याविषयीं वैषम्य वाटत असें, त्यांत गोपूला तर फारच वाटत असें. गोपू माझ्यापेक्षां दोन वर्षांनीं मोठा असून माझ्याच वर्गांत होता.

ते दिवशीं रविवार असल्यामुळें रजा होती. भाऊ दोन दिवसांपूर्वीं कांहीं कामाला मुंबईला गेले होते. कारण तसेंच कांहीं काम असलें तर त्यांना नेहमीं मुंबईला अगर ठाण्याला जावें लागे. रविवारीं संध्याकाळीं ते घरीं परत येणार होतें. सोमवारचा अभ्यास करून ठेविला आतां काय उद्योग करावा या विचारांत मी होतों.

काहीं दिवसापूर्वीं भाऊंनीं मला एक खेळातली लाकडी तलवार आणून दिली होती; तिचा मी उपयोग केला नव्हताच, पण आज मला काय लहर आली कोण जाणे! ती तलवार घेऊन खेळावे असेंच मला वाटलें. खालीं कांहीं गडबड केल्यास ती माईंना खपणार नाही हें जाणून मी हालकेंच माडीवर गेलो. संध्याकाळशिवाय भाऊ परत येणार नाहीं हें माहित असल्यामुळे मी भाऊंच्या लिहावयाच्याच खोलींत जाऊन खेळूं लागलो. सहज खेळता खेळता लाकडी तलवारीचा फटका काचेच्या दिव्यावर बसून त्याचें तुकडे झालें. त्या फुटक्या दिव्याकडे व त्या शाईनें खराब झालेल्या कागदाकडे मी दीनमुद्रेने पहात निश्चल उभा होतो; सहज मागें दृष्टी वळविली तर दारात कोण उभें होतें? माई! आतां मात्र पूर्वींचें सर्व शौर्य लटकें पडलें व हातपाय लटपटूं लागले. माईसाहेब कशालाशा वर यायला व दिव्याचे तुकडे व्हायला एकच गांठ पडली! माझ्या हातून यत्किंचित अपराध होण्याचा अवकाश कीं शिक्षा झालीच म्हणून समजावी; मग हा तर मोठाच अपराध होता!

"अरे गाढवा, हे काय केलंस हें?" असें म्हणत माझे दोन्ही गाल जोरानें चिमटून व पाठींत एक चांगला दणका देऊन माईंनीं मला दाराबाहेर ओढून आणलें. "चल. मेल्या, खालीं चल. आतां चांगली तुझी कणीक तिंबते. निर्लज्ज मेला. कोडग्याला लाज कुठं आहे, एवढं एवढं बोलावं तरी. आता तर तुला जेरबंदाखालीं मार दिला पाहिजे, त्याशिवाय तूं ठिकाणावर नाहीं येणार. जों जों बोलाव तों तों जास्तच करतोस काय?" तोंडाबरोबर हातहि चालूच होते. आपल्या हातून जो अपराध झाला आहे तो आपल्यालाच निस्तरला पाहिजे, असा पोक्त विचार करून होणारी शिक्षा निमूटपणे सोसत होतो. माईसाहेबांनीं मला ओढीत ओढत एकदाचे खालीं आणलें. बाई व सीताबाई पडवींत हिंदोल्यावर बसल्या होत्या, गंगुमामा तेथेंच घडवंचीवर असलेल्या बिछान्याच्या वळकट्यावर खालीं पाय सोडून बसले होते व तोंडानें कांहीं तरी गुणगुणत होते. आजीच्या मरणानंतर सीताबाई बहुतेक वेळ आमच्या घरींच असत. त्यांना स्वतःला आई नव्हती तेव्हां त्या माईंनाच आई समजत. माझा हात शक्य तितका घट्ट धरून माई मला तेथें घेऊन आल्या व बाईकडे वळून म्हणाल्या.

"बने, आज यानं वर जाऊन काय पराक्रम केला तो पहा!" माईंच्या

तोंडांतून ते शब्द निघतांच आमच्याकडे सर्वांची दृष्टी वळली. आमच्या गुन्ह्याचें विवेचन झाल्यावर संध्याकाळीं वरिष्ठ जज्ज–भाऊ आल्यावर काय शिक्षा फर्मावयाची ती फर्मावतील; तोंपर्यंत घरांतून नव्हे एका जागेवरून न हालण्याबद्दल एकमतानें फर्मान सुटून आम्हाला कच्च्या कैदेंत बसावें लागलें. एका कोपऱ्यांत माईसाहेबांनीं आम्हाला जबरदस्तीनें बसविलें. भाऊ आल्यावर काय शिक्षा होणार म्हणून अनिश्चितपणानें मी खालीं मान घालून बसलों. भाऊंच्या कामाच्या कागदावर शाई सांडल्यामुळें ते आपणांस कांहीं तरी जबर शिक्षा करणार म्हणून भीति वाटत होती. माईंच्या तोंडाची सरबत्ती चालूंच होती. मधून मधून सीताबाई दारूगोळा ठासींत होत्या, गंगुमामा कांहीं तरी अर्थहीन वाचाळपणानें बोलून स्वतःच्याच बोलण्यावर खुष होऊन स्वतःच फिदफिद हंसत होते. बाई मात्र कांहींच बोलत नव्हती. माई म्हणाल्या, " काय सांगूं हो सीताबाई, या मेल्या पोर्ट्यानं अगदी भंडावलं आहे बाई ! मी पुष्कळ मुलं पाह्यलींत, पण याच्यासारखं द्वाड अन् अवलक्षणीं पोरं एकहि नाहीं पाह्यलं. माझा गंगु नव्हतां कां लहानपणीं अचपळ पण याच्यासारखे खेळ नव्हते त्याचे."

"हो, लहानपणीं मी किती शहाणा होतो खरं ना माई !" गंगोबा फुलून म्हणाले.

" खरंच, माझा गंगु लहान होता, तेव्हां शेजारचीं पाजारचीं त्याचं अगदीं कौतुक करीत. जें तें म्हणे माई, तुमचा मुलगा फार नशीबवान निघेल पुढं ! " अभिमानानें माई म्हणाल्या.

" हो. मग मी आहेच नशीबवान. पुढं तूं पहाशील मी कसं नाव काढीन ते." गंगोबा अधिक खुष होऊन म्हणाले.

" पण तूं शाळेतबिळेंत जात नाहसि तेवढंच जरा वाईट आहे. शाळेत जाऊन चांगला शिकतास तर खरोखरीं तूं पहिल्या नंबरीं पास होत जाशील. तुझी बुद्धि आहे चांगली पण तुला साऱ्या गोष्टीचा कंटाळा. पुढं चांगलं नांव काढायला शिकायला नको कां ? "

" अग, शिकूनच नांव काढतां येतं, नाहीं तर नाहीं वाटतं ? मी जरी शिकलों नाहीं तरी बघ कसा होईन तो ! पुष्कळ पैसा मिळविला म्हणजे झालं ना ? पैसा पैसा काय ? लाथ मारीन तिथून खळ्खळ् पैशाचा पाऊस पाडीन बघशील तूं ! पैसे मिळवायला शाळेंतच जायला नको. अंगांत पाणी पाहिजे अन् धाडस. तुला वाटतं मी शाळेंत जात नाहीं म्हणून, स्वतःला कळत नाहीं न् उगाच बडबड." माईकडे तिरस्कारानें मामा पाहूं लागले. सीताबाईला उद्देशून माई म्हणाल्या,

" हें पहा, सीताबाई, माझ्या गंगुविषयीं माझी खात्री आहेच म्हणा, पण हें कार्टे " माझ्याकडे हात करून " कांहीं चांगलं नाहीं निघायचं. तुम्हाला माझ्या बोलण्याची आठवण येईल पहा; 'मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात ' ती म्हण कांहीं खोटी नाहीं. हा अगदीं चोरटा, लबाड, महाठक होईल अशी माझी पक्की खात्री आहे.

त्याच्यांत एकहि लक्षण चांगलं नाहीं. मोठेपणीं कोणाचे खून पाडायलाहि कमी करायचा नाहीं. त्याच्या बऱ्यासाठीं मी इतकं इतकं बोलतें पण त्याला कांहीं लाज आहे कां त्या गोष्टीची ?" माझ्या भावी आयुष्याविषयीं किती रमणीय चित्र हें ! केवढी काळजी ! माईना खूष करण्यांकरिता सीताबाई म्हणाल्या. "खरंच, माई, माझी तर कधींपासून खात्री झालेली आहे, हा कसा निघणार तो. तुम्ही त्याच्या बऱ्यासाठीं एवढं करतां पण तुम्हाला कोण बरं म्हणणार आहे ? किती केलं तरी तुमच्याकडे सावत्रपणा येणार, चांगलं केलं तरी वाईट अन् वाईट केलं तरी वाईट. तुम्हाला वाईटपणा आहेच."

"अहो, तेंच तर मी म्हणते ! आम्हाला सावत्रपणाचा बोल आहेच, आपला वर ! आपल्याला मेलं कोणी कांहीं म्हणो; पण त्याचं चागलं व्हावं म्हणून बोलायला जायचं, दुसरं काय ? जगात सावत्र आईला कोणी चांगलं म्हणायच नाहींच. मग आम्हाला कोण म्हणणार ?" माझ्या बरेंपणाविषयीं किती काळजी ही ! क्षणभर थाबून माई म्हणाल्या, "काय हो सीताबाई, मग त्याचं काय झालं, तुम्ही केला कां तपास ?"

"कशाचं ? हं. त्या कुळाचं कां ?"

"हो."

"हो. मी त्याला सांगून तर आले. त्यानं उद्या दुपारीं दोन वाजतां यायचं कबूल केलं आहे पण त्यानं सांगितलेलं सर्व सामान आधीं आणून ठेवा बरं का."

"काय काय पाहिजे ?" माई म्हणाल्या.

"फारसं काहीं नाहीं. थोडीशीं लिंब, एक नारळ ऊद वगैरे आणून ठेवा. म्हणजे झालं. तो फार चांगला आहे बरं कां ! पहा कसा बंदोबस्त करील तो." विश्वासदर्शक स्वरांत सीताबाई म्हणाल्या.

"एकदा आमच्या बनूला गूण आला म्हणजे झालं बाई ! मला अगदीं रात्रंदिवस काळजी आहे. माझी आईची वेडी माया आहे ना ! त्या सासूनीं तर कांहींच केलं नाहीं इतक्यां दिवसांत, माझा जीव राहतो कां !" निःश्वास सोडून माई म्हणल्या.

"तुम्ही कांहीं काळजी करूं नका अगदी. त्यानीं कित्येकांना गुण दिले आहेत. बरं आतां संध्याकाळ झाली मी जाते." असे म्हणून सीताबाई जावयाला निघाल्या व जाता जाता "तेवढं सामान आणून ठेवायला विसरूं नका बरं कां ?" असें सांगून त्या गेल्या.

दिवस जसजसा मावळून संध्याकाळ होऊं लागली, तसतशी माझी भीतिहि दुणावूं लागली. घड्याळ्यांत सहाचे टोले ऐकून माझ्या हृदयांतले टोले अधिक जोरानें उडूं लागले. भाऊ आल्यावर मला काय शिक्षा व्हायची आहे, ती केव्हां एकदां होते, असें मला होऊन गेले. दिवे लागण्याच्या सुमाराला भाऊ आले. आतां

भाऊंचें समन्स येईल असें किती वेळपर्यंत तरी मला वाटत होतें. परंतु बराच वेळ पर्यंत मला कोणी बोलाविलें नाही. मी जेथें बसलो होतो; तेथें कांहीं वेळानें भाऊ स्वत:च आले; त्यांना पाहून मी अधिकच खालीं मान घालून रडूं लागलो. भाऊंनीं मला उठवून विचारलें.

" वरचा दिवा कोणी फोडला चंदू?" त्यांच्या आवाजावरून ते रागावले आहेत असे मला वाटलें नाही. त्यामुळें मला बराच धीर आला व माझ्या हातून जो अपराध घडला तो अडखळत अडखळत मी कबूल केला.

" दिवा फुटला तर फुटला: पण माझे कामाचे कागद मात्र बिघडविलेस. आतां पुन: माझ्या लिहायच्या खोलीत खेळत जाऊं नको." भाऊंनीं सौम्यपणानें सांगितलें. मी भाऊंच्या जवळ फारसा कधींच बोलत नव्हतो तरी आज मला असें झाले कीं, त्यांच्या कमरेला मिठी मारून खूप रडावें व माई आपल्याला कशा रीतीनें वागवते तें सांगावें. मला अगदीं पितृप्रेमाचें भरते आलें होतें. परंतु तितके शब्द बोलून भाऊ तेथून निघून गेले व ती वेळहि गेली!

मला बरीच कडक शिक्षा होईल असे माईंना वाटत होतें, पण त्यांच्या अंदाजाच्या उलट भाऊंचे वर्तन पाहून त्यांच्या अंत:करणांत काय झालें असेल तें त्यावेळीं तरी मला समजले नाहीं.

दुसऱ्या दिवशीं भाऊ स्नानाला आंत आले तर गंगोबाचें पुढील शब्द त्यांच्या कानावर गेले. " माई, हीं लिंबं कशालाग? त्या बुवानीं सांगितली म्हणून वाटतं."

" गंग्या, तुला कांहीं समजत नाहीं. तुला कुणी पंचाईत करायला सांगितलं आहे," माई चिरंजीवावर ओरडून म्हणाल्या. त्यावर गंगोबा हंसत हंसत म्हणाले,

" मला जसं माहितच नाही कां? काल सांताबाई काय सांगत होत्या तें?" बुवा व लिंबे हें काय प्रकरण आहे, तें भाऊंच्या लक्षांत तेव्हांच आलें. त्यांनीं गंगोबाला हांक मारली.

" गंगाधर, इकडे ये पाहूं." गंगोबा हांकेसरसे आले व आश्चर्यानें भाऊंच्या तोंडाकडे तोंड वासून पहात उभे राहिले. गंगोबा भाऊंचे शालक होते, तरी ते भाऊपेक्षां पुष्कळ लहान असल्यामुळे भाऊ त्यांना एकेरी नांवानें संबोधीत. गंगोबाकडे पहात भाऊ म्हणाले. " काय रे, तीं लिंबें कशाला आणलीं आहेत? आणि बुवाचें काय काम आहे?"

" मला कांहीं माहित नाहीं." कानावर हात ठेऊन गंगोबा म्हणाले.

" नाहीं म्हणजे? मी माझ्या कानांनीं आतां ऐकलें तुला बोलताना आणि नाहीं म्हणतोस?" कपाळाला आठ्या चढवून रागानेंच भाऊ म्हणाले. " माझ्या घरांत असले प्रकार बिलकुल चालायचे नाहींत. कोणी ढोंगी बुवाबिवा आलेला मला समजला तर पहा. कसलें ढोंग माजविलें आहे? असल्या ढोंग्यांना माझ्या घरांत आणलेलें मला मुळींच खपणार नाहीं. कोणाला भूत लागलं आहे इथें? माझ्या

कानावर या गोष्टी पुनः आल्या तर पहा ! " इतकें बोलून भाऊ मागच्या दारीं चालते झाले. माईचा स्वभाव फार कडक होता, तरी त्या भाऊंना भीत असत. भाऊंच्या पुढें बोलण्याची त्यांची छाती नव्हती. जी गोष्ट भाऊंनीं एकदां नाहीं म्हटलीं ती करण्याची बाईची अगर माईची प्राज्ञा नव्हती ! गंगोबाच्या मूर्खपणामुळें सारा बेत फसला व त्या दिवसापासून पंचाक्षरी, देवऋष्यांचें नांव आमच्या घरांत पुनः ऐकूं आलें नाहीं व सर्वांस– विशेषतः सीताबाईंना–रात्री दिसणारें भूत पुनः दिसलें नाहीं.

---

## स्मृति सातवी.

# बालमित्र.



पूर्वीसारखा आता मी निष्काळजी राहिलो नव्हतो. माझे कपडेलत्ते मी जागच्या जागीं ठेऊं लागलो. पाटीपुस्तकेसुद्धा नीट ठेवीत असे. परंतु गंगुमामाच्या व्रात्यपणामुळे कधीं कधीं माझे दप्तर ठेवलेल्या जागेवरून कोठें तरी दडून बसें. माझें दप्तर वगैरे लपवून त्या निमित्तानें मला साऱ्याघरभर फिरविणे, माझ्या पाटीवरचीं उदाहरणें पुसणे, मी वाचीत असलो म्हणजे झटकन् माझ्या हातून पुस्तक ओढून घेणें वगैरे चाळे करून मामा मला विनाकारण सतावून सोडीत. माझ्या अभ्यासांत व्यत्यय आणून मला त्रास देणे म्हणजे त्यांचा रोजचा क्रम असे. त्यांच्या त्या वात्रटपणावर कोणत्याहि प्रकारें तक्रार करण्याचा मला अधिकार नव्हता. स्वतः मामाना अभ्यासाचा कंटाळा असे, कोणत्याहि पुस्तकाकडे पाहिलें असतां त्यांचें डोकें दुखत असे. आमच्या येथें आल्यावर त्यांनीं शाळेंत दाखल व्हावे म्हणून भाऊंनी पुष्कळ सागून पाहिले. परंतु शाळेंत न जाण्याचा त्यांचा निश्चय कायम होता. कोणत्याहि शाळेचे अगर मास्तराचें मुखावलोकन करायचें नाही, म्हणून त्यांनी भाऊंना चक्क सांगितले. त्यानंतर त्यांचे नाव घ्यायचे भाऊंनी सोडून दिले. मामा त्यावेळीं अठराएकोणीस वर्षांचे होते, परंतु त्यांना साधारण हिशेबवगैरे देखील येत नसे. त्यांचा उद्योग म्हणजे सकाळीं नऊ वाजतां उठून मुखमार्जनादि झाल्यावर चहाचे दोन पेले घशाखालीं उतरवून गांवांतून एक फेरफटका करून यावयाचं, त्यानंतर स्नान जेवण वगैरे झाल्यावर दुपारीं तण्णावून निजावयाचं, तें तीन साडेतीनच्या सुमारास उठून पुनः त्यांची लहर लागेल त्याप्रमाणें एकदोन गरमागरम चहाचे पेले गट्ट करून गांवांत भटकावयाला जावयाचें तें परत दिवे लागतां घरीं यायचं. गांवांत गंध्यांच्या दुकानीं विड्यांचा धूर सोडतांना व पट्ट्या खाऊन पचापच पिचकाऱ्या टाकतांना, मी शाळेंत जातांना रोज पहात असे. नाटकांतल्या छिचोर शृंगारिक पदांच्या ताना आपल्या बेसूर आवाजानें काढून ते आपली करमणूक करून घेत असत. परंतु भाऊ घरांत असतां त्यांच्या ताना त्यांना ऐकूं जाणार नाहीं अशी ते काळजी घेत. केंसांना सपाटून तेल लावून घडोघडीं त्यावरून हात फिरविण्याची त्यांना संवय होती. त्यांच्या

भाषणांत नेहमीं आत्मप्रौढी फार असे. आपल्या भावी आयुष्याचें मनोहर चित्र रेखाटून आपल्या आईला ते अगदीं गारेगार करून सोडीत. आपण फार मोठे कर्तृत्ववान् प्रसिद्ध पुरुष होणार आहोंत असें ते मोठ्या अभिमानानें सांगत असत. हिंदोळ्यावर बसून आपल्या पुढील आयुष्याचें सुंदर भविष्य आपल्या मातेला सांगत आहेत; व माई मोठ्या उत्सुकतेनें तें ऐकत आहे, बाईहि गळपट्टा विणतां विणतां आपल्या भावाकडे कुतूहलानें पहात आहे, आणि सीताबाई डोळे मोठे करून व तोंड उघडून लक्षपूर्वक ऐकत आहेत; तें चित्र अद्यापिहि माझ्या दृष्टीसमोर दिसत आहे!

बालवयांत खेळण्याकडेच बालकांची विशेष प्रवृत्ति असते. बरोबरीच्या सवंगड्या-बरोबर खेळण्यांत जो निरतिशय आनंद वाटतो तो इतर कशातहि वाटत नाहीं. शाळेत जाणाऱ्या मुलांना घंटा केव्हा होते व आपण घराकडे केव्हां धांव घेतो असें होऊन त्याचे कान घंटेच्या नादाकडे वेधलेले असतात. पण माझी त्याच्या उलट स्थिति होती. घंटेला वेळ होऊन जर मला जास्त वेळ शाळेंत रहावें लागेल तर बरें असें मला वाटत असें. शाळेत ज्या ज्या गोष्टी घडत त्या घरीं कोणाला तरी सांगाव्या असे मला फार वाटे. आपल्याला एकादा भाऊ अगर बहीण असती तर किती चांगलें झालें असतें असें मनात येऊन मला वाईट वाटे. माझ्या कोणत्याच गोष्टींत घरच्या कोणा माणसाला कौतुक वाटण्यासारखें नव्हते. एखाद वेळेस काहीं आनंदाची बातमी सागावीशी वाटली तर ती मी भीमाजवळ सागावी, तिला त्यांत विशेष अर्थ कळत नसे, पण ती ती एकाग्रतेने ऐकून घेई. तेवढ्यानेच मला हर्ष होई.

आमच्या वर्गात दोन तट होते; एका तटाचा मुख्य गोपू होता व दुसऱ्या तटाचा एक गोविंदा म्हणून आमच्याहून दोन तीन वर्षांनीं मोठा मुलगा होता. बाबू गोविंदाच्या तटात होता, तेव्हां जिकडे बाबू तिकडे मी असायचाच! एके दिवशीं अभ्यासाच्या निमित्तानें मी बाबूच्या घरीं गेलों होतो. बाबूची धाकटी बहीण शांता त्यावेळीं चार वर्षांची होती, ती एकटीच पुढच्या ओटीवर खेळत होती; "बाबू कुठं आहे?" मी तिला विचारलें, तेव्हां माझ्याबरोबर चल बाबू दाखवते म्हणून बोबड्या बोलात मला सांगून ती घरात गेली. मीहि तिच्या मागोमाग आंत गेलो. ज्या खोलींत बाबू होता तेथें ती मला घेऊन गेली व म्हणाली 'बाबूला दादांनीं इथं कोडून ठेवलं आहे'. खरोखरींच त्या खोलीला बाहेरून कडी होती. तितक्या उंच माझा हात पोहचणे शक्य नव्हतें. म्हणून मी बाबूच्या आईकडे गेलो तों त्या घरांत जात्या-वर काहीं दळत होत्या. मला पाहिल्याबरोबर त्यानीं "का आलास?" म्हणून मला प्रश्न केला. 'बाबूला का कोंडून ठेवले' म्हणून मी त्यांना विचारलें असतां दुपारीं बाबूला वडिलानीं त्याच्या मनांत नसता बळेच अभ्यासाला बसाविलें तेव्हां गणितांत मुद्दाम चुका करून वडिलाचें न ऐकल्याबद्दल संध्याकाळपर्यंत त्याला कोंडून ठेवण्याची शिक्षा दिली आहे असें त्यांनीं मला सागितलें. त्याला आतां सोडा असें मी सागत होतो तों बाबूचें वडील तेथें आले. माझ्या विनंतीवरून बाबूची शिक्षा कमी होऊन त्याला मोकळा करण्याचें त्यांनीं कबूल केलें व ज्या

खोलींत बाबू होता त्या खोलीच्या दाराची कडी काढली. दाराकडे बाबूची पाठ होती; त्यामुळें तो काय उद्योग करित होता हें आम्हाला प्रथम दिसलें नाहीं. परंतु दार वाजतांच जेव्हां त्यानें आमच्याकडे तोंड वळविलें, तेव्हां त्याच्या तोंडाकडे पाहून मला व काकांना एवढें हंसू कोसळलें कीं, आम्ही कां हसतो म्हणून पाहण्याला काकीहि तेथें आल्या व त्याहि हंसूं लागल्या. बाबूहि मोठमोठ्यानें हंसूं लागला. आम्हाला सर्वांना हंसताना पाहून धाकटी शांताहि हंसूं लागली. इतकें हंसण्याचें कारण असें कीं बाबूला खोलींत कोंडला तेव्हां काकांनीं त्याला कित्ते काढावयास दिलें व हें कित्ते पुरे केल्याशिवाय तुला सोडणार नाहीं म्हणून सांगून ठेवलें. परंतु त्यानें कित्ते न काढतां आपल्या तोंडावर सर्वत्र शाईची चित्रविचित्र चित्रें व मिशा काढून आपलें तोंड इतकें चमत्कारिक केलें होतें कीं, त्याच्याकडे पहातांच आम्हाला हंसता हंसता पुरें पुरें होऊन गेले. बाबूनें तोंड स्वच्छ धुतल्यानंतर आम्ही दोघे कांहीं वेळ खेळलो व नंतर अभ्यास करून मी घरीं गेलो. दुसऱ्या दिवशीं बाबूच्या तोंडावर शाईचे पुसट डाग होतेच. काकांनीं बाबूला जें बंधन केले त्यांत व मला कांहीं काळापूर्वी माईनीं बंधन केलें होतें त्यांत किती अंतर होतें !

बाबूचे वडील गोविंदराव ( यांना मी काका म्हणत असें. ) मामलेदार कचेरींत एक कारकून होते; त्याचा पगार बेताचाच होता व वडिलांच्या वेळचें थोडेसें कर्जहि होतें. त्यामुळें त्यांच्या घरची साधारण गरिबीच होती. त्यांच्या कुटुंबात ते दोघे नवराबायको व तीन मुलें, बाबू, त्याची धाकटी बहीण शाता व तान्हा बाळकृष्ण ( त्याला सर्व बाळच म्हणत ) इतकीं असून शिवाय काकाची एक दूरची चुलत बहीण व तिची एक मुलगीहि त्याच्याच आश्रयाला होती. मुलीचें नुकतेंच लग्न झाल्यामुळें तेवढें एक मनुष्य कमी झालें होतें. काकाचा स्वभाव तर चांगला होताच पण काकीहि फार सुस्वभावी होत्या. त्या आपल्या नणंदेला आपल्या सख्या बहिणीप्रमाणें वागवित असत. त्या दोघी मिळून घरांतलीं सर्व कामें हातानेंच करीत.

बाबूचा स्वभाव इतका खोडकर होता कीं तो वर्गात नित्य कोणाची ना कोणाची खोडी करीत असे. गोपूचें व बाबूचें अगदीं खडाष्टक असें. गोपू जरी दांडगाई करी, तरी त्याचें बाबूपुढें कांहीं चालत नसें. शाळा सुटल्यावर सर्व मुलें आपणास प्रथम जावयाला मिळावें म्हणून घाई करीत. आमची शाळा ज्या इमारतींत होती त्या इमारतीचा खालचा भाग मोडकळीस आला होता म्हणून माडीवर वर्ग भरत असत. खालीं यावयाला एकच चिंचोळा जिना होता व त्या जिन्यावरून उतरण्याला जो तो पुढच्याला लोटून आपण पुढें जाण्याचा प्रयत्न करी. असें रोजच चाले. त्यांत धटींगण मुलें गरीब मुलांना मागें ओढून आपण पुढें निघून जात. एके दिवशीं गोपू एका लहान सहासात वर्षांच्या मुलाला मागें लोटून आपण पुढें जाऊं लागला तों त्याच्या हातांतून त्याचें दप्तर निसटून खालीं पडलें व पाटी फुटली. पाटी फुटलेली पहातांच गोपूला त्या मुलाचा अतिशय राग आला व कांहीं विचार न करतां त्यानें त्या मुलाला असा

एक जोराचा ठोसा लगावला कीं, तो बिचारा गडबडत दोनतीन हातांवर जाऊन पडला. वास्तविक पहातां पाटी गोपूच्या स्वतःच्या हातूनच फुटली, पण पाटी फुटल्यामुळें घरीं बसणाऱ्या माराचा वचपा त्याला कोणावर तरी काढावयाचा होता. मी व बाबू गोपूच्यामागेंच होतो. गोपूचें हें निर्दयपणाचें कृत्य पाहून आम्हाला दोघांनाहि त्याचा राग आला. त्या पडलेल्या मुलाला मी उठवायला गेलो तों गोपू माझ्या अंगावर चवताळून धांवला. माझ्यावरहि त्यानें हात उगारला. हें पहातांच तेथेंच उभा असलेल्या बाबूनें गोपूच्या पाठींत जोरानें एक बुक्की ठेऊन दिली. आतां मात्र गोपूचा क्रोध अनावर झाला. लागलींच मोर्चा फिरवून तो बाबूकडे वळला व दोघांत मारामारी सुरूं झाली. गोपू मोठा व राकट होता. त्याच्यापुढें बाबू तेव्हाच हार जाईल असें मला वाटले. गोपू बाबूला मारीत होता व बाबूहि गोपूला ठोश्यावर ठोसे चढवित होता. अर्धी अधिक मुलें निघून गेलीं होतीं. जीं मागें होतीं तीं आतां या दोघां भोंवती जमा झालीं. आमच्या वर्गांतलीं काहीं मुले होतींच त्यापैकीं कांहीं गोपूच्या तटाचीं व कांहीं आमच्या तटाचीं होतीं. गोविंदाहि होता; परतु ही मारामारी कशावरून झाली हे त्याला माहित नव्हतें. मी त्याला खरी घडलेलीं हकीकत सांगितली तेव्हा त्यालाहि गोपूचा राग आला. त्यानें हेडमास्तरांना सर्व हकीकत सांगून त्यांना तेथें आणलें. हेडमास्तर येतांच सर्व गडबड शांत झाली! त्यांनीं प्रथम ज्या मुलाला गोपूने मारलें त्याला हकीकत विचारली. त्याने खरी तीच सांगितली. बिचाऱ्याचा दांत ओठांवर जोरानें लागून त्यातून रक्त वहात होतें व तो रडत होता. नंतर हेडमास्तरांनीं मला विचारलें त्यावरून खरा दोष गोपूचाच आहे हें मास्तरांना कळून चुकलें. मास्तरानीं दुसऱ्या दिवशीं याची चौकशी करूं, आतां तुम्ही आपआपल्या घरीं जा म्हणून सर्वांस सागितलें. तेव्हा सर्व मुलें जावयाला निघालीं. गोपूला व बाबूला बरेंच ठिकाणीं लागलें होतें, बाबूचें डोकें भिंतीवर जोरानें आपटल्यामुळें त्या जागीं भलें मोठें टेंगूळ आले होते.

दुसरे दिवशीं हेडमास्तर आमच्या वर्गांत आले. त्यानीं गोपूला आंगठे धरून एकतास उभे राहण्याची शिक्षा दिली. त्या लहानं मुलाला—शंकरला—सोडविल्याबद्दल बाबूला शाबासकी दिली आमच्या वर्गावरच्या मास्तरांना गोपूकडे बरोबर लक्ष देण्यास सांगून ते निघून गेले. गोपूनें ओणव्यानें आंगठे धरले होते, त्यामुळें त्याची टोपी खालीं पडून त्याची शेंडी नारदाच्या शेंडीसारखी उभी राहिली होती, त्याच्या नाकातोंडातून व डोळ्यांतून त्रिवेणीसंगमाचें बिंदू खालीं टिबकत होतें, व मधून मधून हळूंच डोकें वर करून तो वर्गांतल्या मुलांकडे पहात होता. तो वर डोकें करून पहात असतां मी व बाबू गालांतल्या गालांत हंसत आहोंत असें त्याला दिसलें. तेव्हां तो आमच्यावर फार रागावला असें आम्हाला वाटलें. आधींच आमचें व त्याचें सूत नव्हतें, आतां तर विचारायलाच नको!

त्यानंतर दोन महिन्यांनीं आमची वर्षिक परिक्षा होऊन गोविंदा पहिल्या, मी दुसऱ्या व बाबू तिसऱ्या नंबरीं पास होऊन चौथ्या वर्गांत गेलो. गोपूहि आमच्या वर्गांत आला.

आम्ही चवथींत आल्यानंतर तीनचार महिन्यानंतरची गोष्ट.आमच्या वर्गावर जे मास्तर होते ते फार कडक होते. कांहीं अपराध नसतां ते विनाकारण मुलांना शिक्षा करीत. त्यामुळें आम्हा सर्व मुलांना त्यांचा आदर न वाटतां उलट अनादरच वाटे. त्यांना स्वतःच्या शहाणपणाची फार घमेंड असे.'इतर सर्व मास्तर मूर्ख आहेत; हेडमास्तर सुद्धां मला विचारून सर्व करतात,सुपरिंटेन्डन्टला असा मी खडखडावून टाकला,डेप्युटीला असा जाब दिला.' अशा बाता ते रोज पुनःपुनः आम्हांला सांगत. आम्हाला त्यांच्या त्या बातांचा कंटाळा येऊन मास्तरांचाही कंटाळा वाटूं लागला.बोलतांना डावा डोळा मिटून व डाव्या बाजूचे ओष्ठद्वय वर चढवून बोलण्याची त्यांना संवय होती.ते जी एक पुणेरी पगडी घालून येत, ती किती पुराणी आहे व तिनें किती पावसाळे पाहिले आहेत याचा नक्की अंदाज करणें कठीण होतें. पगडीखालून त्यांच्या शेंडीची एक बट नेहमीं बाहेर डोकावित असे. तशीच त्यांची एक पुराणी छत्री बुडाला पांढरें ठिगळ दिलेली त्या पगडीची जुळीबहीणच असावी असे वाटत होतें. हिंवाळा, पावसाळा किंवा उन्हाळा केव्हांहि पहा ती छत्री त्यांचीं सांगातीण असे ! वर्गांत ज्या कोंपऱ्यांत त्यांची छत्री असें तिकडे ते क्षणोक्षणीं पहात असत न जाणों अशीं अमूल्य वस्तु चोरीस जाइल अशी त्याना भीति वाटत असावी !

बाबूचा व माझा नंबर बहुतकरून नेहमीं जवळजवळच असे. एखादवेळीं माझा नंबर खालीं गेला तर, बाबूहि उत्तरें बरोबर न देऊन, उदाहरणें मुद्दाम चुकवून माझ्या-जवळ खालच्या नंबरावर येऊन बसे. कधीं कधीं तो आपल्या पाटिवर वर्गांतल्या सर्व मुलाची मास्तरासगट चित्रें काढीत असें. एकदा त्यानें आमच्या मास्तरांचें एक चित्र काढलें होतें. त्या चित्राच्या उजव्या डोळयाच्या जागीं एक मोठें टिंब व डाव्या डोळयाच्या जागीं एक लहान टिंब काढून, मिशा चवरीसारख्या काढल्या होत्या. पगडीच्या जागीं एक हिमालय काढून, अर्धवट लोंबणाऱ्या शेंडीच्या ठिकाणीं गंगानदी व एका हातांत छत्री केरसुणीच्या आकाराची काढली होती. ते विलक्षण चित्र पाहून माझें हंसूं मला आव-रेना व मी बऱ्याच मोठ्यानें हंसलों. मास्तराना तें ऐकूं आलेंच. आह्मीं कां हंसतो हें त्याना कळलें नाहीं, पण त्या पाटकिडे पाहून हंसतो एवढें मात्र ते समजलें व ती पाटी बाबूला आपल्याकडे आणावयास त्यांनीं सांगितलें. तो पाटी नेईना तेव्हां मास्तर स्वतःच रागानें उठून येऊं लागले, बाबूनेंच चटकन पाटीवरचें चित्र पुसून टाकलें, इतक्यांत मास्तरानें त्याच्याहातून पाटी ओढून घेतलींच. त्यावरचें पुसट चित्र पाहून ते बाबूवर रागावलें, ' वर्गांत असलीं चित्रें काढतोस काय ? दम धर ' म्हणून त्याचें कान पिळगटून त्याला शाळा सुटेपर्यंत वर्गांत अगदीं शेवटीं उभें केलें. एवढे बरें झालें कीं तें चित्र कोणाचें हें त्यांना कळलें नाहीं !

जेव्हां तेव्हां मास्तर अशी शिक्षा करतात म्हणून त्यांसही तसेंच कांहीं शासन करावें असें बाबूनें ठरविलें. दोन तीन दिवसांपासून आपल्या खिशांत कांहीं तरी वस्तू बाबूने लपविली आहे, असा मला संशय आला. परंतु त्याला विचारलें तर तो सांग-

णार नाहीं हें जाणून मी त्याला त्याबद्दल विचारलें नाहीं. ते दिवशीं गुरुवार होता. मी आज लवकर दोन वाजण्यापूर्वीच शाळेंत आलों होतो. आमच्या गांवांत मराठी शाळा दोन वेळ भरत असे; सकाळीं सातापासून दहापर्यंत व दुपारीं दोनपासून पांच वाजेपर्यंत. मी आलो तेव्हां वर्गात कोणीच मुलें आलीं नव्हतीं. आमचें मास्तर मात्र दाराकडे पाठ करून टेबलावर वाकून कांहींसें लिहीत उभे होते. मी दाराच्या बाहेरच उभा होतो. मास्तराच्या मागून हळूहळु बाबू त्यांच्या अगदीं जवळ आला व मला न बोलण्याविषयीं त्यानें खूण केली. तो माझ्यापूर्वीच येऊन पलीकडच्या दारानें आंत आला असावा. पाय न वाजवितां हलकेंच मास्तरांच्या मागें येऊन त्यानें त्यांच्या कोटाला खालच्या बाजूला एक कागदाचा तुकडा टांचणीनें टोंचून ठेविला व आला तसा चोरपावलांनीं तो पलीकडच्या दारानें बाहेर निघून गेला. तोंच मास्तरांची दृष्टी माझ्याकडे वळून 'काय आहेरे!' म्हणून त्यांनीं ओरडून मला विचारलें. 'कांहीं नाहीं' म्हणून मी तेथून पळून गेलो. आतां एकएक मुलें जमूं लागलीं. मास्तरांच्या पाठकिडे पाहून जो तो हंसूं लागला. आह्मीं सर्व मुलें वर्गांत बसलो होतो व मास्तर आम्हाला फळ्यावर उदाहरणें समजावून सांगत होते. फळ्याकडे पहाण्याचें सोडून सर्व मुलें मागें त्या लोंबणाऱ्या कागदाच्या तुकड्याकडे पाहून हंसत होतीं. मास्तरांना त्यांच्या शेंपटीविषयीं सांगण्याचें एकालाहि धारिष्ट होईना! इतक्यांत कशालासें हेडमास्तर आमच्या वर्गांत आलें; आम्ही सर्व मुलें एकदम उभें राहून त्यांना खडीताजीम दिली. हेडमास्तरांची नजर आमच्या मास्तरांच्या शेंपटावर जाऊन त्यांनाहि हंसूं आलें. त्यांना हंसतांना पाहून इतका वेळ वर्गांतल्या सर्व मुलांचें आंतल्याआंत येणारें हंसें इतक्या जोरानें बाहेर फुटलें कीं, तो सारा वर्ग व त्यांच्या शेजारचे दोन्ही वर्ग हंसण्यानें दणदणून गेले. हंसण्याचें कारण न समजून आमचे मास्तर मुलांना गप्प बसण्यास डोळे वटारून सांगत होते. काय झालें म्हणून पाहण्याला शेजारच्या वर्गांतले मास्तर व त्यांच्यामागें कांहीं मुलांचीं डोकीं आमच्या वर्गाकडे हळूंच डोकावून पहात होतीं. हंसूं दाबून हेडमास्तर म्हणाले.

"अहो, चिंचपोकळे, (आमच्या मास्तरांचें आडनांव,) हा कसला कागद तुमच्या मागें लोंबत आहे?"

"अं? कोठें?" आश्चर्यानें मास्तर उद्गारले व मागें पाहूं लागले. तों खरेंच एक कागदाचा तुकडा त्यांच्यामागें लोंबत आहे. त्यांनीं तो कागद जोरानें ओढला, त्याबरोबर टांचणी होती तेवढा कागद राहून बाकीचा त्यांच्या हातांत आला. आतां सर्व वर्ग हंसण्याचें कारण त्यांना कळलें. त्या कागदावर मोठाल्या अक्षरांत पुढील प्रमाणें लिहिलें होतें "मी फार शहाणा आहे. मला सर्वजण नमस्कार करीत जा. मी फार मोठा आहे. मी फार हुशार आहे." त्यावेळचा आमच्या मास्तरांचा चेहरा पहाण्यासारखा होता. मला त्यांची कींव आली! हेडमास्तर तेथें लवकर आले नसतें तर हें त्यांच्या शहाणपणाचें ओझें त्यांना आणखी किती वेळ वहावें लागलें

असतें कोण जाणे ? हेडमास्तर तेथें असल्यामुळें ते फार बोलूं शकले नाहींत. हेडमास्तर म्हणाले:—

" मुलांनो, तुमच्यापैकीं कोणाचें तरी हें काम आहे, कोणी हा वात्रटपणा केला सांगा पाहूं ? खरें सांगाल तर शिक्षा होणार नाहीं. " कोण बोलणार ! सर्वच चूप होते. पुनः ते म्हणाले. " असला वात्रटपणा करणें चांगले नव्हे. ज्यानें हें केलें असेल त्याला कडक शिक्षा होईल सांभाळा बरें कां ! कोणी केलें त्यानें मुकाट्यानें सांगावें. " तरी कोणी बोलत नाहीं हें पाहून ते म्हणाले. " मुलानो, आपल्या मास्तराची अशी थट्टा करणे अगदीं गैर होय, तुमच्यापैकींच कोणाचे तरी हे कृत्य आहे व आतां आपला अपराध कबूल करीत नाहीं याबद्दल मला फार खेद होत आहे. मास्तरांची अशी मस्करी करणे वाईटच आणि आपला अपराध कबूल न करणें तर त्याहून वाईट ! आपला अपराध जो स्वतः कबूल करील त्याला मी क्षमा करीन, पण त्याने न सांगतां जर मला ही गोष्ट दुसरीकडून कळली तर त्याला मी मोठी शिक्षा करीन. " इतके बोलून ते निघून गेले. बाबूला आतां आपल्या कृतीचा खेद झाला आहे असें त्याच्या खजील चेहेऱ्यावरून दिसत होतें. परंतु आपला अपराध कबूल करण्याला त्याला आतां धीर होईना. हेडमास्तर बाहेर पडतांच आमचे मास्तर मोठी गर्जना करून म्हणाले.

" मुलांनो ! कोणी हा वात्रटपणा केला ते सांगा नाही तर मी साऱ्या वर्गातल्या मुलांना झोडपून काढीन व उरफाटे टांगून ठेवीन. गाढव शिंचे ! " रागानें त्यांचे सर्वांग थरथरत होते. वर्गांत कोणालाच माहित नसल्यामुळें कोणीच कांहीं बोलेना ! कांहीं वेळापूर्वी सर्वांची हंसरीं दिसणारी तोंडे आता भीतिनें घाबरून गेलेलीं दिसत होतीं; जरा वाट पाहून टेबलावर जोराने छडी आपटून तितक्याच जोरानें ओरडून मास्तर म्हणाले.

" बोलता कीं नाहीं ? कां देऊं एकेकांना चांगला खाऊ, " सर्वजण एकमेकाच्या तोंडाकडे पाहूं लागले. ज्याला त्याला वाटे आपल्या शेजारच्या मुलाचाच अपराध आहे. " आता कां सर्वांचीं मुस्कटे बंद झाली, हंसतांना कशी उघडलीं होतींत, बेशरम ! " माझेकडे पाहून " चंद्या, गाढवा, असा ये माझ्या समोर, ' माझें नांव घेतांच प्रथम मी बिचकलो, सर्वांना वाटले की मीच खरा गुन्हेगार, आपल्यावरचें अरिष्ट टळलें म्हणून सर्वांच्या हृदयावरचें दडपण कमी होऊन सर्व वर्ग मला अपराधी समजून आतां काय शिक्षा होणार म्हणून माझ्याकडे पाहूं लागला. मी निमूटपणें मास्तरांच्या समोर उभा राहिलों, माझ्यावर डोळे एवढाले फाडून मास्तर म्हणाले,

" चंद्या, हा कागद कोणी लावला ? "

" मला माहित नाहीं मास्तर ! " मी भीतभीत म्हणालों.

" तुला माहित नाहीं गुलामा ! खोटें बोलतोस होय ! " जोरानें काठीचा प्रहार टेबलावर करून मास्तर म्हणाले. " आज वर्ग भरण्यापूर्वी तूंच आधीं आला

होतास ! मी-माझ्या या डोळ्यांनीं तुला पाहिला आणि नाहीं म्हणतोस ! तसा तूं कबूल होणार नाहींस ! ”

“ मास्तर, मी आधीं आलो खरा. पण मी वर्गाच्या बाहेरच होतो. ”

“ तूं कबूल होणार नाहींच, दम धर, तुझे दोन्ही कान उपटून तुझ्या हातांत देतो. ” असें म्हणत माझ्याजवळ येऊन त्यांनीं माझे कान स्वतःची असेल नसेल तेवढी शक्ति खर्चून जोरानें पकडले. कान उपटून हातीं येण्याच्या ऐवजीं माझ्या डोळ्यात माझें पंचप्राण एकवटून आले !

“ बोलतोस कीं नाहीं खरें ? कां आणखी कांहीं पाहिजे ? कोणाचें हें कृत्य ? ” मास्तर अगदीं चवताळून म्हणत होते.

“ मला माहित नाहीं. ” मी हुंदक्यांत उत्तर दिलें.

“ काय ? ” एक थप्पड लगावून “ अजून खरें बोलत नाहींस काय ? इकडे ये असा, ठेव टेबलावर हात. ” माझे हात धरून त्यांनीं टेबलावर तळहात वर असें ठेविले. पाहिला हुंदका दाबून दुसऱ्या शिक्षेला मी माझी तयारी करून उभा राहिलो. मास्तराजवळ एक वेताची बारीक छडी नेहमीं असे त्या छडीनें त्यांनीं माझ्या तळहातावर सटासट पांचसहा तडाके लगावले. मी हूं, कीं चूं न करीतां घट्ट दात आवळून होणारे दुःख सहन करीत होतो.

“ बोल कोणाचें हे कृत्य ? ” मास्तर म्हणाले.

“ मला माहित नाही ” कसाबसा मी जबाब दिला. माझ्या डाव्या हाताला जोराचा तडाखा लागून त्यातून रक्त येऊं लागलें, मी कबूल होत नाही व आपल्या अपमानाबद्दल आतां चांगला सूड घेतला असें जाणून मास्तरांनीं मला जागेवर जावयास सांगितले. आलेले अश्रू पुसून मी मुकाट्यानें जागेवर जाऊन बसलों.

“ अद्यापिहि तूं कबूल केलें नाहींस, पण उद्यां तुला हेडमास्तराकडे घेऊन जावें लागेल. हें लक्षांत ठेव. ” मला भीति दाखविण्याकरितां मास्तर म्हणाले. मी कांहींच उत्तर केले नाहीं.

इतका वेळपर्यंत बाबू हें सर्व पहात होता; मी जागेवर बसल्यावर त्यानें आपले डोळे पुसून अशा केविलवाण्या मुद्रेनें माझ्याकडे पाहिलें कीं मला झालेले दुःख मी क्षणभर विसरलो. त्या दिवशीं वर्ग अगदीं शांत होता. शाळा सुटल्यानंतर बाबूनें माझा हात धरून मला त्याच्या घरीं उभ्याउभ्या येण्याला सांगितलें व तो बळेंच मला त्याच्या घरीं घेऊन गेला. रस्त्यांत आम्ही कांहींच बोललो नाहीं. घरीं पोंचल्यावर आंतल्या खोलींत आम्हीं गेलों, आमच्याशिवाय तेथें कोणीच नव्हतें. आम्ही दोघेच तेथे आहोंत असें पाहून बाबूनें माझ्या गळ्याला एकदम मिठी मारली व तो रडूं लागला. “ चंदू ! चंदू ! माझ्या मुळं तुला केवढी शिक्षा झाली, काय करूं मला बोलायला धीर होईना ! मी आतां पुनः कधीं असें करणार नाहीं ! ”

" बाबू, जें झालं ते झालं जाऊं दे आतां, तूं रडूं नकोस, काकांना ही गोष्ट कळली तर ते तुला शिक्षा करतील. चल, मला घरीं जाऊं दे आतां." बाबू डोळे पुसून म्हणाला. " चंदू, मास्तरांना तूं माझं नांव कां नाहीं सागितलंस?"

" बाबू, तूं जर माझ्या जागीं असतास तर तूं माझं नाव सांगितलं असतंस काय?" बाबूचा हात हातांत घेऊन मी म्हणालो. त्यावर तो कांहींच बोलला नाहीं. त्या दिवसांपासून आमची मैत्री अधिकच दृढ झाली. " उद्यां हेडमास्तरांकडे मास्तर तुला घेऊन जाणार आहेत ना?" बाबू क्षणभरानें म्हणाला.

" नेतील." मी निष्काळजी दाखऊन म्हणालो. पण उद्या काय शिक्षा होणार म्हणून भय वाटत होतेंच.

" चंदू, मीच उद्या हेड मास्तरकडे जाऊन माझा गुन्हा कबूल करणार आहे. मग ते काय शिक्षा करतील ती करोत"! निश्चयी स्वराने बाबू म्हणाला. मी त्याला पुष्कळ सागितले, पण त्यानें ऐकलें नाहीं. " माझ्यामुळं तुला एवढी शिक्षा झाली व मी भित्र्यासारखा करून सवरून नामानिराळा राहूं काय? नाहीं, आतां तुला मी शिक्षा होऊं देणार नाहीं. तुझ्यापासून मी धडा शिकलों आहे." मला उशीर होऊं लागला म्हणून मी बाबूचा निरोप घेऊन घरीं गेलों.मी जाण्यापूर्वीच मला झालेल्या शिक्षेची रसभरीत बातमी गोपूनें घरीं केव्हांच जाहीर केली होती व माझ्या त्यावेळच्या परिस्थितींत अधिकच भर घातली होती. पण दुसरें दिवशीं मी शाळेंत जाण्यापूर्वीच बाबूनें हेडमास्तराकडे जाऊन आपला अपराध कबूल केला व त्यांची क्षमा मागीतली.हेडमास्तर फार सज्जन असल्यामुळें त्यांनीं बाबूला काहींच शिक्षा केली नाहीं. उलट त्याच्या प्रामाणिकपणा-बद्दल त्याचा गौरव केला व अशी गोष्ट पुनः न करण्याविषयीं त्याला उपदेश केला. असो; माझ्या वरचाहि सर्वांचा वहीम दूर झाला. हेडमास्तरांनीं मलाहि शाबासकी दिली, कारण मी बाबूची शिक्षा सोसली होती; त्यांनी इतर मुलासहि माझे उदाहरण सागितले कीं याला खरें मित्रप्रेम म्हणतात. मला ते म्हणाले " चंदू, बाबूला शिक्षा होऊं नये म्हणून तूं त्याची शिक्षा सोसलीस, पण हें लक्षांत असूं दे की आपणापेक्षां वडील माणसाची अशी भलतीच थट्टा करून दुसऱ्याकडून त्याना हास्यास्पद स्थिति प्राप्त होईल असें करूं नये. चांगल्या मुलांना आपल्या गुरुजनांची थट्टा करणें शोभत नाहीं. बाबूची शिक्षा तूं जशी भोगलीस तशीच वडीलधाऱ्या माणसांची मर्यादा बाळ-गशील तर त्यात तुझें कल्याण होईल. चिंचपोकळ्यानीं तुझ्या कोवळ्या वयाकडे पाहून तुला एवढी शिक्षा करायला नको होती. असो, यापुढें तुम्ही कोणी असे कर-णार नाहीं असें मला वाटतें." मला इतकी शिक्षा केल्याबद्दल ते चिंचपोकळे मास्तरा-नाहि रागावले असें मला कळलें.

---

## स्मृति आठवी.

# आकाश कोसळलें.



सुखाचा अगर दुःखाचा काळ हा एकसारखा पुढें पुढें पळत असतो. माझें बाळपण संपून मी:किशोरअवस्थेंत आलो होतो व लवकरच माझें पाऊल तारुण्यावस्थेंत पडणार होतें. म्हणजे मला नुकतेंच पंधरावें वर्ष लागलें होतें. माझा मराठी चार इयत्तेपर्यंत अभ्यास झाल्यावर भाऊंनीं मला इंग्रजीशाळेंत दाखल केलें होतें. त्याकाळीं ज्ञानाची फार जरूरी भासूं लागल्याकारणानें जो उठे तो इंग्रजीकॉलेजांत शिरकाव करून घेत असे. हिंदुस्थानांतल्या झाडून साऱ्या जातींनीं आपआपले धंदे बाजूला सारून विश्वविद्यालयांतील पदव्या मिळवण्याचा सपाटा लावला होता; ज्याला त्याला आपल्या मुलानें, पुतण्यानें, भाच्यानें कोणती तरी पदवी मिळवून सरकारी नोकरींत शिरून आपलें नांव व नशीब काढावें असें वाटत होतें. मीहि भराभर परिक्षा देऊन वरची एखादी पदवी मिळवून आपल्या घराण्याच्या नावात भर घालावी असें भाऊंला वाटत असल्यास नवल नाहीं. माझें मराठी शिक्षण पुरें होण्यापूर्वीच मला इंग्रजी शाळेंत दाखल करण्यांत आलें. मी दरवर्षी परिक्षेंत बऱ्याच वरच्या नंबरीं पास होत जाऊन पांचव्या वर्गांत होतो. बाबू चवथ्यावर्गातच होता. कारण तो गणितात नापास झाल्यामुळें माझ्यामागें राहिला. तो व मी अद्यापपर्यंत वेगळे झालो नव्हतो. मी पास होऊन वर गेल्याचा जेवढा आनंद झाला; तेवढेंच बाबू मागें राहिल्यामुळे वाईट वाटलें. माझे सर्वच विषय चांगले असत, त्यांतल्यात्यांत संस्कृतात मला सर्वांत अधिक गूण मिळाले होते. वास्तविक त्याचें खरें श्रेय आमच्या त्या मास्तरकडेच होतें. त्यांनीं मला शिकविण्याची जर मेहनत घेतली नसती तर खात्रीने मी इतक्या वरच्या नंबरीं पास झालो नसतो. हुशार विद्यार्थ्यांत माझी गणना होऊं लागली, मला माझ्याविषयीं आत्मविश्वास वाटूं लागून आपण कांहीं तरी प्रतिष्ठितपणा मिळवूं अशी उमेद वाटूं लागली. माझ्या हुशारीची तारीफ ऐकून माझी मान किंचित वर होऊन छाती पुढें येत असे. मला माझ्या हुशारीबद्दल अभिमान वाटत असे, नाहीं असें नाहीं; परंतु त्याबद्दल मी कोणाजवळ बोलून दाखवित नसे. भावी कालाविषयीं मी माझ्या अंतःकरणांत मनोहर चित्र रेखाटून हवेंत उंच उंच मनोरे उभारून माझें घरांतले कष्ट घटकाभर विसरत असे.

कित्येक अभ्यासूं विद्यार्थ्यांप्रमाणें मी चोविस तास अभ्यासांत गढलेला नसे. नेमलेला अभ्यास वेळच्यावेळीं करून बाकीचा वेळ मी नाटकें, कादंबऱ्या, चरित्रें वगैरे वाचण्यांत घालवी. मला लहानपणापासून वाचनाचा नाद फार होता. जी बरी वाईट पुस्तकें मिळतील तीं अथपासून इतिपर्यंत वाचून मी केव्हांच पुरी करीत असे. त्यावेळीं हल्लींसारख्या पुस्तकालयांची विशेषशी सोय नव्हती; तरी ओळखीच्या मुला

करून जीं पुस्तकें मिळविता येतील तितकीं मिळवून वाचण्याचा सपाटा लाविला होता. जुन्या मुसलमानी दंतकथा, अरेबियन नाईट्स, परशियन नाईट्स, कांहीं इंग्रजींची मराठींत झालेलीं भाषांतरें, सोप्यासोप्या इंग्रजी गोष्टी, त्याशिवाय कित्येक मराठी कादंबऱ्या मी वाचून संपविल्या होत्या. कित्येक अद्भुत कथा वाचल्यामुळे माझ्या अंतःकरणांत असे विचार येत कीं कांहीं काळापूर्वी अशा गोष्टी घडत असत तर हल्लीं कां घडूं नये ! अरेबियन नाईट्स मधल्या एखाद्या राजपुत्रासारखें आपल्याला दैव अनुकूल होऊन जर तसे अद्भुत पराक्रम करतां आले तर किती बहार होईल ! त्यावेळच्या माझ्या एकएक कल्पनांचें मला आतां स्मरण झालें कीं, माझ्या मूर्खपणाचें मला हंसूं येते, परंतु त्यावेळीं मी कित्येक गोष्टींविषयीं अगदीं गंभीरपणानें तासच्या तास विशेषतः रात्रीं बिछान्यावर पडल्यापडल्या विचार करीत असे. बाबूइतका दृढ परिचयाचा माझा एकहि स्नेही नव्हता. बाबू खालच्या वर्गांत जरी होता, तरी शाळा सुटल्यावर व मधल्या सुटींत मी व बाबू एकत्र असावयाचेंच. आमचें कधीं कशावरूनहि भांडण तंटा झालें नाहीं. गोपू इंग्रजी दुसऱ्या वर्गांतच होता.

आमच्या गांवीं इंग्रजी मॅट्रीकपर्यंत शिक्षणाची सोय होती. तेव्हां मॅट्रीक होईपर्यंत आपणास येथेंच रहावें लागणार हें मला माहित होतें. शिक्षणाच्या निमित्तानें का होईना केव्हां एकदा घर सोडून दूर जातां येईल असें झालें होतें. आपलें घर सोडून जावयास सर्वांच्या जिवावर येतें, कारण ज्याला त्याला घरीं कोणी तरी प्रेमाचें माणूस असतें त्यामुळें घरचा ओढा असतो, मला तसें कांहींच नव्हतें. या जगांत माझ्यावर जर कोणाचें प्रेम असेल तर ते दोनच प्राणी होते; एक बाबू व दुसरी भीमा. परंतु बाबूचें घर आमच्या घरापासून दूर होतें आणि भीमा घरांत असूनहि तिचें घरांत कांहींच चालण्यासारखें नव्हतें. आपल्या अपत्यावर जसें इतर पित्यांचें प्रेम असतें, तसें भाऊंचें माझ्यावर नाहीं, अशीच लहानपणापासून माझी समजूत झाली होती. त्यांच्या हृदयांतलें पितृप्रेम माझ्या अनुभवास कधींच आलें नव्हतें. घरांत मला ज्या रीतीनें वागविण्यांत येत असे त्याचा प्रतिकार भाऊंना करतां येण्यासारखा असून ते तिकडे का लक्ष देत नाहींत असें मला वारंवार वाटे. वास्तविक पहातां घरांत होणाऱ्या भानगडी त्यांना मुळींच कळत नसत, त्यांना विश्रांतीलाहि फार थोडा वेळ मिळत असे. परंतु माझ्या मतलबी मनाची अशीच समजूत होती कीं त्यांचें प्रेम आपणावर मुळींच नाहीं.

इतक्या दिवसांच्या कालावधींत घरांत जी स्थिति होती ती तशीच होती. फक्त नंगुमामांत थोडा थोडा फरक पडत चालला होता. ते आतां आपल्या भगिनीला किंवा मातोश्रीला मुळींच दाद देत नसत. पूर्वी दोनच वेळां चहा पीत असत, पण आतां चारपांच अथवा लहर लागेल तितक्या वेळ त्यांना चहा लागूं लागला. आपल्या आरशासमोर सिगरेट ओढून ते खुशाल धुराचे लोट सोडीत. एके दिवशीं असेंच मामाहि दोळ्यावर बसून धुराचे लोट सोडून स्वयंपाक घरांतून येणाऱ्या धुरांत भर घालीत होते, बाई आजी-

चिरीत होती, माई सोंवळ्यानें विहिरीवरून पाण्याच्या घागरी वहात होती. पडवींत हिंदोळा नेहमीं टांगलेला असे. हिंदोळा सोडून कांहीं अंतरावर स्वयंपाकघरांत जाण्याचें दार होतें. माई भरलेली घागर घेऊन यावयाला व झोका घेतांघेतां मामांचा पाय माईलाला गावयाला एकच गांठ पडली. माईनीं रागानें तेथेंच दणकन घागर आपटून " हें रे काय गंग्या, मी सोवळ्याने पाणी भरतें हें तुला दिसत नाहीं वाटतं ? " म्हणून गंगोबाकडे रागानें दृष्टीपात केला.

" तुला दिसत नाहीं, कां मला ? " आईकडे वक्रदृष्टिपात करून मामा म्हणाले. " मी झोंका घेत असतां तूं कशाला मध्येंच आलीस, बाजूनें जायला काय झालं होतं. "

" बाजूनं जायचं होतं. " त्यांना वेडावून " कर्म तुझं. जा तूं इथून कां घालूं ही घागर तुझ्या डोचकींत? " जळफळत माई म्हणाल्या.

" माई, जाऊं दे आतां ! दुसरं सोवळं नेस. " बाई म्हणाली व गंगोबाकडे पाहून " गंगु, तूंहि जा बाहेर पाहूं. " पण गंगाधरराव असें कोठचे जायला !

" घालूं दे तिला माझ्या डोक्यांत घागर कशी घालते ती, " माईच्या पुढे उभें राहून मामा म्हणाले " हं. घाल ती घागर मग तुझी गोष्ट आहे, तुला वाटतं मी भीईन तुला कां ? "

" चल, निघ, चालता हो माझ्या पुढून. " माई दोन तीन पावलें मागे मागें होत म्हणाल्या " मला जास्त राग आणूं नकोस. "

" वः ! तुझ्या रागाची जशी मला भीति वाटत असेल. " तिरस्काराने हंसून मामा म्हणाले.

" गंग्या, तूं जातोस कां नाहीं घरांतून–" माईचा राग शिखराला जाऊन माई म्हणाल्या.

" घरांतून ? " मोठ्याने हंसून गंगोबा म्हणाले " जसे घर तुझेंच आहे नाहीं कां ? मला घरांतून जायला सांगायला तुला काय अधिकार ? चल. तूं निघ आधीं बाहेर म्हणजे मी निघतो. तुझ्या कांही बा– "

" हं, हं. गंगाधर, काय बोलतोस तूं हें ! कोणाला बोलतोस ? " बाई घाईनें म्हणाली व गंगोबाला बळेंच हात धरून बाहेर घेऊन गेली. इकडे माईनीं स्वतःचें तोंड बडवून, डोकें फोडून गंगोबावर शिव्यांची लाखोली सुरूं केली होती. यावरून मायलेकरांचें किती सूत होतें याची कल्पना करण्यासारखी आहे. ते दिवशींच तशी गोष्ट घडली नव्हती, अलीकडे तसला प्रकार हमेश होत असे. बाईलाहि आपल्या प्रिय मातेच्या व प्रेमळ बंधुच्या प्रेमकलहाचा कंटाळा आला असावा. गंगोबाला बाहेर घालवून आईची समजूत करण्याच्या भानगडींत न पडतां. भाऊंना अकरा वाजतां जेवण तयार पाहिजे म्हणून मुकाट्यानें स्वयंपाक करण्याच्या तयारीला बाई लागली. मी देवपूजा करीत होतो म्हणून मला हें सर्व सहज ऐकूं आलें. माझी मुंज झाल्यानंतर नित्य देवपूजा मलाच करावी लागत असे.

कधींची वाट पहात असलेली परिक्षा एकदांची सुरू झाली. संस्कृत व इंग्रजीचें पेपर चांगले गेले त्यांत मला अंदाजापेक्षां जास्त मार्क मिळतील असें वाटूं लागलें. आज गणिताचा पेपर होता. परिक्षा सुरू असतां माझ्या शेजारचा मुलगा गणू पेगळे माझ्याच पेपरची नक्कल करीत आहे हे मला कळलें नाहीं. परंतु आमच्या सुपरवायझरच्या नजरेस ती गोष्ट येऊन त्यांनीं एकदां सांगितले कीं, "जर कोणी कॉपीबिपी करील तर त्याला वर्गाच्या बाहेर काढून देण्यांत येईल." तरीपण माझ्याच पेपरवरून गणू कॉपी करीत आहे हे माझ्या लक्षांत आलें नाहीं. अखेर माझ्या निष्काळजीपणाचा परिणाम असा झाला कीं, सुपरवायझरनें आम्हाला दोघांना अर्ध्या परिक्षेंतून उठवून लावले! मला कांहींच माहित नाहीं व मी त्याला माझे पेपर मुद्दाम दाखविले नाहीं म्हणून पुष्कळ सांगून पाहिलें. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाही. झाले! परिक्षा पास होण्यावर ज्या माझ्या उड्या होत्या त्या जागच्या जागीं राहिल्या. मी नापास झालो असतो तरी मला इतकें वाईट वाटलें नसतें!

अर्ध्या परिक्षेंतून काढून लावल्याची गोष्ट भाऊंच्या कानावर गेली. त्याबद्दल भाऊंनीं मला दोष दिला. माझ्यावरचे भाऊंचे प्रेम कधी निदर्शनास येत नसे, तरी ते मला कधींच रागावत नसत. पण तें दिवशीं ते माझ्यावर फारच रागावले; व माझी त्यांनीं फारच निर्भर्त्सना केली. आधींच माझ्या मनाला तीव्र वेदना होत होत्या त्यांत भाऊंच्या रागावण्यानें अधीकच होऊं लागल्या. भाऊंना आपली जरूर नाही असे माझ्या मनानें घेतलें. तें दिवशींची सारी रात्र मी बिछान्यावर तळमळून काढली. माझ्या मनांत नानातऱ्हेचे विचार येऊं लागले. माझ्या सारखा दुर्दैवी जगात कोणी नसेल असें वाटून आईची व आजीची आठवण होऊन मला आतिशय रडूं येऊं लागलें. माझा कांहीं अपराध नसतां सर्वांनी माझाच अपराध काढावा ही किती आश्चर्याची गोष्ट आहे! त्या वेळच्या माझ्या कोवळ्या अंतःकरणाला जगाचा पुरा अनुभव नसल्यामुळे जगांत आणखी काय काय आश्चर्ये आहेत याची कल्पना नव्हती! आता या घरांत आपण राहूंच नये असें मला वाटूं लागले. कोठें तरी जाऊन आपण आपल्या नशिबाची परीक्षा पहावी. असा एक विचार माझ्या मनांत आला. तो विचार मी पुष्कळ वेळ रद्द करून टाकला तरी पुनः तोच तोच विचार माझ्या मनात घोळूं लागला. कित्येक कादंबऱ्यांतून वाचलेल्या नायकाच्या चारित्र्यावरून आपणहि आपल्या स्वतःच्या हुशारीवर जगांत आपला मार्ग शोधून का काढूं नये? या एवढ्या विस्तीर्ण जगात आपणांस कोठेंच कां जागा मिळणार नाहीं! आपण प्रयत्न केल्यास त्यांत खात्रीने यश येईल! असे मला वाटूं लागलें. पुष्कळ वेळ विचार करून अखेरीस घर सोडून जाण्याचा मी विचार केला. मुंबईला जाऊन आपलें पोट भरूं असें मला खात्रीपूर्वक वाटूं लागलें. मुंबईसारख्या भरगच्च लोकवस्तीच्या ठिकाणीं मला एखादें काम मिळून मला माझें पोट सहज भरतां येईल. मला साधारण इंग्रजी व मराठी वाचतां येत होतें, तेव्हां आपणांस कोठें अडचण

पडणार नाहीं; परंतु मुंबईस जाण्याला भाडयापुरते पैसे तरी कोणाजवळ होते ! पैसे कोणाजवळून आणावें ! हा विचार पडला. भिमाला कांहीं तरी सांगून तिच्याजवळून पांच रुपये उसने घेण्याचें मी ठरविलें. मुंबईस नोकरी लागल्यावर तिचें पैसे पाठवून देऊं म्हणजे झालें ! असा कायम निश्चय करून पहाटेच्या सुमारास माझा किंचित डोळा लागला. मला स्वप्नांतहि मुंबईच दिसत होती व तेथें आपण मोठ्या उत्कर्षास पोंचलो आहोत हेंच दिसत होते.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी भिमाला एकीकडे गांठून मला कांहीं जरूरीचें काम आहे म्हणून पांच रुपये दे मी थोडया दिवसांनीं परत देईन, परंतु ही गोष्ट घरांत कोणाला कळवूं नकोस म्हणून बजाऊन सांगितलें. प्रथम तिला कांहीं तरी संशय आला असावा, कारण ती कबूल होईना, पण मला एका मुलाला पुस्तकें घेण्याकरितां पैसे द्यावयाचें आहेत व तो थोडया दिवसांनीं पैसे परत देणार आहे, त्याचेजवळ पैसे नाहीं असें मला सांगायला त्याला लाज वाटते. असें मी तिला सांगितलें. ती गोष्ट त्या भोळ्या भिमाला खरी वाटून घटकाभराने पैसे देण्याचें तिनें कबूल केले. व तिने आपलें वचन खरें केलेंहि. रुपये हातांत पडतांच गृहत्याग करण्याचा विचार मी कायम केला. रुपये मी माझ्या खिशांत ठेवले होते. बाबूला एकदा शेवटलें भेटावे म्हणून मी जाऊन बाबूला भेटून आलो. आज माझा चेहरा असा म्लान कां दिसतो म्हणून बाबूनें किती तरी वेळा विचारलें असेल. पण मी त्याला माझा विचार सागितला नाहीं. कोठें जावयाचें व काय करावयाचें तें सर्व बाबूला सांगावें असें क्षणांत वाटे व क्षणांत सांगू नये असेच वाटे.

बाबूच्या घरून परत येतांना घर सोडून जाण्याचा विचार बराच शांत पडूं लागला. आपल्या हातून हा मूर्खपणा तर होत नाहीं ना ? भाऊ रागावले तर ते वडील आहेत, त्यांच्या बोलण्यावर आपण गृहत्याग करणें शुद्ध वेडेपणा होय, खरें पाहिलें असतां थोडीशी चूक माझीच आहे असें असतां त्याच्या बोलण्यावरून घर सोडून जाणें योग्य नाहीं, असें आतां मला वाटूं लागलें. घरीं पोंचेपर्यंत जाण्याचा विचार बहुतेक थंड पडला.

घरीं आल्यावर मी माझे कपडे काढून ठेविले त्या वेळीं मामांची स्वारी तेथेंच विडी ओढत बसली होती. माझ्या खिशांतल्या रुपयांचा अस्पष्ट अवाज मामांच्या तीक्ष्ण कानांला ऐकूं गेला असावा. घर सोडून न जाण्याचा आतां माझा विचार कायम झाला. ते रुपये संधी साधून परत भिमाला केव्हां द्यावे म्हणून मी विचार करीत होतो. मी खिडकींत बाहेर पहात उभा होतो. इतक्यांत मामांनीं माझा कोट हातांत घेतला व झटकला त्या बरोबर त्यांतले रुपये खळकून वाजले. रुपयांचा अवाज होतांच मी दचकून मागें पाहिलें. माझा चेहरा अगदीं उतरून गेला !

" मामा, मामा कोट—" माझ्यानें पुढें बोलवेना. मामा मोठ्यानें हंसून म्हणाले.

"वः, चंदू. तूं हे इतके रुपये कुठून आणलेस पाहूं तर दे." माझी छाती वेगानें धडधड ऊडूं लागली. माझ्या खिशांतून सावकाश रुपये काढून मामांना आपल्या तळहातावर ठेऊन म्हटलें,

"ओ हो! पांच रुपये! याचं काय करणार तूं चंदू? कोणाजवळून आणलेस हे?"

"मामा, 'ते रुपये माझे नाहींत." मी त्यांना नम्रतेनें म्हणालों. "ते मला द्या पाहूं, ज्याचे आहेत त्याचे मला परत द्यायचे आहेत."

निर्लज्जपणानें हंसून मामा म्हणाले, "हं, मी तरी तेंच म्हणतो कीं, तूं ही एवढी लूट कोठून आणलीस?" त्यांच्या त्या बोलण्याचा मला राग आला.

"मामा, द्या ते रुपये. मी कांहीं कोणाची लूट आणली नाहीं." त्यांच्या हातांतून रुपये घेण्याकरिता मी त्यांच्याजवळ जाऊन त्यांचा हात धरला. मामा माझ्यापेक्षां वस्ताद होते, ते मला अशी थोडीच दाद देणार होते. रुपये मुठींत घट्ट धरून माझ्याकडे विजयानें हंसून पहात ते म्हणाले,

"छे! चंदोबा, तुला हे रुपये असे मिळणार नाहींत. खरं सांग तूं हे कोठून आणलेस तें?"

"मामा, तुम्हाला काय वाटतं मी चोरूनबिरून आणलेत काय?" माझा क्रोध माझ्या ताब्यात न राहून त्यानें जोरानें उसळी घेतली.

"मला काय ठाऊक!" पाजीपणानें हंसून मामा बाहेर पडले. ते रुपयेहि त्यांच्या त्या वज्रमुष्टींत होतेच. पुढे काय होईल याचा अंदाज न होऊन मी अगदीं हताशपणें खिडकीच्या तावदानावर डोके टेकून उभा होतो. मला भीति वाटण्याचें कारण इतकेंच कीं, भाऊ माझ्या हातात कधीं पैसे देत नसत, जी वस्तु लागेल ती आणून द्यावयाची, पण मुलांच्या हातात पैसे द्यावयाचें नाहीं असें भाऊंचें मत होते. त्यामुळें माझ्याजवळ एक पैसासुद्धां नसे. तेथे हे पांच रुपये पाहून त्यांचा समज काय होईल त्याबद्दल मला काळजी पडली होती. मामासारख्या उपद्व्यापी व्यक्तीच्या हातांत ते गेल्यामुळें मला फारच भीति वाटूं लागली. भाऊंना ते कांहीं तरी उलटसुलट सांगतील व आपणास खरें कारण सांगतां येणार नाहीं. घर सोडून जावयाला भिमाजवळून रुपये घेतले असें त्यांना कसें सांगावें? तसें सांगितलें तर ते भिमाला घरांतून काढून सुद्धां लावतील, अशा विचारानें मी तेथें कितीवेळ उभा होतो.

"चंदू" म्हणून भाऊंचा शब्द कानांवर पडतांच स्वप्नांतून एकदम जागा झाल्याप्रमाणें मी दचकून मागें पाहिलें. भाऊ दारांत उभे होते व त्यांच्यामागें गंगूमामा गालांतल्यागालांत हंसत उभे होते. भाऊंच्या त्या वेळच्या त्या ऊग्रमुद्रेकडे पाहून माझी मुद्रा गर्भगळीत झाली. खालीं मान घालून मी उभा राहीलो.

"चंदू, तूं हे पैसे कोठून आणलेस!!" ते रुपये दाखवून कांहींसे सौम्यपणानें भाऊ म्हणाले. पण मी त्यांना काय सांगूं? ते कोठून आणले व कशाला आणले हें कसें सांगूं? मी कांहीं बोलत नाहीं हें पाहून भाऊ अवाज कठोर करून म्हणाले,

" काय मी विचारतो ऐकूं येतें कां तुला? खरें काय असेल तें सांग. तुझ्याजवळ हे पांच रुपये कोठून आले?" तरी माझें तोंड बंदच. माझ्या डोळ्यांतून मात्र अश्रूंचा प्रवाह वहात होता. पूर्वीपेक्षांहि अधिक कठोरपणानें भाऊ म्हणाले.

" चंद्या, गाढवा, सांगतोस कीं नाहीं? तूं असा निपजशील असें मला वाटलें नव्हतें. अद्याप तरी कबूल हो. कोठें ठेवलेंस माझें घड्याळ? त्याच्यावर हे पांच रुपये आणलेस का आणखी आणले आहेस?"

" काय घड्याळ?" तशाहि स्थितींत मी आश्चर्यानें म्हणालो. " कोणतें घड्याळ?"

" कोणतें? तूंच सांग कोणाला दिलेस? अद्याप तरी कबूल हो." भाऊंच्या बोलण्याचा प्रथम मला कांहींच अर्थ कळेना. घड्याळ कोणी घेतलें, ते कोठें गेलें, मी अगदीं दिङ्मूढ बनून स्तब्ध उभा राहिलो. क्षणभर थांबून भाऊ म्हणाले,

" प्रथम दोन चार वेळा माझ्या खिशांतून लहान लहान रकमा गेल्या; त्या वेळीं तुझा मला संशय आला नाहीं. आणि आतां हें एवढें भारी किंमतीचें घड्याळ गेलें, तरीहि तुझा मला संशय आला नसता; पण हे रुपये पाहून तुझ्यावरच संशय येतो. सांग घड्याळ कोठें आहे तें?"

" मला घड्याळ माहीतच नाहीं." मी अगदीं भीत भीत म्हटलें.

" अरे कार्ट्या, तूं माझ्या पोटीं जन्मला नसतास तरी बरें झालें असतें. माझ्या नांवाला तूं तुझ्या या कृतीनें काळीमा फांसलांस. कुलांगारा, तुझ्या त्या काळ्या तोंडाकडे पहाण्याची मला इच्छा होत नाहीं."

" पण, भाऊ, खरोखरीच मला ही काय भानगड आहे हें माहीत नाहीं—" माझ्या अंगावर एकदम भाऊ ओरडून म्हणाले:—

" निर्लज्ज, बेशरम! चोरी करून हरामखोर खोटें बोलतोस वर? तुला असलीं कृत्यं करायचीं होतीं म्हणून तूं जगलास काय? तुझी आई मेली तूं कां नाहीं मेलास त्यावेळीं? मरतास तर मला एवढें वाईट वाटलें नसतें. आज घड्याळ नेलेंस उद्यां आणखी कांहीं नेशील. अजून तरी खरें काय तें सांग, विचार कर याचा परिणाम वाईट होईल."

" पण, मला घड्याळ माहीत नाहीं."

" बस कर तुझी बडबड." तिरस्कारानें भाऊ म्हणाले. "तुझ्याशिवाय घड्याळ गेलें नाहीं. चोरी करून अशारीतीनें मला फसवायला पहातोस काय? चोर, गाढव. असें गुण पाजळशीलसें वाटत नव्हतें. बऱ्याबोलानें खरें काय तें सांग नाहीं तर तुझी चामडी लोळविन गुलामा समजलास? माझा कार्टा म्हणायचीसुद्धां शरम वाटतें मला" इतकें बोलून माझें कांहींच बोलणें न ऐकतां भाऊ तेथून चालते झाले. माझी त्यावेळीं काय स्थिति झाली असेल त्याची कल्पना होणें कठीण आहे. एकदम माझ्यावर आकाश कोसळल्यासारखें झालें. माझ्यावर किती भयंकर घाणेरडा आरोप हा? मी चोर, माझ्या

घरांत मी चोर ? आतां माझें घर कसलें म्हणा ! घरांतल्या वस्तू चोरणारा मी ठरलों ना ? भाऊंनीं बिलकुल विचार न करतां माझ्यावर किती नीच आरोप ठेविला हा ! खरी हकीकतसुद्धां त्यांनीं ऐकून घेतली नाहीं. चोरणारा भलताच असून भाऊंच्याच-नव्हे सर्व जगाच्या-दृष्टीनें मी चोर ठरलोना ? माझी खरी गोष्ट कोणालाच माहीत नसून जो तो मला चोर या दृष्टीनें पहाणार ! माझ्या डोळ्यांतून एकसारखा अश्रुप्रवाह चालला होता. किती तरी वेळ मी दोन्ही हातांनीं तोंड झांकून खिडकीवर डोकें टेकून रडत होतो. पुढें काय करावें हें मला सुचेना. माझ्याविषयीं भाऊंचा खोटा ग्रह कसा दूर होईल हा एकच विचार माझ्या डोक्यांत घोळत होता.

---

## स्मृति नववी.

# अकल्पित संकट.



मी तशाच स्थितींत तेथें किती वेळपर्यंत रडत होतो याचें मला भान नाहीं. माझ्या आसपास काय चाललें आहे इकडेहि माझें लक्ष नव्हतें. बाबूच्या घरून आल्यानंतर घर सोडून जाण्याचा विचार मी रद्द केला, तो आतां पुनः माझ्या मनांत उद्भवून तो मी कायम केला. या घरांत यापुढें राहणें म्हणजे किती लांछनास्पद होतें ? ज्यानें त्यानें माझ्याकडे चोर या दृष्टीनें पहाणें किती अपमानकारक गोष्ट होती.भाऊंचें वर्तन किती अन्यायाचें होतें. माझी आई किंवा आजी जर आज हयात असती तर माझ्यावर हें संकट आलें असतें काय ? क्षणोक्षणीं आईची व आजीची स्मृति होऊन मला अतोनात दुःख होत होतें. माझ्यासारखा दुःखी प्राणी जगांत कोणीच नसेल असें मला वाटून हृदय भडभडून येत होतें. कोठून मला दुर्बुद्धि सुचली आणि भिमाजवळून ते पैसे घेतले, असें आतां मला वाटूं लागलें. परंतु जी चूक होऊन गेली ती गेलीच. आपल्या हातून किंचित् चूक झाली त्याचा परिणाम किती चमत्कारीक झाला; असा खोटा आरोप माझ्यावर येईल हें माझ्या स्वप्नींहि नव्हतें. संध्याकाळ होऊन दिवे लागले होते, बराच वेळ अश्रूविसर्जन केल्यामुळें माझें हृदय कांहींसें हलकें झालें होतें; गार वारा मस्तकाला झोंबून मी माझ्या स्थितींतून जागृत झालों;उद्यां सकाळीं या घराचें दर्शन घ्यावयाचें नाहीं असा ठाम निश्चय केलाच होता. आतां मजजवळ कोठें जाईन म्हणेन तर भाड्याला एक दिडकीहि नव्हती, परंतु मुंबईपर्यंत पायीं जाण्याचा मी विचार केला. काय होईल तें होवो या घरांत या पुढें रहावयाचें नाहीं. चोर म्हणवून घेऊन घरांत रहाण्यापेक्षां मुंबईस जाऊन कोठें तरी मजुरी करून आपण आपलें एक-ट्याचें पोट सहज भरूं. मुंबईस लक्षावधिलोक आहेत तें आपलीं पोटें भरत आहेतच ना! मग मला कोठें काम मिळणार नाहीं काय ? हमाली करीन, काय वाटेल तें करीन, पण येथें रहावयाचें नाहीं.

माझ्या खोलींत आतां अगदीं काळोख पडला, रोजच्यासारखा तेथें कोणी दिवा लावला नसावा असें मला वाटलें. माझ्या अंतःकरणांत चाललेल्या भयंकर तुफानाची कोणाला पर्वा होती? माझें कांहीं झालें तरी त्याबद्दल कोणाला काळजी वाटणार होती? अंधारांतच तेथल्या बिछान्याच्या वैळकटीवर डोकें ठेवून मी पडलो. रात्रीं सर्वांची निजानीज झाली म्हणजे बाहेर पडण्याचा माझा विचार होता. मी जे मनोरथाचे डोलारे उभारले होते, ते सर्व अशारीतीने धुळीस मिळाल्याबद्दल माझा ऊर क्षणोक्षणीं भरून येत होता. भाऊ म्हणाले त्याप्रमाणें खरोखरीच माझी आई मेली तेव्हां मी कां मेलो नाहीं? मला परमेश्वरानें काय म्हणून जगविलें असेल? आतां मेलो अगर जिवंत असलो तरी भाऊंना काय त्याचें? मी घरांतून गेलो तरी माझी चौकशी कोणीच करणार नाहीं. "तुझी आई मेली त्यावेळी तूं कां नाहीं मेलास?" हे भाऊंचें शब्द मला शल्याप्रमाणें टोंचत होते. माझी आई मृत झाली व मी जिवंत राहिलो हा माझा दोष नव्हता व जगणें मरणें माझ्या हातची गोष्ट नव्हती. एकाएकीं वीज पडून किंवा अंगावर घर कोसळून जर मला अचानक मरण येईल तर किती चांगलें होईल! परंतु मरणाला बोलावून तें कधीं येत नसतें!

आणखी काहीं वेळ गेला. काळोखांत माझ्याजवळ कोणी तरी पाऊल न वाजवितां हळुहळु येतांना मला अस्पष्ट दिसलें. हें कोण अशारीतीनें येत असावें म्हणून प्रथम मला थोडी भीति वाटली. परंतु ती व्यक्ति जेव्हां अगदीं माझ्याजवळ आली, तेव्हां ती कोण हें मला कळलें. दुसरें तिसरें कोणी नसून ती भिमाच होती. ती भिमा आहे असें कळताच माझ्या दुःखाचा बांध फुटून माझें रडें जोरजोरानें बाहेर पडूं लागलें मी दोन्ही हातांनीं माझें तोंड झाकून म्हणालो,

"भिमा, कायग करूं मी आतां?" मला पुढें बोलवेना! माझ्या तोंडावरचें हात काढून व मला आपल्याजवळ ओढून भिमाहि रडूं लागली. क्षणभरानें ती अगदीं हलक्या अवाजांत म्हणाली,

"नको रडूं बाबा असा! उगी रहा. माझ्या बाळावर भाऊसाब उगीचच रागावले. चल ऊठ. थोडा घांस खाऊन घे. असा किती वेळ रडत बसशील?"

"भिमा, मला बिलकुल भूक नाहीं." डोळे पुसून मी म्हणालो.

"नाहीं तर, असा अगदीं आज उपाशींच रहाणार?" ती मला उठवूं लागली. परंतु कांहीं खावें असें मला मुळींच वाटेना. मी ऐकत नाहीं असें पाहून ती तरी बिचारी काय करणार? तिनें आपल्याकडून माझी पुष्कळ समजूत केली. शेवटीं तिचा नाइलाज झाला, तेव्हां ती म्हणाली:-

"तूं ऐकत नाहींस तर काय करूं बाबा. बाजारचं कांहीं देऊं कां आणून." मी नको म्हणतां पुनः ती म्हणाली:-

तूं घड्याळ चोरलं असं भाऊसाब म्हणतात तर सांगना माझ्याजवळून रुपये घेतले म्हणून, मी सांगूं कां?"

" अं–हं. भिमा, तसं कांहीं सांगू नकोस, उलट भाऊ तुलाच रागावतील कीं तूं रुपये कां दिलेस म्हणून, कदाचित तुला या घरांतूनहि काढतील. भाऊंचा राग किती वाईट आहे हें तुला माहित आहे ना?" त्यावर ती कांहीं बोलली नाहीं. ती जावयास उठली पण जातां जातां तिनें आपल्या कडोसरीचे पांच रुपये काढून माझ्या हातांत देत म्हणाली:–

" सकाळचे पैसे भाऊसाबांनीं घेतले म्हणून हे पैसे मी पुनः आणले आहेत. ते तुला कुणाला द्यायचे आहेत ना? असा घाबरून काय जातोस बाळा, उद्यां भाऊसाबांचा राग निघून जाईल. आजीबाई असत्या तर माझ्या बाळावर असा खोटानाटा आळ नसता आला कधीं. माझा बाळ कधींतरी असली चोरी करील काय?" एक दीर्घ श्वास सोडून ती म्हणाली. " इथं आज दिवाबिवा कोणी मेल्यानं लावला नाहीं, लावूं कां मी दिवा?"

" नको. तूं जा आतां. मला पाहिजे तर मी लावून घेईन." मी म्हणालो. नंतर ती गेली, पण मी कांहीं खाल्लें नाहीं म्हणून तिला वाईट वाटत होतेंच. भाऊंचा राग कमी होईल, कशाला तुला इतकें वाईट वाटतें? असे ती मला किती तरी वेळां म्हणाली. गरीब बिचारी, माझ्याजवळ पैसे कसे आले हें मी शाबीत केल्याशिवाय भाऊंचा राग कमी होणार नाहीं हें तिला काय माहित? तसें सांगायचें म्हणजे तिची इतक्या दिवसांची नोकरी घालवायचीच ना? बरें सांगू नये तर चोरीचा किती घाणेरडा आळ माझ्यावर येऊं पहात होता. मला कांहीं सुचत नव्हतें. भिमा एक आमच्या घरची मोलकरीण होती; पण तिचें माझ्यावर किती प्रेम होतें! तिनें मला लहानपणापासून आपल्या अंगाखांद्यावर खेळविलें होतें. तिला स्वतःचें कोणीच नव्हतें. ती माझ्या जन्मापासून आमच्या येथें राहिली होती व ती माझ्यावर स्वतःच्या मुलाप्रमाणें प्रेम करीत असे, माझ्यावरच्या प्रेमामुळें कित्येक वेळां तिला माईकडून त्रास होत असे. कांही तरी तिच्या कामांत कसोपणा काढून त्या तिच्यावर रागावत; पण ती तें सर्व माझ्यासाठीं सहन करीत असें. आजीच्या मरणानंतर माझे मळके कपडे धुणें, फाटके शिवणें वगैरे तीच करीत असे. माई ज्या ज्या वेळीं मला मारीत व बोलत, त्या वेळीं दाराआड उभें राहून अश्रू ढाळतांना मी तिला पाहिलें होतें. तिच्या प्रेमाचें कसें वर्णन करावें हें मला कळत नाहीं. हे दिवस निघून जातील व तुला लवकरच सुखाचे दिवस येतलि म्हणूस वेळोवेळीं ती मला धीर देत असे. ती जरी आशिक्षित अजागळ होती, तरी तिचें अंतःकरण फार कोमल होतें. भिमा माझ्या जवळून गेल्यावर तिनें दिलेले ते रुपये मी मोठ्या काळजीनें पुनः कोणाच्या आतां दृष्टीस पडूं नये म्हणून नीट जपून ठेवले. ते रुपये हातांत पडतांच मला दुप्पट हुशारी आली व मोठा खजिना प्राप्त झाल्यासारखा आनंद झाला. गरीब बिचारी भिमा! तिनें दिलेल्या रुपयांचा काय उपयोग होणार हें तिला काय माहित, नाहींतर तिनें मला रुपये दिले असते काय?

काळोखांतच बिछान्याची वळकटी उलगडून मी त्यावर पडलो. घरांतल्या सर्व माणसांची निजानीज केव्हां होते म्हणून वाट पाहूं लागलो. त्या रात्रीं मला जेवणास सुद्धां कोणी उठविलें नाहीं. खालीं गेलो नाहीं त्याबद्दलहि कोणी चौकशी केली नाहीं. गादीवर मी नांवाला निजलो होतो, माझें मन मात्र एकसारखें भ्रमण करीत होतें. नाना प्रकारच्या विचारानें माझें मस्तक भडकून गेलें होतें. लहानपणाच्या सर्व गोष्टी एकामागून एक आठवूं लागल्या: आजचिया नंतर घरांत कधीं मला मोकळेपणा व आनंद वाटलाच नाहीं. पुढच्या आशेवर मी दिवस कसेंबसें काढीत होतो. कोणत्याहि स्थितींत मनुष्य असला तरी त्याला आशाही पुढें पुढें ओढीत असते, आपण नेत्र झांकून पुढें न पहातां पुढें पाऊल टाकीतच असतो. कित्येक वेळा जरी आपण भयंकर नैराश्यगर्तेत पडत असलो तरी पुनः आशेवर विश्वास ठेऊन पुढच्या मार्गाला लागण्याची तयारी करतो. माझ्या आईचा पुष्कळ पूर्वीचा एक लहानसा फोटो भाऊंच्या जवळ होता. तो ते त्यांच्या लिहिण्याच्या खोलींत टेबलाच्या खणांत ठेवित असत. तो फोटो मी पाहिलेला होता, त्यांतली आईची प्रतिमा हल्लीं अगदीं पुसट असली तरी माझी आई कशी होती याची साधारण कल्पना होण्यासारखी होती. माझी आई दिसण्यांत बरीच स्वरूपवान होती, असें ज्यांनीं तिला पाहिलें होतें ते म्हणत असत. आपण घरांतून जाण्यापूर्वी एकदां तरी मातेचें छायाचित्र पहावें असें माझ्या कितीदां तरी मनांत आलें. पण भाऊंच्या खोलींत त्यांच्या न कळत जाऊन टेबल उघडून पाहण्याचें मला धैर्य होईना; न जाणो मी माझ्या आईचा फोटो पहावयास गेलो व तें कोणी पाहिल्यास हा आणखी चोरीच करावयाला आला असावा असा कोणाला संशय यावयाचा. म्हणून मी तो विचार सोडून दिला. मनांतल्या मनांत आईच्या तसबिरीचें व आजीचें चिंतन केलें.

मध्यरात्र उलटून दोन अडीचच्या सुमाराला मी माझ्या खोलींतून बाहेर निघालो. त्या खोलीचा, माझ्या तेथल्या सर्व वस्तूंचा व आवडत्या पुस्तकांचा मी जडांतःकरणानें शेवटचा निरोप घेतला. हलकेंच पायाचा आवाज न होऊं देता मी जिना उतरून मागील दारीं गेलो. मी अंगणात येईपर्यंत माझी चाहूल कोणाला लागली नाहीं. बाहेर पडण्यापूर्वीच घराकडे तोंड फिरवून मी एक दीर्घ निश्वास सोडला! घरांतल्या कोणाहि माणसाचें माझ्यावर जरी प्रेम नव्हतें, तरी त्या घरावर माझें प्रेम होतें. आपण आतां जें पाऊल टाकणार तें मूर्खपणाचें आहे असाहि एक विचार माझ्या मनांत आला. पण दुसऱ्याच क्षणीं तो लुप्त झाला. मी चोरी केली नव्हती व मी चोर नव्हतो, तरी मला एखाद्या चोरासारखेंच घरांतून बाहेर पडावें लागत होतें. अशा या रात्रीच्या वेळीं आपल्याला जर कोणी पाहिल तर काय होईल? ही भीति क्षणोक्षणीं हृदयांत धडकी उत्पन्न करीत होतीच. घराचें पुनः एकदां दर्शन घेऊन मी घराबाहेर पडलो! रस्त्यावर येतांच माझें अंतःकरण अगदीं भडभडून आलें. येणारे दुःखाचे उमाळे मोठ्या प्रयत्नानें दाबून मागें न पहातां मी स्टेशनचा रस्ता धरला.

स्टेशनकडे जातांना बाबूचें घर लागत असे; जातां जातां बाबूला भेटावें असा विचार माझ्या मनांत आला, पण तो लागलाच बदलला. अशा या रात्रीच्या वेळीं बाबूला भेटणें म्हणजे आपण होऊन आपल्या मूर्खपणाचें प्रदर्शन करणें होय.

रात्र काळोखी होती, ताऱ्यांचा अंधूक अंधूक प्रकाश पडला होता. गांवापासून स्टेशन दोन मैल लांब होतें; गांव फारसें मोठें नव्हतें व अगदीं लहानहि नव्हतें. गांवा बाहेर दूरदूर अंतरावर कांहीं श्रीमंत लोकांचे बंगले होते, व त्यापुढें बहुतेक स्टेशनपर्यंत दाट झाडी होती. कसाबसा गांवाबाहेर तर येऊन पोंचलो, गांवांत चालेपर्यंत ठीक होतें कारण कित्येक घरांत मनुष्यांची हालचाल, दाराच्या किंवा खिडक्याच्या फटींतून क्वचित् घरांत दिसणारा दिव्याचा प्रकाश दिसून मला एकट्याला रस्ता कापण्याला फारसे भय वाटलें नाहीं. गांव सोडल्यानंतर मात्र माझें हृदय भयानें धडधडूं लागलें. ताऱ्यांच्या अंधूक प्रकाशांत वृक्षांच्या छायांच्या लांब आकृत्या मला घाबरवित होत्या. वाऱ्यानें खळखळ हालणारीं झाडांचीं पानें जणूं मला कोणी धरावयास येत आहे असे भासवीत होती. दूर कोठेंसा कोल्ह्याच्या रडण्याचा अवाज ऐकून माझ्या भयानें धडकणाऱ्या हृदयाचे ठोके अधिक जोराने उडत होते. जों जों रस्ता लवकर लवकर कापण्याचा मी प्रयत्न करूं लागे तों तो रस्ता अधिकाधिक लांब वाटूं लागे. सर्वांग भीतीनें कांपत होतें; घशाला कोरड पडली होती. लहानपणीं ऐकलेल्या भुतांच्या गोष्टींचें आतां स्मरण होऊन ती सर्व भूतें माझ्या आसपास फेऱ्या घालींत आहेत, असा मला भास होऊं लागला. स्टेशन केव्हां एकदां गाठू असे मला होऊन गेलें. अशा स्थितींत बराच वेळ चालल्यावर एकदाचें स्टेशन-वरचे एकदोन रॉकेलचे दिवे दिसूं लागलें, क्षणभराने स्टेशनचे आवारहि दिसूं लागलें, व माझ्या अंतःकरणावरचे भीतीचें ओझेंहि हलकें भासूं लागलें. मुंबईकडे जाणारी गाडी पहाटे स्टेशनवर येत असे. अद्याप पहाट होण्याला पुष्कळ अवकाश असल्यामुळें गाडीची वेळ होईपर्यंत स्टेशनवर कसा तरी वेळ काढावा असें मला वाटलें. त्यापूर्वीच जर आपणांस कोणी ओळखलें तर काय होईल? पहांटे गाडी येणार त्यापूर्वी आपण घरीं नाहीं असें कळून आपणास कोणी शोधावयास आलें तर काय करावें? त्यापेक्षा पुढल्या स्टेशनपर्यंत चालत गेलो तर तेथें आपणास फारसें कोणी ओळखणार नाहीं. पुढचे स्टेशन आठ नऊ मैलांवर होतें; रात्र अद्याप बरीच होती. त्या स्टेशनवर गाडी येण्यापूर्वी आपण तेथें जाऊन पोंचूं असें मला वाटलें, परंतु आधीच रात्रीपासून पोटांत अन्न नव्हतें, सबंध रात्र झोंप नाहीं, व इतक्या लांब स्टेशनवर आल्यामुळें माझे पाय आतांच दमून गेले होते. अंतःकरण पुष्कळ पुढें धांवत होतें, पण पाय तेवढे चपल नव्हते. तेव्हां तो बेत रहीत करून पहांट होईपर्यंत तेथे राहण्याचें मी ठरविलें. घरून कोणीतरी माझा तपास करावयास येईल कीं काय अशी धासधूस होतीच. मुंबईचें टिकीट काढून आगगाडींत बसेपर्यंत मला न्यायला घरून कोणी आलें नाहीं.

गाडींत बसल्यानंतर गाडीच्या वेगापुढे माझ्या विचाराचा वेग चालला होता. घरून अविचारानें बाहेर पडण्याचा जो आपण मूर्खपणा केला तो आतां माझ्या चांगलाच निदर्शनास आला. माझ्यावर चोरीचा खोटा आरोप आला असतां त्याचा पुढें काय परिणाम होतो हे पहाण्याचें सोडून दुःखाच्या व रागाच्या भरांत मी घरांतून बाहेर पडल्यामुळें चोरीचा वहीम माझ्यावरच राहण्याचा संभव होता. तेथेंच जर मी राहिलो असतो, तर खरा गुन्हेगार केव्हांना केव्हांतरी सांपडून माझ्या विषयींचा भाऊंचा खोटा ग्रह बदलला असता. पण आतां काय मी बाहेर पडलो खरा! माझ्या हातून केवढा हा मूर्खपणा झाला! आता पुनः घरीं परत जाणें माझ्या मानी मनाला रुचेना. मी उपासमारानें मेलो तरी चिंता नाहीं; ज्या घरांत माझी कोणाला जरूर नाहीं, त्या घरांत पुनः म्हणून पाऊल घालावयाचें नाहीं हा माझा निश्चय कायम होता. किती पोकळ अभिमान हा!

ग्रॅन्टरोड स्टेशनवर गाडी उभी रहातांच सर्व उतारूंच्या बरोबर मीहि उतरलो. जे ते आपल्या सामानसुमानाची व्यवस्था लावून कोणी मोटारींत, कोणी विक्टोरियांत व कोणी पायींच आपआपल्या बिऱ्हाडीं जाण्याच्या गर्दींत होते. माझें बिऱ्हाड कोठें होतें? अद्यापपर्यंत मी मुंबई कधींच पाहिली नव्हती. मुंबईचें वर्णन ऐकून साधारण माहिती होती त्या जोरावर त्या अनोळखी मुंबईशहरीं येऊन उतरलो. माझ्या नात्या-गोत्याचें अगर ओळखीचें तेथें कोणी नव्हतें. मुंबईच्या त्या बकालीपणाकडे पाहून मी घाबरून गेलो! माझी अगदीं बावळ्यासारखी स्थिति झाली, काय करावें? कोठें जावें? मला कांहीं सुचेना! जेमतेम मी रस्ता चालूं लागलो. कोणत्या रस्त्यानें प्रथम जावें याचा मला निर्णय करतां येईना! असहाय, निराधार, असा त्या अफाट मुंबईच्या रस्त्यावर मी किती तरी वेळ उभा होतो. रस्त्यांत कोण विलक्षण धांवपळ चालली होती जो तो कांहींना काहीं उद्योगाच्या मार्गे लागून चित्रासारखा माझ्या दृष्टीपथापुढून निघून जात होता. तूं येथें कां उभा? तुला काय पाहिजे? म्हणून मला कोण विचार-णार? आतां मात्र मला ब्रह्मांड आठवलें!

मूर्खपणा करून आपण मुंबईला तर आलो, पण आतां काहीं तरी पुढची व्यवस्था केली पाहिजे. बावळटासारखे एकाच जागेवर आपण तासन् तास बसलों तरी आपली वास्तपूस कोणीही करणार नाहीं. जिकडे आपले पाय नेतील तिकडे चालावें असें मनांत येऊन जो रस्ता समोर दिसला त्या रस्त्यानें मी चाललो. अमुकच दिशेला जावयाचें हें माझें ठरलें नव्हतें. सर्व रस्ते मला सारखेंच होते. मी चालला होतो खरा, पण पायानें चालण्यापेक्षां मी मनानेंच चाललो होतो म्हटल्यास अधिक शोभेल. कारण माझें मन जितक्या झपाट्यानें चाललें होतें, त्याच्या शतांशानेंहि माझे पाय उचलत नव्हते. पुढें काय होणार या काळजीनें व आधल्या दिवसाच्या उपासानें मला चालण्याची शक्ति राहिली नव्हती. कांहींतरी पोटांत गेल्याशिवाय आपले पाय चालण्याला समर्थ नाहींत हें मला केव्हांच कळलें होतें. दुसरा सर्व विचार सोडून प्रथम काहीं तरी पोटाचा विचार

केला पाहिजे असें वाटूं लागलें. परमेश्वरानें प्राणीमात्राच्या मार्गे या टीचभर पोटाची काळजी लावून दिली आहे. कोणी कितीहि श्रेष्ठ असला, तरी तो या क्षुधेपुढें कमी दर्जाचा ठरतो. मी थोडासा रस्ता चालल्यावर मोठ्या अक्षरात "क्षुधाशांतिगृह" असें लिहिलेली पाटी एका दुकानाच्या पुढें टांगलेली होती, त्याकडे माझें लक्ष ताबडतोब वेधलें; ती पाटी जणूं मला माझ्या क्षुधेची शांती करावयाला बोलावित आहे असें मला वाटलें. पोटात भूकेने काहूर माजविल्यामुळें मी लागलाच त्या दुकानात शिरलों व क्षुधेची शांती केली. त्या गृहाच्या मालकाने मी कोणी तरी अनोळखी बावळट समजून माझ्या जवळून दुप्पट पैसे उपटले होते, ते मला नंतर पुढें कळलें. शांतीगृहातून बाहेर पडल्यावर पुष्कळ वेळ मी इकडे तिकडे भटकलो. आतां काय करावे हा एक बिकट प्रश्न माझ्यापुढें होता. माझ्या ओळखीच्या कोणी इसमाने मला त्या मुंबईच्या रस्त्यावर भणंगाप्रमाणे भटकताना पाहून मीच तो म्हणून मला ओळखलें नसतें. भ्रमण करून पाय अगदीं थकून गेले, पण स्वस्थपणे बसावयाला निवाऱ्याची जागा कोठेच आढळेना. मुंबईतील त्या पहिल्या दिवसाची आठवण मी या जन्मांत कधींहि विसरणार नाही. मुंबईस गेल्यावर आपण आपले पोट सहज भरूं अशी धरून निघतेवेळीं मला जी घमेंड होती, ती मुंबईत पाय देतांच जिरून गेली. घर सोडल्याला पुरें चोविस तासहि झाले नव्हते, तितक्यात घरी परत जाण्याचा विचार माझ्या मनात हजार वेळां तरी आला असेल. या मनुष्यवस्तीनें गजबजलेल्या अफाट जगात एका पोटाची सोय होणे व एक वितभर जागा विश्रांतीकरता मिळणे किती दुरापास्त आहे हें माझ्या चांगलेच प्रत्ययास आलें. रस्त्यावर भिकाऱ्याची पोरें एकमेकाची थट्टा करून हंसतांना पाहून माझ्यापेक्षा याची तरी स्थिति बरी असें मला वाटूं लागलें. मुंबईचा ज्याला अनुभव असेल त्यांना कळेलच कीं, माझ्या सारख्या निराश्रिताला आपलें श्रांत डोकें टेकावयाला कोठेच स्थान नाहीं. सकाळपासून दुपारपर्यंत मी भटकत होतो, शेवटीं चालतां चालतां चौपटीवर आलो व अतिशय दमून गेल्यामुळें बाबुलनाथाच्या टेकडीच्या पायथ्याशीं साधारण निर्जन रस्ता पाहून तेथें एका झाडाखालीं जाऊन बसलो मला झोप येऊं लागलीं म्हणून तेथेच पडलों. तशाहि स्थितींत मला अगदी गाढ झोंप लागली. मी जागा झालो तो संध्याकाळ झाली होती. बराच वेळ विश्रांति घेतल्यामुळें मला जरा हुशारी आली, तेथून उठून मी समुद्राच्या बाजूकडे जाऊं लागलो. यावेळीं चौपटीवर पुष्कळ लोकांची गर्दी हवा खाण्याला जमली होती. मी सहज माझ्या खिशात हात घालून पाहिला तो माझे पैसे त्यांत नाहींत! मी झोपीं जाण्यापूर्वी ते होते; मी झोपीं गेल्यावर कोणी तरी माझ्याजवळ असलेली माझी तुटपुंजी रक्कम लांबविली होती. माझ्या डोळ्यांतून घळकन् अश्रूबिंदू आले. शेवटीं उपासमारीनें मला मृत्यु येणार काय? मोठ्या कष्टाने चौपाटीवर जेथें गर्दी थोडी होती, तेथे जाऊन बसलो. माझ्या आसपास काय चाललें आहे इकडे माझे लक्ष नव्हते. एकसारखें येणारें रडे कोणाच्या दृष्टीस पडूं नये म्हणून प्रयत्न करीत होतो. या अथांग दर्यात उडी

घेऊन आपण आपल्या कष्टमय आयुष्याचा शेवट करून घ्यावा असा विचार माझ्या मनांत आला. माझ्या अंगांवर सरसरून कांटा उभा राहिला! आशा महाबलवत्तर आहे, इतकी माझी दीनदशा झाली होती, जवळ एकहि पैसा नव्हता, उद्याची भ्रांत पडून उपासमार होण्याची पाळी आली, तरी मृत्यूच्या विचारानें माझें हृदय धडधडूं लागलें.

माझ्यापासून कांहीं अंतरावर एक डोक्याला रुमाल बांधलेले व एक लाल पगडी-वाले असे दोघे गृहस्थ बोलत बसले होते. कांहीं वेळानें रुमालवाले गृहस्थ तेथून उठून गेले व पगडीवाले उठण्याच्या बेतांत होते; इतक्यांत बांकाखालीं एक हातरुमाल पड-लेला माझ्या दृष्टीस पडला. पगडीवाले आपला रुमाल विसरले असावे असें वाटून त्या रुमालाकडे बोट दाखवून मी त्यांना म्हणालोः—

" तो आपला रुमाल राहिला आहे वाटतं ? "

" अरे, हा तर त्रिंबकरावाचा रुमाल ? " माझ्याकडे वळून ते म्हणाले. " जा. जा. मुला, ते माझ्याजवळ बसले होते गृहस्थ-ते पहा ते चालले आहेत, त्यांना धांवत जाऊन देऊन य बरं. मला दुसरीकडे जाण्याची जरा घाई आहे. " कोणाचें कांही तरी काम करून परिचय करून घ्यावा अशी माझी इच्छा होतीच. मी तो रुमाल-नव्हे त्यांत कांहीं पैसे कागद बाधलेला रुमाल-घेऊन धांवत धांवत त्या गृहस्थाजवळ जाऊन " हे घ्या, " म्हणून म्हणणार तोंच त्या गृहस्थाने माझा हात जोराने पकडून-

" अरे, चोरा. माझ्या खिशांतला रुमाल काढून घेतलास काय ? " म्हणून मला एक गचांडी दिली. चोराचें नांव घेतांच हां हां म्हणतां तेथे बरीच गर्दी जमली व जो तो मला शिव्या देऊं लागला. या झालेल्या प्रकाराने मी तर अगदीं घाबरूनच गेलो. तो लालपगडीवाला गृहस्थ येऊन मला सोडवील म्हणून इकडे तिकडे मी पाहिलें पण व्यर्थ, ते केव्हांच निघून गेले होते. एवढ्या त्या कोलाहालांत माझें कोण ऐकतो ? कोणी म्हणे काल माझ्या खिशांतून पैशाचे पाकीट गेले ते यानेंच चोरलें, कोणी म्हणे परवां माझ्या खोलींत येऊन खुंटीवरचा माझा कोट यानेंच नेला. जेवढ्यांच्या ज्या सात आठ दिवसांत ताज्या चोऱ्या झालेल्या होत्या तेवढ्या माझ्याच माथीं लादण्यात आल्या. पहिल्या प्रथम मी मुंबईस आज पाय दिला असतां, त्यापूर्वी घडलेल्या चोऱ्यांचा आरोप माझ्यावर; काय चमत्कार पहा ! एवढ्या सर्व लोकांपुढे माझें काय चालणार. मी चोर नसतां मला चोरच बनविण्याचा दैवाचा विचार होता कीं काय नकळे ! अखेर सर्वानुमतें मला पोलिसाच्या ताब्यांत देण्यांत आलें. रात्रभर मला पोलिसगेटावर रहावें लागणार होतें. पोलिसांनीं मला माझ्या अपराधाबद्दल दोनचार शिव्या हासडून गुद्दे लगावून एका अंधारकोठडींत कोंडून ठेविलें. ज्या भीतीनें घरून निघालो ती भीति माझ्या

पुढेंच! अरेरे! निष्ठुर दैवा तुला अजून माझा किती अंत पहावयाचा आहे! सर्व जगानें माझा छळ चालविला आणि दैवानेंहि माझा छळच चालविला आहे काय?

## स्मृति दहावी

# जीवनार्थ कलह.



त्या अंधार कोठडींत निराशेने माझ्या अंतःकरणांतहि घोर अंधार पसरविला होता. आपणाला आतां या यमयातनेंतून कोण सोडविणार? माझें पुढे काय होणार? कां मी खरोखरीच चोर ठरून मला जन्मभर कैदेतच रहावें लागणार? जे करावें त्याचा उलटाच परिणाम होतो! मुबईत जेवढे माझ्यासारखे अनुभवशून्य येतात, तेवढ्यांना प्रथम असे कैदेत पडावे लागत असेल काय? एक ना दोन सहस्रावधी दुःखद विचारांच्या भाराने माझे अंतःकरण दबून गेलें होतें. माझ्या दैवाला व मला जन्मास घालणाऱ्या परमेश्वराला त्या रात्रीं मी किती तरी दोष दिला. माझी त्या रात्री किती चमत्कारिक स्थिति झाली होती. क्षणांत वाटे की मी स्वप्नांतच आहे; परंतु आल्या दिवसापासून घडलेल्या इत्थंभूत गोष्टी मला चांगल्या आठवत होत्या. क्षणांत वाटे, अरेबियनाइट्समधील एखाद्या राजपुत्राप्रमाणे आपणावर हा अकल्पीत प्रसंग आला आहे व तो तितक्याच अकाल्पितपणे दूर होऊन आपणाला पुढें चांगले दिवस येतील. त्या एका रात्रीं मी एकाजागीं राहूनच किती ठिकाणीं तरी प्रवास करून आलो असेल. तसेंच मनोवृत्ति प्रक्षुब्ध होऊन मुंबईच्या साऱ्या लोकांना, पोलिसांना, तुरुंग उभारणाऱ्या सरकारला मनांतल्या मनात किती तरीं दोष दिला असेल, सबंध रात्रींत माझ्या डोळ्याला डोळा लागला नाहीं. दोन रात्रीचें जाग्रण, दोन दिवसांचा उपवास; पुढें काय होईल याची काळजी; घर सोडल्यापासून इतक्या थोड्या अवधींत माझी किती शोचनीय स्थिति झाली होती! त्यावेळीं माझे वय अवघे पंधरा वर्षांचें होतें, त्या मानानें माझ्यावर चिंतेचे ओझें किती तरी पट अधिक होतें!

कसा बसा एकदांचा दिवस उजाडला, आतां आपणाला न्यावयाला येतील असें मला क्षणोक्षणी वाटून माझे काळीज थरथर कापत होते. अकरा वाजल्यानंतर मला कोर्टांत नेण्यांत आले. उंच आसनावर नाकांवर चष्मा ठेऊन व करवेल तितका गंभीर चेहरा करून बसलेले गृहस्थ जज्ज असावे असा मी तर्क केला. बाजूला कठड्याचा पिंजरा होता, त्यांत मला नेऊन उभे करण्यांत आले. खालच्या बाजूला कांहीं मंडळी गंभीरपणाने लिहिण्यात गढून गेली होती; पलीकडे गंभीर चेहरे करून कोणी वर पहात तर कोणी डोळे मिटून, तर कोणी डोक्यावर हात फिरवित विचारांत गढून गेल्यासारखें दिसत होते. तेथला एकंदर गंभीर देखावा पाहून मी अगदीं भयचकित होऊन गेलो, माझें डोकें गरगर फिरूं लागलें, मी आतां येथेच पडणार कीं काय असें मला

वाटूं लागलें; मोठया शिकस्तीनें कठड्याला धरून मीं उभा होतो. इतक्यांत माझी दृष्टी कालच्या त्या लाल पगडीवाल्या गृहस्थाकडे गेली. काल त्यांच्याच सांगण्यावरून मी ते रुमालांत बांधलेले पैसे त्यांच्या मित्राला द्यावयाला गेलो असतां माझ्यावर हा अनपेक्षित प्रसंग आला होता. त्यांनीहि त्याच वेळीं माझ्याकडे आश्चर्यानें पाहिलें. मी कैद्याच्या पिंजऱ्यांत कसा ? म्हणून त्यांना आश्चर्य वाटलें असावें. माझ्यावरच्या आरोपाची सुनावणी होतांच मी तेथें कसा आलो हे त्यांना कळून; त्यांनीं काल घडलेली खरी हकीकत कोर्टाला सांगून माझी एका आरोपातून सुटका केली. कारण माझ्यावर दुसऱ्या बऱ्याच चोऱ्यांचा आरोप होता. मला सोडविणारे गृहस्थ एक चांगल्यापैकीं वकील होते. त्याना मी डोळ्यांत आसवें आणून प्रथमच काल मुंबईला आलों व मला येथली मुळींच माहिती नाहीं असें सांगितलें. माझें म्हणणें त्याना खरे वाटून त्यानीं माझी इतर आरोपांतूनहि मुक्तता केली. त्यावेळीं त्याच्याविषयीं मला केवढी कृतज्ञता वाटली ! माझी त्या बंदीगृहांतून अशा सुलभपणें मुक्तता झाली त्याबद्दल मी परमेश्वराचें अंतःकरणपूर्वक आभार मानले. परंतु पुढें काय करावें हा विचार मला जाचत होताच. मी मुंबईत अनोळखी व निराधार आहे, हें जाणून वकीलसाहेबाना माझी दया आली व पुढची सोय करून देण्याचें त्यांनीं मला अभिवचन दिले. त्यानंतर मी दोन दिवस त्याच्याच घरीं होतो. ते वकील असल्यामुळें कदाचित त्याची व भाऊंची ओळख असण्याचा संभव आहे, असें मला वाटल्यावरून मी माझी खरी हकीकत त्याना सागितली नाहीं. मी जी हकीकत सांगितली त्यावर त्याचा विश्वास बसला. त्यानीं मला फारसें विचारले नाहीं. मुंबईत आल्यापासून मी माझ्या चंदू या नांवाला रजा देऊन चिंतामणी हे नाव धारण करण्याचा विचार केला.

वकीलसाहेबाचे एक मित्र होते; त्याचा स्वतःचा छापखाना होता; त्यांच्या छापखान्यांत खिळे जुळविण्याच्या कामावर वकीलसाहेबांच्या शिफारशीने मी राहिलो. जवळ जवळ पोटावारीच मी त्याच्या येथे होतो म्हटलें तरी चालेल. कारण मला कोठें तरी माझें पोट भरावयाचें असल्यामुळें त्याचे म्हणणें कबूल करावें लागलें. मी त्या दिवसांपासून त्याच्या घरी रहावयास गेलो. बी. ए. एम्. ए. होऊन कोठें तरी मोठ्या हुद्याची व बहुमानाची नोकरी मिळून आपण लौकिकवान होऊं अशाविषयीं जीं सुखस्वप्नें पडत होतीं त्याचा अशारीतीनें शेवट झालेला पाहून माझ्या मनाला कशा वेदना झाल्या असतील त्याची कल्पना करणें शक्य नाहीं ! छापखान्यात काम करीत असतां इतर मुलात मी न मिसळतां माझ्या विलक्षण स्थित्यंतरासंबंधाचाच विचार करीत असे. विद्यादेवीच्या श्रेष्ठ भक्तात आपली गणना व्हावी अशी माझी फार फार इच्छा होती. परंतु माझ्या अविचारपणानें हल्लींची स्थिति मी मला प्राप्त करून घेतली होती. अशा अशिक्षित अवस्थेंत मिळतील तीं हलकीं सलकीं कामें करून पुढचें आयुष्य आपल्याला कंठावें लागणार हा विचार येऊन माझ्या मनाची फार

चमत्कारिक स्थिति झाली होती. क्षणोक्षणीं निराशेनें व दुःखानें माझें हृदय भरून वारंवार हताश होऊन मी दीर्घ निःश्वास सोडीत असे. रिकामपणीं फावल्यास छापखान्यांत जें कांहीं वाचावयास मिळे तें मी वाचीत असे. माझ्या बरोबरीची दोन तीन मुलें होतीं, पण तीं अशिक्षित वर्गांतलीं असल्यामुळें त्यांचें व माझें तितकें जमत नसे. शिवाय माझा स्वभाव असा बनला होता कीं, मी हिळूनमिळून कोणाशीं वागावयाला जात नसे. कोणाचें भांडणहि काढीत नसे. माझा उद्योग बरा व मी बरा. त्यामुळें माझ्याशींहि कोणी तितक्या जिव्हाळ्यानें वागत नसत. अद्यापिहि माझा स्वभाव तसाच आहे. कोणी मला तुसडा म्हणोत; परंतु परिस्थितिमुळें किंवा माझा जन्मगुण—माझा स्वभाव मनमोकळा नाहीं ही गोष्ट खोटी नाहीं. छापखान्यांतलें काम संपल्यावर देखील मला विश्रांति मिळत नसे. मी छापखानेवाल्यांच्या घरीं रहात होतों; हें सांगितलेंच आहे. स्वतः मालक स्वभावानें चांगले होते; परंतु त्यांच्या घरीं त्यांची एक वडील विधवा भावजय होती, तिचें घरांत अधिक वर्चस्व होतें. तिच्यापुढे छापखानेवाल्यांच्या गरीब बिचाऱ्या पत्नीचें कांहींच चालत नसे. भामाबाई (छापखानेवाल्यांची भावजय) जी गोष्ट करील ती नाकारण्याचें स्वतः मालकाचेहि धारिष्ट नव्हतें. छापखानेवाले व त्यांच्या भावजयींविषयीं मी बऱ्याच विपरीत गोष्टी ऐकल्या होत्या.

घरीं गेल्यावर भामाबाई मला कधींच स्वस्थ बसूं देत नसत. ज्या कामांची वास्तविक जरूर नसे, तें काम काढून ती माझ्या जवळून करून घेई. सर्व बाजारहाट मलाच करावा लागे. प्रथम प्रथम मी मुंबईचा माहितगार नसल्यामुळें माझ्या हातून चुका होत; त्याबद्दल भामाबाईकडून मला यथास्थित शिव्या मिळत असत. या पोटासाठीं तें सर्व निमूटपणें मला सहन करून घ्यावें लागे.

एके दिवशीं भामाबाईनीं बाजारांतून कांहीं जिन्नस आणण्याकरितां माझ्याजवळ पांच रुपायांची एक नोट दिली, 'खर्च जातां बाकीचे पैसे नीट परत आण' म्हणून त्यांनीं बजावून सांगितलें; परंतु माझें दुर्दैव इतकें हट्टी होतें कीं, मला कोणत्याहि कामांत यश येऊं न देण्याचा जसा त्यानें विडाच उचलला होता. संध्याकाळच्यावेळीं भुलेश्वर मार्केटांत गिऱ्हाईकांची किती गर्दी असते, हें ज्याला मुंबईचा अनुभव आहे त्याला नव्यानें सांगण्याची अवश्यकता नाहींच. त्यांत राजरोसपणें खिसेकापूहि फिरून एखाद्या नव्या सावजावर झडप घालण्याची संधी पहात असतातच. जी जिन्नस मला घ्यावयाची होती ती घेऊन बाकीचे तीन रुपये तेरा आणे मी माझ्या कोटाच्या खिशांत काळजीपूर्वक ठेविले. घरीं आल्यानंतर भामाबाईजवळ पैसे द्यावे म्हणून मी कोटाच्या खिशांत हात घातला तों हाताला खिशाचा पत्ताच लागेना, माझा खिसा मला न कळत कोणी तरी कापून घेतला होता. पैसे घेण्याकरितां हात पसरून उभ्या असलेल्या भामाबाई माझ्याकडून पैसे लवकर न मिळाल्यामुळें मला रागाऊन म्हणाल्या.

"काय रे चिंतू, पैसे देतोस ना? मला आपली उभी केली आहे न बावळ्या-

सारखा केव्हांचा खिशांत काय हात घालून उभा आहेस; दे लवकर, मला घरांत काम आहे."

"माझा खिसा पैशासगट कोणी कापून घेतला वाटतं." खालीं पहात मीं भीत भीत म्हणालो.

"काय, हरवले वाटतं पैसे?" आश्चर्यानें भामाबाई उद्गारल्या "तूं बरा नाहीं हरवला गेलास? काय चमत्कार तरी म्हणे खिसा कातरला! असा कसा खिसा कातरला? कुठं तरी पहात असशील बावळ्यासारखा, एवढा मोठा घोड्याएवढा मुलगा, पण अगदींच अजागळ, तें कांहीं नाहीं आण कुठं टाकलेस पैसे ते? तरी मी बजावलं होतं, मला माहितच तूं असा दीडशहाणा आहेस तो. ऐवढी सुद्धां अक्कल नाहीं मग कशाला आला आहेस नोकरी करावयाला? दोन्ही वेळां ऐतं गचागच गिळायला तेवढं येतं; पण अक्कल मात्र कवडीची सुद्धां नाही."

अशाच प्रकारची भामाबाईचीं मुक्ताफळें माझ्यावर पडत असत. मी एका खिडकी-जवळ उभा होतो, माझ्या नेत्रातून आसवे गळत होतीं. भामाबाई एकदा माझ्या अंगावर ओरडून म्हणाली कीं, "जा. कोणाला दिले ते पैसे घेऊन ये. तर घरांत शिरूं देईन. नाहीं तर आम्हाला तुझी जरुर नाहीं."

छापखानेवाल्यांची बायको राधाबाई विचारी इतका वेळ सर्व ऐकत होती. जेव्हा ती मला घरातून जावयाला सांगूं लागली तेव्हां ती म्हणाली, "बाई, तो तरी काय करील बिचारा? तो नवखाच मुंबईत आलेला, त्याच्या न कळत कोणी मेल्यानं खिसा कातरून घेतला असेल! मोठमोठ्या हुशार माणसानासुद्धा मुंबईचे भामटे मेले फसवतात." त्यावर भामाबाई क्रोधानें उसळून म्हणालीः—

"हो-हो तुम्हाला नको काहीं त्याची एवढी तरफदारी करायला. हा काय आतां लहान कां आहे फसायला? अशीं माणसं फसूं लागलीं म्हणजे झालंच. तुम्ही त्याला अशीच फूस देत जा. म्हणजे त्याचे रोज असेंच खिसे कातरले जातील अन् तुमच्या घरांतले पैसेहि जातील. देत जा त्याला दहावीस रुपये रोज, माझं काय मेलीच जातं त्यांत. मला कशाला पाहिजे एवढी पंचाईत, मी आपलीं उद्यां माझ्या माहेरींच जातें. तुमचा संसार अन् तुम्ही काय वाटेल तें करा." भामाबाईचें आकांड-तांडव असें रात्रीपर्यंत चाललें होतें. दर वाक्याला 'मी उद्यां माहेरीं जाते, म्हणून ती म्हणत होती पण मी तेथें असेपर्यंत उद्यां कधींच उगवली नाहीं व तिला कधींच माहेरीं जाताना पाहिलें नाहीं. रात्रीं जेव्हा मालक आले, तेव्हां डोळयांत आसवें आणून 'उद्यां मला माहेरीं धाडा' म्हणून तिनें त्यांना सांगितलें. त्यावरून छाप-खानेवाल्यांना सर्व हकीकत कळली. माझ्या पगारांतून गेलेले पैसे कापून घेण्याचें त्यांनीं जेव्हां भामाबाईला कबूल केले, तेव्हांच ती बाई स्वस्थ बसली. मला म्हणजें पगार फार मिळत होता असें नाहीं, अवघे तीन चार पांच रुपयें मिळत असत; तेहि या महि-न्याला कापून जाणार होते.

मी छापखान्यांत राहिल्याला आतां जवळ जवळ पांच महिने झाले होते. भामाबाईच्या स्वभावाची आतां मला संवय होऊन गेली होती. छापखान्याचें कंटाळवाणें कामहि माझ्या अंगवळणीं पडूं लागलें होतें. इतक्या दिवसांत माझ्या घरची आठवण झाल्याखेरीज माझा एकक्षणहि गेला नसेल. प्रिय मित्र बाबू याची आठवण झाली कीं, माझ्या हृदयाचें पाणी होऊन नेत्रावाटे बाहेर पडत असें. ज्याअर्थी इतकें दिवसपर्यंत भाऊंनीं माझा तपास केला नाहीं, त्याअर्थी त्यांना माझी जरूर नाहींच हा विचार येऊन मला सर्व जग शून्यवत् भासूं लागलें ! आपण स्वतः होऊन अशा या स्थितींत घरीं परत जावयाचें नाहीं हा माझा निश्चय कायम होता. परंतु माझ्यावरचा चोरीचा आरोप खोटा ठरून माझा शोध लावून मला कधींना कधीं तरी भाऊ घरीं परत बोलावतील या आशेवर मी दिवस कंठीत होतो. एखाद्या मजुरामारखा जन्म घालवावा लागेल हा विचार मनांत येऊन माझी अगदीं वेड्यामारखी स्थिति होऊन जात असे. नैराश्यानें उष्ण श्वासोश्वास मी वारंवार सोडीत असें. घरची काय स्थिति आहे हें कळण्याविषयीं माझें मन अगदीं आतूर झालें होतें.

एके दिवशीं छापखान्यांतले नोकर आपसात हळुहळु कांहीं तरी कुचबुजत होते, माझें प्रथम तिकडे लक्ष नव्हतें. माझ्याजवळ काम करणारा मुलगा मला म्हणाला.

" काय रे चिंतू. तुला खरी माहिती असेल ? "

" कसली ? " मी आश्चर्यानें म्हणालों.

" छापखान्याची ! " तो इकडे तिकडे पहात हलक्या आवाजांत म्हणाला, " तूं छापखानेवाल्यांच्या घरीं असतोस, तेव्हां त्यांच्या घरीं काय होतं हें तुला माहित असेल. " खरें पहातां मला कांहींच माहित नव्हतें. छापखानेवाल्यांच्या घरीं मी असे; परंतु त्यांच्या घरच्या भानगडीची मी फारशी चौकशी करीत नसे "कसली छापखान्याची भानगड ? " मी अधिक आश्चर्यानें म्हणालों. त्यावर तो हंसून म्हणालाः—

" अहारे ! तूं एवढा त्यांच्या घरीं रहातोस, पण तुला कांहींच कसं माहीत नाहीं ? छापखान्यावर जप्ती आली आहे, आणि मालक लवकरच तो दुसऱ्या कोणाला तरी विकणार आहेत असं आम्हाला कळलं आहे. " ती गोष्ट ऐकून माझ्या छातींत धस्स झालें ! छापखाना दुसऱ्या कोणी विकत घेतल्यावर आपली वाट काय होणार ? जें व्हावयाचें तें होईल म्हणून मी दैवावर हवाला टाकला ! पुढें खरोखरीच थोड्याच दिवसानीं मालकांनी छापखाना दुसऱ्या मालकाला विकला. त्या छापखान्यात कांहीं तरी राजद्रोही लेख छापला गेला असावा म्हणून त्यावर जप्ती येऊं नये म्हणून मालकांनीं तो विकूनहि टाकला. नव्या मालकाला जुन्या कोणत्याहि नोकराची जरूर नसल्यामुळें त्यानें आम्हां सर्व नोकरांना रजा दिली. छापखाना विकला तेच दिवशीं भामाबाईनीं मला त्यांच्या घरांतूनहि रजा दिली. यापुढें त्यांच्या घरीं हक्कानें रहाण्याला मला बिलकुल अधिकार नव्हता, पुढें काय करावें म्हणून मी अगदीं हताश झालो होतो.

छापखानेवाले गृहस्थ स्वतः दयाळू होते; व मला या साऱ्या मुंबईंत कोणी नाहीं हें त्यांना माहित होते. त्यांच्या ओळखीच्या एका गृहस्थावर त्यांनीं एक शिफारस पत्र दिलें व तो तुला खात्रीनें कांहीं तरी काम देईल असें आश्वासनहि दिलें. त्यांच्या या कृपेबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानून मी परेळरोडकडे जाण्याचा रस्ता धरला. आपल्याला कांहीं तरी काम मिळेल या आशेनें मी झपाझप पावलें टाकीत होतो. बऱ्याच वेळानें इच्छित स्थळीं जाऊन पोंचलो. त्यागृहस्थांची भेट होण्याला प्रथम बराच त्रास पडला कारण ते कांहीं गिरण्यांचे मालक होते व मी असा भिकारी होतो. अखेर त्यांची भेट झाली, पण काय ? तेथें माझी निराशाच झाली ! त्या गृहस्थांनी शिफारस पत्र वाचून तोंड वेडेंवांकडें करून आपल्याला फार वाईट वाटतें असें प्रथमदर्शनीं भासवून नंतर "काय करावें बुवा ! मी कालच एक छोकरा ठेविला ! नाही तर तुम्हांलाच ठेवलें असतें. बरें पण उद्यां दुपारीं या, दुसरीकडे जमल्यास पाहूं." म्हणून त्यांनी मला जवळ जवळ रजाच दिली. " छापखानेवाल्याच्या चिठ्ठीप्रमाणें मला करतां आलें नाहीं म्हणून मला फार वाईट वाटते तुमची दुसरी कांहीं तरी मी जरूर व्यवस्था करीन असें त्यांना सांगा बरें कां ! बरें आहे या ! " म्हणून ते दुसरीकडे निघून गेले. मी मात्र खिन्नांतःकरणानें तेथून बाहेर पडलो. येतांना जितक्या लवकर मी आलो तितक्या लवकर आतां माझे पाय उचलेनात ! निराशेच्या समुद्रांत मी अगदीं खोल खोल जात होतो. क्षणोक्षणीं माझा कंठ दाटून येत होता. कोठें जावें हा विचार माझ्या श्रांत डोक्यांत घोळूं लागला. या जगाच्या अंतापर्यंत माझ्या दुःखाच्या अंताचा पार येणार नाहीं असें मला वाटूं लागलें. जड पावलांनीं मी हळूहळू चाललो होतो. बराच पुढे गेल्यावर मला एक तीनमजली सुंदर बंगला दिसला. बंगल्याभोंवतीं चारी बाजूला उत्कृष्ट बाग होतो. तो बंगला पहाणाराला क्षणभर मोह पाडण्यासारखाच होता. त्या बंगल्यापासून कांहीं अंतरावर मी निःस्तब्धपणें उभा राहिलो. बंगल्याच्या मालकाच्या ऐश्वर्याचा मला हेवा वाटूं लागला. माझ्या स्थितीची व बंगल्याच्या मालकाच्या स्थितीची मी तुलना करूं लागलो. मला कोठेंहि अंग टेकावयाला त्या विस्तीर्ण मुंबई शहरांत जागा नव्हती, मूळचा रंग बदलून अगदीं फिक्कट झालेला, गळ्याची कॉलर फाटलेली व हाताच्या कोंपरावरहि बाही फाटलेली घरून निघतेवेळीं माझ्या अंगांत जो एक कोट होता तोच अद्यापहि माझ्या अंगांत होता. छापखान्यांत राहिल्यानंतर धोतर मात्र विकत घेतलें होतें, पायांत जोडा नसल्यामुळें चालून चालून पायावर धुरळ्याचीं पुटें बसलीं आहेत, असा भणंगासारखा मी कोठें, व ऐश्वर्यांत लोळणारा तो बंगल्याचा मालक कोठें ? परमेश्वरा ! माझ्या हातून काय बरें पातक घडलें, कीं तूं माझ्यावर अशी अवकृपा करावीस ? भाऊंना न विचारतां मी घराचा त्याग केला म्हणून तर तूं माझ्यावर कोपला नाहींस ना ? किती वेळ तरी मी त्या बंगल्याकडे पहात उभा होतो. इतक्यांत एक सात आठ वर्षांचा सुस्वरूप मुलगा एका उमद्या तट्टावर बसून त्या बंगल्याच्या फाटकांतून बाहेर आला व त्या तट्टाला तेथेंच फिरवूं लागला. त्या लहान बालकाला

निर्भयपणें त्या तट्टावर बसून इकडेतिकडे आनंदानें फिरतांना पाहून मला फार कौतुक वाटलें व मी त्याच्याकडे कुतूहलानें पहात तेथेंच उभा राहिलो.

इकडे तिकडे दोन तीन वेळ चक्कर मारल्यावर तें तट्टु जें एकेजागीं खुंटाळून उभें राहीलें, तें कांहीं केल्या त्या बालकाच्या मर्जीप्रमाणें जागचें हालेना. त्यानें कांहीं वेळ त्याला चुचकारून पाहिले, पण तें हट्टी तट्टु जागचें टीचभर देखील हालेना. आतां मात्र त्या बालकाला त्या आपल्या सवंगड्याचा राग येऊन त्यानें त्याला एक जोराचा छडीचा सटका दिला; त्याबरोबर तें तट्टू त्वेषानें एकदम मागच्या दोन्ही पायांवर उभें राहिलें व त्या लहानग्या स्वाराला तें हट्टी जनावर आवरतां येईना. आतां आपण खात्रीने पडणार असें वाटून तो स्वार अगदीं घाबरून गेला. इतका वेळ मी दूर उभा राहून पहात होतो, परंतु त्या बालकाची अडचण पाहून मी एकदम पुढें धांवत गेलो व त्या तट्टाची लगाम चटकन धरली. माझ्याशीं झटापट करण्याचा त्या तट्टानें प्रयत्न केला पण मी त्याला घट्ट धरून ठेविला होता. झटापटींत त्यानें माझ्या पायावर जोराने टाच मारल्यामुळें माझ्या पायातून रक्त येऊं लागले. इतक्या अवधींत बंगल्यांतून दोघेतिघे नोकर व एक सभ्य गृहस्थ बाहेर आले. त्याच्या पोषाखावरून ते गुजराथी असावें असें मला वाटलें. एका नोकराने त्या तुफानी जनावराला धरलें व दुसऱ्यानें त्या बालकाला खालीं उतरविलें. त्या गुजराथी गृहस्थानें त्या बालकाला गुजराथी भाषेंतच कांहीं प्रश्न केलें. मला त्यावेळीं गुजराथी भाषा बिलकुल बोलतां येत नव्हती, परंतु थोडी थोडी समजत होती. मलाहि ते विचारूं लागले, पण मला गुजराथी बोलता न आल्यामुळे मी त्याना मराठींत उत्तरें दिलीं. तेहि माझ्याशीं अर्धवट मराठी व अर्धवट गुजराथी भाषेंत बोलूं लागले. त्या गृहस्थाचाच तो मुलगा होता. प्रथम त्याचे लक्ष माझ्या पायाकडे गेले नाहीं, परंतु त्या मुलाने ती गोष्ट आपल्या पित्याच्या नजरेस आणून दिली. मला तो बंगल्यात येण्याविषयी फार आग्रह करूं लागला. तो मुलगा दिसण्यात सुंदर असून स्वभावानें गोड होता. शेटसाहेब फार उंचही नव्हते तसे फार ठेंगूही नव्हतें, व शरीरानें सुदृढ असून त्याचें पोट जरा मोठें होतें. त्याचे नेत्र तेजस्वी असून चेहरा उदार व गंभीर दिसत होता. मी आंत येत नाहीं असे पाहून माझा हात प्रेमानें धरून व किंचित हास्य करून ते म्हणाले:—

" तुम्हीं आत का येत नाहीं ? माझ्या मोहनला आज तुम्ही वाचविलें, तेव्हां त्याच्या आईची व तुमची ओळख जरूर झालीं पाहिजे." मोहनकडे वळून ते म्हणाले " मोहन, तुला मी म्हणत होतो, त्या तट्टावर बसून एकटा बाहेर जाऊं नकोस, पण तूं ऐकलें नाहींस. त्यामुळें यांच्या पायाला बघ केवढी दुखापत झाली. चला चला आत चला, तुमच्या पायाला कांहीं तरी उपाय केला पाहिजे! " त्यांचा जास्त आग्रह पाहून मी आत गेलो. मला माझ्या पोषाखाची लाज वाटत होती. प्रथम माझ्या समजण्यांत आलें नाहीं, पण आतां मात्र मला पाय उचलवेना. तट्टाची टाच पायावर

जोरानें पडून वरचें कातडें ओरबडून निघालें होतें; व आंतलें हाड दिसत होतें. शेटसाहेबांनीं जवळच असलेल्या डॉक्टरला ताबडतोब बोलावून आणून माझ्या पायाला लागलांच उपचार केला. पाय बांधून डॉक्टर गेल्यावर मला कोठें जावयाचें म्हणून शेटसाहेबांनीं विचारलें. मी त्यांना उत्तर काय देणार! मला कोठें जावयाचें आहे म्हणून सांगू? मी खिन्नपणे खालीं मान घातली व दोन अश्रूबिंदू माझ्या डोळ्यांतून पडले. मला काय दुःख होत आहे म्हणून ममतेनें शेटसाहेबांनीं विचारलें त्यावर माझ्या ओळखीचें अगर नात्याचें मुंबईंत कोणीच नसून मी येथें अगदींच एकटा आहे असें माझ्याकडून कळतांच सध्यां त्यांच्या बंगल्यातच रहाण्याविषयीं त्यांनीं मला फार आग्रह केला. शेटसाहेब फार दयाळू होते.त्यांच्या अत्याग्रहामुळें मला त्यांचें मन मोडता येईना. त्यांच्या मुलामुळें मला दुखापत झाली होती हें जाणून त्यांनीं माझी सोय त्यांच्या बंगल्यातच केली व नाइलाजास्तव त्यांचें म्हणणें सध्यांतरी मला कबूल करावें लागलें. दुसरें काय करणार? मी कोठें जाणार? मला जावयाला कोठेंच जागा नव्हती.कांहीं दिवस मी तेथेंच रहाणार आहे हें ऐकून मोहनलालला फार आनंद झाला.

---

## स्मृति अकरावी.

# शेट भगवानदासांचें कुटुंब.



माझ्या पायाला इजा झाल्यामुळें व मला दुसऱ्या कोठेंहि थारा नसल्यामुळें शेट भगवानदास यांनीं उदारपणें मला आपल्या घरीं ठेऊन घेतलें. माझा पाय साफ बरा व्हावयाला एक आठवडा लागला. तितक्या अवधींत शेटसाहेबांच्या मंडळींनीं मला आपल्या कुटुंबांतल्या माणसाप्रमाणें लेखून माझ्याविषयीं जी कळकळ व प्रेम दाखविलें तें मी यावज्जीव विसरणार नाहीं. पुढेंहि त्यांनीं माझ्यावर जे अनेक उपकार केलें आहेत ते माझ्या हातून कधींहि फिटणार नाहींत. शेटसाहेबांच्या घरीं मी एक आठवडा राहिल्याकारणानें आतां मला त्यांची गुजराथी भाषा बरीच समजूं लागली. त्यांच्या कुटुंबांत त्यांच्या प्रथमपत्नीच्या दोन कन्या, वडील मोटीबेन, वीस बावीस वर्षांची असेल, तिचें लग्न तिच्या लहानपणींच झालें होतें; परंतु दुर्दैवानें तिला पतिसौख्य मुळींच लाभलें नव्हतें. लग्न होऊन दोन अडीच महिन्याच्या आंत तिला वैधव्य दशेची दारुण आंच लागली. तेव्हांपासून ती आपल्या पित्याच्या घरींच रहात असे. दुसरी मुलगी मणीबेन. ही सोळासतरा वर्षांची होती, व अद्याप अविवाहित होती, वडील मुलीची तशी स्थिति झाल्यामुळें लोकापवादाला न जुमानतां शेटसाहेबांनीं आपल्या मुलीला अद्याप अविवाहितच ठेविली होती. प्रथम पत्नी स्वर्गवासी झाल्यानंतर शेटसावांनीं द्वितीय संबंध केला होता; त्यांची द्वितीय पत्नी पंचवीस सव्वीस वर्षांची असेल. मोहनलाल हा त्यांचा एकच मुलगा असून तो

त्यांच्या दुसऱ्या पत्नीचें अपत्य होय. त्याशिवाय त्यांच्या एका दूरच्या आप्ताचा अनाथ मुलगा त्यांनीं त्याच्या अगदीं बालपणापासून बाळगला होता. त्याचें नांव मगनलाल असून त्यावेळीं त्याचें वय चोवीसपंचवीस वर्षांचे होतें. शेट साहेबाशिवाय त्यांच्या घरांत एकंदर वर दर्शविलेली मंडळी होती.

मी तेथें असेंपर्यंत सर्व मंडळी माझ्याशीं ममतेनें वागत असत, परंतु त्यांत मोहनलालचा तर माझ्यावर एवढा लोभ जडला कीं, तो मला क्षणभरहि विसंबत नसे, तसाच तो घटकाभर माझ्या दृष्टीस पडला नाहीं तर मलाहि चैन पडत नसे. त्याच्या त्या प्रेमळपणाच्या सहवासांत मला माझ्या पायाचें दुःख मुळींच जाणवलें नाहीं. ते आठ दिवस किती लवकर निघून गेले हें मला कळलें नाहीं. माझा पाय साधारण बरा झाल्यावर व मी हिंडूं फिरूं लागल्यावर आतां अधिक दिवस शेट साहेबाच्या औदार्याचा असा उपयोग करून घेणें मूर्खपणाचें लक्षण होय असें मला वाटूं लागलें. परंतु येथून कोठें जावें व काय करावें हें कांहींच सुचेना, तसेंच पायाच्या सबबीवर तेथें फार दिवस राहणेंहि बरें वाटेना. कोठें तरी शेटसाहेबाच्या वशिल्यानें जर आपणास एखादी नोकरी मिळाली तर त्यांना विचारून पहावें, असा विचार माझ्या मनांत आला. शेटसाहेबाना विचारण्याचें प्रथम मला धैर्य होईना! अखेर मनाचा धडा करून दुसऱ्या दिवशीं शेटसाहेब त्यांच्या खोलींत एकटेच बसले आहेत अशी संधि साधून मी हलकेच खोलीच्या दाराजवळ जाऊन उभा राहिलों. दाराकडे तोंड करून सिगारेट ओढत शेटसाहेब बसले होते; मी दाराजवळ उभा रहातांच किंचित् हास्य करून मला आंत येण्यास त्यांनीं सांगितलें व तेथल्या एका खुर्चीवर बसण्यास सुचविलें. मी खुर्चीवर न बसता एका खुर्चीला धरून उभा होतो. मी बसत नाहीं असें पाहून शेटसाहेब म्हणाले:—

" कां? चिंतामणी, आज आमचा मोहन कोठें गेला तुम्हांला सोडून? हं. बसा त्या खुर्चीवर उभे कां राहता?"

" शेटसाहेब—" माझ्या तोंडून शब्द फुटेना.

" बसा, बसा खालीं. काय तुम्हाला सांगायचें तें सावकाश सांगा." हंसत हंसत शेटसाहेब म्हणाले. आतां मला धीर आला. मी न बसतांच म्हणालो:—

" माझा पाय आतां साफ बरा झाला, तेव्हां आपण मला आतां रजा द्यावी."

" कां? एवढी कसली गर्दी आहे तुम्हांला? अद्याप तुमचा पाय कांहीं साफ बरा झाला नाहीं?"

" पण; आता मला चांगलें चालतां येतें."

" हो, पण या मुंबईंत तर तुमचें कोणी नाहीं, मग तुम्ही कोणीकडे जाणार?"

माझ्या नेत्रांत अश्रू उभे राहिले. मी खालीं पहात म्हणालों. " हो. माझें येथें कोणींच नाहीं. तरी पण असा आपल्या येथें मी किती दिवस राहूं? आपण जर कृपा

करून मला कोठें कोणतीहि नोकरी लावून द्याल तर आपले माझ्यावर फार उपकार होतील." हातांतली सिगारेट खिडकींतून बाहेर फेकून माझ्याकडे पहात शेटसाहेब म्हणाले:—

"तुम्हांला तुमच्या नात्यागोत्याचें कोणीच नाहीं कां?" मी कांहीं बोलत नाहीं हें पाहून पुनः ते म्हणाले "तुमचें वय अद्याप लहान आहे. विद्या शिकायची सोडून तुम्ही एव्हांपासून नोकरी करणार काय?"

"माझें येथे कोणीच नाहीं. माझें पोट मलाच भरलें पाहिजे, मला विद्या कोण शिकविणार?" डोळे पुसून मी म्हणालों.

"मग तुम्हांला लिहितां वाचतां मुळींच येत नाहीं कां?"

"येथें येण्यापूर्वी मी शाळेंत जात होतो. मराठी चार इयत्तेपर्यंत शिकून इंग्रजी पांचव्या वर्गात असता तसाच कांहीं प्रसंग येऊन मला शाळा सोडून नोकरी-साठीं येथें यावें लागलें."

किंचित् काल विचार करून व आपल्या पोटावरून हात फिरवित ते म्हणाले, "कोणती नोकरी कराल?"

"जी मिळेल ती." मी म्हणालों.

"बरें आहे. आमच्या ऑफीसमध्यें मी तुमची कांहीं तरी व्यवस्था करतो. तुमचे वय फार लहान आहे; तुम्ही साधारण लिहिण्याबिहिण्याचें काम करूं शकाल काय?"

"आपण जें काम सागाल तें मी आनंदानें करीन. लिहिण्याचेंही करूं शकेन." आतां मला बरीच आशा उत्पन्न झाली होती. आशातूरपणानें मी त्यांच्या मुखाकडे पाहूं लागलो. इतक्यात मोहनलाल मला शोधीत शोधीत तेथें आला. माझ्याकडे येऊन हंसत हंसत तो म्हणाला:—

"वा! वा! तुम्ही तर बाप्पाजवळ गोष्टी सांगत बसला अहां! मी केव्हांपासून तुम्हाला शोधीत आहे. हं चला आता आपल्या खोलींत. तुम्ही कबूल केल्याप्रमाणें मला कागदाचीं चित्रं करून द्या पाहूं?" तो माझा हात ओढूं लागला व आपल्या पित्याकडे पाहून म्हणाला:—

"बाप्पा यांना फार छान चित्रंबित्रं येतात बरं कां? मी किती तरी यांच्या जवळून करवून घेतलीं. आणि कशा मजेदार गोष्टी पण सांगतां येतात बरं कां! तुम्ही एक दिवस संध्याकाळीं ऐकायला तर या." पुढें जरा मोठयानें हंसून तो म्हणाला "पण, बाप्पा, यांना आपली भाषा कांहीं चांगली बोलतां येत नाहीं. हे किती तरी चुका करतात." व शेवटीं तो फारच मोठ्यानें हंसूं लागला. शेटसाहेब त्याच्याकडे पाहून हंसत त्याची थट्टा करणाच्या हेतूनें म्हणाले:—

"मोहन, तूं चिंतामणीला गुजराथी बोलतां येत नाहीं म्हणून हंसतोस, तर ते तुझ्यावर रुसून आज आपल्या घरीं जाणार आहेत." त्यांचें तें बोलणें ऐकतांच मोहन माझा हात घट्ट धरून म्हणाला:—

"खरंच कां हो? अं हं. मी कांहीं तुम्हाला जाऊं देणार नाहीं. तुमच्या गुजराथी बोलण्याला मी कधीं कधीं सुद्धां हंसणार नाहीं." डोळ्यांत पाणी आणून तो आपल्या पित्याकडे वळून म्हणाला,

" बाप्पा तुम्ही यांना कांहीं तरी सांगाना? यांना नका जाऊं देऊं. " त्या थोड्या दिवसांत मोहनलालचें माझ्यावर केवढें प्रेम जडलें होतें, याचा अनुभव शेटसाहेबांना आला. मोहनला ते म्हणाले,

" नाहीं. मोहन, आपण त्यांना इतक्यांत जाऊं देणार नाहीं " लगेच माझ्याकडे वळून ते म्हणाले " पहा. चिंतामणी, तुम्हाला न जाऊं देण्याविषयीं मोहन रदबली करतो आहे. तेव्हां आज तर आम्ही तुम्हाला जाऊं देणार नाहीं. तुमची मी कांहींतरी तजवीज करतो, तुम्ही आतां मोहनबरोबर जा. मी तुम्हाला उद्या काय तें सांगेन. "

मी व मोहनलाल नंतर माडीवर मोहनलालच्या खोलींत गेलो. शेटसाहेबांच्या आश्वासनानें मला बराच धीर आला होता. दुसरा दिवस केव्हां उगवतो व आपल्या खडतर दैवाचें भविष्य आपल्याला केव्हां कळतें असें मला झालें होतें. माझें नशिब किती विलक्षण आहे याची मला इतक्या दिवसाच्या अनुभवावरून चांगलीच कल्पना झालेली असल्यामुळें आकस्मिक कांहीं कारणावरून आपल्याला कबूल केल्याप्रमाणें जर शेटसाहेब वागले नाहीं तर कसें? मला कोणत्याहि गोष्टीविषयीं शाश्वती वाटत नव्हती. कोणत्यावेळीं माझें दैव उलट खाऊन मला दगा देईल याचा नेम नव्हता. जगात माझ्या आजपर्यंतच्या अल्प आयुष्यांत सर्वजण माझा तिरस्कार व कंटाळा करीत होते. व परमेश्वरहि आपला तिरस्कार करीत आहे अशी माझी खात्री होती. लहानपणीं माझी आजी परमेश्वराच्या कनवाळूपणाविषयीं जेव्हा तेव्हां सांगत असे. माझ्या हातून कांहीं पातक झालेंच नाहीं, अशी माझी प्रामाणिक समजूत होती. कारण कोणत्याहि माणसाला आपण अमुक एक पातक करीत आहों असें कधींच वाटत नसतें. असो.

दुसरा दिवस शनिवार होता. शेटसाहेब घरीं आल्यानंतर त्याच्या ऑफीसांत मला दाखल केल्याचें त्यानीं सांगितलें व सोमवारपासून ऑफीसमध्यें जावयाचे होतें. शेटसाहेबांच्या उदारपणाबद्दल मला किती हर्ष झाला याची कल्पनाच करावी! माझ्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहीले व कृतज्ञतेनें माझें हृदय भरून आलें. कोणत्या शब्दानीं त्यांचें आभार मानावें हें मला कळेना! फक्त नोकरी देऊनच ते राहिले नाहींत, मी निराधार आहे व मला राहण्याला कोठेच स्थळ नाहीं हें जाणून त्यानीं मोहनलालला शिकविण्याच्या मिषानें मला यापुढें आपल्याच घरीं रहाण्याची फार भीड घातली. सकाळसंध्याकाळ मोहनलाल बरोबर राहून त्याला हळुहळु विद्येची गोडी लागेल असें करावे. मोहनलालला सातवें अगर आठवें वर्ष होतें. तो आपल्या मातेचा फार लाडका असल्यामुळें शेटसाहेबाच्या मनांत असतांहि अद्याप त्याला शाळेत दाखल केलें नव्हते. घरीं शिक्षक ठेऊन आणखी कांहीं दिवस त्याला शिक्षण देण्याचा त्यांचा विचार होता.

तो घरच्या शिक्षकाला बिलकुल दाद देत नसे. मनास वाटलें तर शिकावें नाहीं तर हातांत पाटी धरूंच नये. शिक्षकानें कितीहि सांगितलें तरी तिकडे लक्ष देऊंच नये व फार झालें तर आपल्या आईची त्याला धमकी द्यावी. असें त्याचें शिक्षण चाललें होतें. श्रीमंताचा एकुलताएक मुलगा असल्यामुळें शिक्षकाला त्याच्यावर फारसा दाब ठेवतां येईना. आपला पगार वेंळच्यावेंळीं मिळतो आहे मग तो शिको अगर न शिको असें वाटून ध्यावी तितकी काळजी शिक्षक घेत नसत. मी आल्यापासून थोडयाच दिवसांत त्याचा पूर्वीचा दांडगेपणा बराच कमी झाला होता असें त्याची आई वगैरे म्हणत असे. मी कोणतीहि गोष्ट सांगितल्यास तो ना म्हणत नसे. सारावेळ माझ्या भोंवतीभोंवती असे, माझेंहि त्याच्यावर अतिशय प्रेम बसलें होतें. माझा स्वभाव एकलकोंडा होता, तरी मोहनवर माझें प्रेम लहान भावाप्रमाणें जडलें. काय चमत्कार आहे पहा ? ज्याची माझी जन्मांत गांठ पडण्याचा संभव नव्हता, जो माझ्या जातीचाहि नव्हता व जो इतक्या ऐश्वर्यात वाढलेला, त्याचें माझ्यासारख्या सर्वांनीं तुच्छ मानलेल्या, रस्त्यांत भटकणाऱ्या एका यत्किंचित् माणसावर एवढें प्रेम बसावें ! मोहनलालचा स्वभाव बराच हट्टी होता; त्याच्या मातापित्याकडून मला तेथेंच रहाण्याचें कबूल करवून घेऊन, नंतर तो माझ्या पिच्छाला बसला. जेव्हां मी तेथें रहाण्याचें त्याचें म्हणणें कबूल केलें, तेव्हाच तो स्वस्थ राहिला. शेटसाहेबांसारख्या धनिक गृहस्थाला माझ्यासारख्या दहा इसमाला बाळगण्यास जड नव्हतें; परंतु ऊंस गोड लागला म्हणजे मुळासगट खाणें मूर्खपणा नव्हें कां ? मोहनलालच्या समजुतीकरता कांहीं दिवस राहून नंतर आपण आपली सोय दुसरीकडे करावी असें मी ठरविलें व त्यानंतर मी तेथेंच राहूं लागलो.

शेट भगवानदासांचें कुटुंब प्रथम साधारण स्थितींतलें होतें, त्यांच्या वडिलांचें सुरतेस एक कापडाचें दुकान होते. भगवानदासाचें वडिल फार देवधर्मी व भोळ्या स्वभावाचें होते. सचोटीनें जो फायदा मिळे त्यावर ते आनंदानें आपल्या कुटुंबाचें पोषण करीत असत. लहानपणापासून भगवानदास फार तीव्र बुद्धीचें असल्यामुळें सोळाव्या वर्षीं मॅट्रिक पास होऊन ते आपल्या धंद्यांत शिरले; कांहीं दिवस वडिलांचें दुकान चालवून पुढें ते मुंबईस आले व थोडयाच वर्षांत त्यांनीं आपल्या धंद्यांत चांगलें यश संपादन केलें. नंतर त्यांनी एक बॅंक स्थापन केली. भगवानदासाच्या दीर्घपरिश्रमानें व हुशारीने बॅंकेला हल्लींची उत्कृष्ट स्थिति प्राप्त झाली होती. त्याशिवाय कापडाच्या दोनतीन गिरण्याचे ते मालक होते. त्यांचें वय त्यावेळीं फार नव्हतें, चाळीसपंचेचाळीस वर्षांचें तें असावें; त्यांचा स्वभाव फार शांत होता; थोर पुरुषांच्या ठायीं दिसून येणारा एकप्रकारचा गंभीरपणा व भव्यपणा त्यांच्या चेहऱ्यांत होता. कपाळ रुंद असून नाक अगदीं बांकदार होतें. बोलतांना आपल्या मोठ्या पोटावरून वारंवार हात फिरविण्याची त्यांना संवय होती. त्यांची प्रथम पत्नी वारल्यावर जरी त्यांनीं द्वितीय विवाह केला होता, तरी त्यांनीं आपल्या दोन मुलींची त्यांच्या मातेच्या मागें कधींच हेळसांड केली नव्हती.

त्यांची वडील मुलगी मोटीबेन त्यांच्या येथें आल्यापासून घरची सर्व व्यवस्था पहाण्याचें त्यांनीं तिच्याचकडे सोंपविलें होतें. तिच्या मर्जीविरुद्ध एकहि गोष्ट होतां कामा नये, अशी त्यांची सर्वांना ताकीद होती. घरासंबंधीं एकादी गोष्ट करावयाची झाल्यास ते स्वतः मोटीबेनचा विचार घेतल्यावांचून कोणतीहि गोष्ट करीत नसत. त्यामुळें तिच्या विरुद्ध मोहनलालच्या आईलाहि कांहीं करतां येत नसे मग इतरांचे विचारावयालाच नको. स्वतः शेटसाहेब आज जरी गाडीघोडे उडवीत होते; तरी त्यांना आपल्या ऐश्वर्याचा यत्किंचित् देखील गर्व किंवा अभिमान नव्हता. ते सर्वांशीं ममतेनें वागत. त्यांच्याविषयीं कितीहि वर्णन केलें तरी अपुरेंच आहे.

---

## स्मृति बारावी.

# सिंहावलोकन.



शेटसाहेबांच्या बँकेंत नोकरीस राहील्याला आतां मला जवळ जवल तीन महिनें झालें होते. मोहनलालच्या अत्याग्रहावरून कांहीं दिवस तेथें राहून नंतर दुसऱ्या कोठें तरी रहावयास जाण्याचा माझा विचार होता. त्याप्रमाणें एके दिवशीं मी माझा विचार मोहनलालच्या आईला कळविला असतां त्यांनीं ती गोष्ट नाकबूल केली. त्या म्हणाल्या कीं, "या तीन महिन्यांत मोहनालच्या खोड्या बऱ्याच कमी होऊन तो पूर्वीसारखा फार हट्टहि करीत नाहीं व अभ्यासहि थोडा थोडा करूं लागला आहे, तर तुम्ही सध्यांच दुसरीकडे जाण्याची गर्दी करूं नका. आणखी कांहीं दिवस तरी रहा. आमच्या येथे तुम्हाला ठीक पडत नसलें तर उपाय नाहीं. बाकी आम्ही तुम्हाला आमच्यापैकींच एक लेखतो, तसा तुम्हाला परकेपणा वाटायला नको." त्यावर मला जास्त बोलता येईना. मला आतां नोकरी लागली होती व आतां आपला भार दुसऱ्यावर अधिक घालणें बरोबर नाहीं असें मला वाटत असतांहि त्या प्रेमळ कुटुंबांतल्या माणसांच्या मर्जीबाहेर वागतां येईना. अशा रीतीनें मी दररोज जाण्याचा विचार करावा व शेटसाहेबांकडून, त्यांच्या पत्नीकडून अगर मोहनलालकडून अडथळा यावा-त्यामुळें इतकें दिवस झालें तरी मी अद्याप त्यांचेच येथें होतो.

पावसाळा नुकताच सुरू झाला होता; चार दिवस सतत रात्रंदिवस पाऊस पडत असल्यामुळें सूर्यदर्शन मुळींच झालें नव्हतें. हवेंत एक प्रकारचा गारवा व कोंदटपणा आला होता; पावसाचे कृष्णवर्णी मेघ लढाईतून पळत सुटलेल्या दैत्यसेनेप्रमाणें इकडून तिकडून सैरावैरा धांवत आहेत असा भास होत होता. दुपारीं भर बारा वाजतांहि स्वच्छ प्रकाश नसल्याकारणानें मनाला उदासीनपणा प्राप्त होत होता; आज सकाळपासून मात्र पाऊस अगदीं बंद पडला होता. सहस्ररश्मी आपल्या सर्व रश्मींनीं प्रकाशमान झालेला होता. चार दिवसांचा उदासीनपणा जाऊन मनाला आल्हाद वाटत होता.

दोन वाजण्याचा सुमार होता; मी ऑफिसांत कांहीं लिहित बसलों होतो. मी ऑफिसांत नवा असून मला कामाची तर बिलकूल माहिती नव्हती. माझ्याकडें जें काम सोपलें होतें तें कांहींच महत्त्वाचें नव्हतें व त्यांतही माझ्या ज्या चुका होतील त्याबद्दल मला नीट माहिती देण्यास तेथल्या लोकांना शेटसाहेबांनीं सांगितलें होतें. मला बहुतकरून विशेषसें काम नसेच. माझ्या बसावयाच्या जागेसमोर मुख्य दरवाजा असून बसल्या बसल्या समोरील सडकेवरची धांदल माझ्या सहज नजरेस पडे. मी हातात टांक घेऊन समोरच्या सडकेवरची मौज पहात होतो एका हमालाच्या डोक्यावरील बोज्याचा धक्का एका दुधवाल्या भय्याला लागून त्याचे सर्व दूध सडकेवर सांडले व त्या दुधावर पाय घसरून एक गृहस्थ सपशेल उताणे पडले. त्यामुळे कित्येक लोकांचा हास्यध्वनी कानावर येऊन मलाहि हसूं येत होते. इतक्यांत एक व्हिक्टोरिया दरवाज्यासमोर येऊन उभी राहिली व आतून एक मुलगा आणि एक गृहस्थ अशा दोन व्यक्ति उतरून आमच्या ऑफिसमध्यें आल्या.

आलेले गृहस्थ जवळ जवळ चाळीस वर्षांच्या उमरीचे होते. त्याचे केश तुरळक तुरळक पांढरे झालेले असून ते डाव्या पायानें किंचित लंगडत काठीच्या आधारानें चालत होतें. तरीपण ते गृहस्थ तोंडावरून अगदीं तरुण असेंच दिसत. त्यांच्याबरोबर असलेला मुलगा चौदापंधरा वर्षांचा दिसत होता. तो त्या गृहस्थांचा मुलगा असावा असें वाटत होतें. मुलगा फारच देखणा होता, त्याच्या चेहऱ्यांत इतकी कांहीं आकर्षणशक्ति होती कीं, तो तेथें असेंपर्यंत मी त्याच्याकडे अगदीं अनिमिष नेत्रानें पहात होतो. त्याच्या चेहऱ्यावरून दुसरीकडे दृष्टी वळविण्याचा मी प्रयत्नच केला नाहीं. माझ्या त्या वेडगळ वर्तनाचें त्याला हसूंही आलें असेल. त्यां दोघाचें नातें कांहींहि असो; परंतु मी माझ्या मनात त्यांचें नातें पितापुत्रांचें जोडून दिलें. ते गृहस्थ त्या मुलाला तेथेंच बसण्यास सांगून स्वतः ऑफिसच्या आंतल्या भागांत गेले. तो मुलगा माझ्यासमोरच बसला होता, मी एकहि क्षण न विसंबता त्याच्या मुखाकडे टक लावून पहात होतो; माझ्या त्या हास्यास्पद वर्तनाचा तिरस्कार येऊन किंवा राग येऊनच कीं काय तो मुलगा तेथून उठून दुसऱ्या बाजूला जाऊन बसला. आतां त्याची माझ्याकडे जरी पाठ होती, तरी मी त्याच्या पाठीचेंच निरीक्षण चालविलें होतें. घटकाभरानें आंत गेलेले गृहस्थ बाहेर आले व त्या मुलाचा हात आपल्या हातांत घेऊन जाऊं लागले. जातांजातां त्यामुलानें माझ्याकडे पाहिलें व मधूर हास्य केलें. अहाहा! किती मधूर हास्य तें? त्याचें नांव काय म्हणून मी चौकशी केली, परंतु त्याचें नांव मला कळलें नाहीं. त्या गृहस्थांची आमच्या बँकेंत बरीच रक्कम असून, त्यांचें नांव बापुसाहेब देशमुख व तो त्यांचा मुलगा एवढींच माहिती मला मिळाली. क्षणोक्षणीं त्या सुंदर मुलाचा चेहरा माझ्या दृष्टीपुढें येत होता. ऑफिस सुटल्यानंतर मी घरीं गेलो, मोहनलालबरोबर मी त्याचें आवडीचें खेळ खेळून त्याची करमणूक करीत होतो; परंतु त्या मुलाचा चेहरा वारंवार मला दिसत होता. रात्रीं मी बिछान्यावर पडलों

तरी तो मुलगा माझ्याकडे हंसून पहात आहे असा मला भास होत होता. दररोज आपल्या दृष्टीपथामधून किती तरी वेगवेगळया मनुष्यांच्या मुखाकृति जात असतात, त्यापैकी एखाद्याचाच चेहरा इतका कांहीं आकर्षक असतो कीं, तो जरी आपल्या दृष्टीला अगदीं अल्पावधीपर्यंत पडला तरी तो आपल्या अंतःकरणात कायमचा कोरला जातो. त्या मुलाला फक्त मी पंधरा मिनिटेंच पाहिला असेल, पण त्याचा तो मोहक चेहरा माझ्या हृदयांत कायमचा कोरला गेला. तो कोण, कोठला, त्याचे नांव गाव कळावें अशी मला अनिवार इच्छा उत्पन्न झाली. तो एक श्रीमंताचा मुलगा असून त्याची व माझी ओळख होणे अगदीं अशक्य होतें. त्या मुलाविषयीं मला यत्किंचित् देखील माहिती नसता मी किती तरी वेळ त्याच्याच संबंधानें विचार करीत होतो. मी ज्या खोलींत निजत असे ती खोली मोहनलालची होती व त्यात कांहीं रविवर्म्याचीं उत्कृष्ट चित्रें टांगली होतीं. त्यापैकीं एका चित्रांत यशोदेला गौळणी कृष्णाची गाऱ्हाणीं सांगावयाला आल्या आहेत व कृष्ण यशोदेच्या मागे उभा राहून गौळणीकडे खोडसाळपणाने पाहून गालांतल्या गालांत हंसत आहे असा प्रसंग होता. त्या चित्राकडे माझी दृष्टी जातांच त्या चित्रांतल्या श्रीकृष्णाचें व मी ज्याच्याविषयीं आज दुपारपासून विचार करतो आहे त्या माझ्या अपरिचित चित्राचें अगदीं तंतोतंत साम्य पाहून मला फार आश्चर्य वाटलें. ते काळेभोर हंसरे पाणीदार नेत्र, त्या आरक्त ओठावर विलसणारें मधूर स्मित, तें भ्रमरासारखे कुरुळ केस त्या मुलाचा चेहरा पाहूनच रविवर्म्यानें हें श्रीकृष्णाचें चित्र रेखाटलें असावें असें मला वाटलें. त्या अपरिचित तरुण मुलाविषयीं एक सारखा विचार करूं लागल्यामुळे माझें मलाच चमत्कारिक वाटूं लागलें. दुसरीकडे माझें लक्ष वेधण्याचा यत्न करूं लागलो परंतु त्याचा चेहरा कांहीं केल्या माझ्या मानसचक्षुपुढून दूर होईना. स्वप्नांतहि तोच मुलगा मला दिसत होता; त्यानें मला इतक्या थोड्या अवधींत इतकें वेड लावले !

त्या दिवसापासून ऑफीसांत आल्यावर व ऑफीस सुटेपर्यंत रोज मी त्या मुलाची वाट पहात असे, पण तो मला पुनः दिसला नाहीं. त्याहि गोष्टीला आतां दोन महिने निघून गेले..मी अद्याप शेटसाहेबांच्याच घरीं होतो. रात्रीचे अकरा वाजले असतील, मी बिछान्यावर निजलो होतो, पण मला कांहीं केल्या झोंप येईना. माझ्या खोलीच्या पलीकडे मोटीबेनची निजावयाची खोली होती व त्याच्याच शेजारीं मणीबेनची खोली होती. माझ्या मनांत घरासंबंधी विचार चालले होते. घर सोडून मला जवळ जवळ दहा महिने झाले होते; घराकडील कांहींच बातमी न कळल्यामुळें मला कसेंसेंच वाटत होतें. भाऊंना खरोखरीच का माझी जरूर नाहीं ? त्यांनीं माझा अद्याप कोठेंच शोध केला नसेल काय ? अद्यापहि मीच चोरी केली असें त्यांना वाटत असेल काय ? बाबू काय करीत असेल ? भिमा काय करीत असेल? तिला खोटें सांगून तिच्या रुपयांचा आपण काय उपयोग केला याची तिला बिचारीला प्रथम कल्पना तरी आली असेल काय ? वैराग्य येऊन घराचा त्याग केला असला तरी जीव घराकडील

बातमी ऐकण्यास किती उत्सुक असतो त्याचा मला त्यावेळीं अनुभव आला. एकदां तरी घरीं जाऊन सर्वांना भेटून यावें असें मला वाटूं लागलें. खरें पाहिले असतां घरीं कोणाला माझी जरूर होती असें नाही व माझी कोणावर ममता होती असेंहि नाहीं. माऊंचें प्रेम माझ्यावर नाहींच ही माझी समजूत कायम होती तरी त्यांच्यासाठींच घरीं जावें असें मला वाटे. अशा विचारांत आणखीहि कांहीं वेळ निघून गेला. घड्याळांत साडेबाराचा एक टोला पडला. घरांत चोहींकडे सामसुम होती. इतक्यांत मोटीबेनच्या खोलींत कोणाचातरी रडण्याचा अस्पष्ट ध्वनि माझ्या कानांवर आला. आपल्याला कांहींतरी भास होत आहे असें प्रथम मला वाटलें. म्हणून मी लक्ष देऊन ऐकूं लागलों, तों पुनः रडण्याचा स्वर ऐकूं आला. हें कोण रडत असावें याची मला कल्पना होईना. त्यानंतर दोन व्यक्तींचा हळूहळू चाललेला संवाद अस्पष्ट ऐकूं येऊं लागला व मध्येंच कोणीतरी स्फुंदून रडत आहे असेंहि वाटूं लागले. हें काय प्रकरण आहे अशी साहजिकच जिज्ञासा मला उत्पन्न झाली. घटकाभरानें सर्व शांत झाले; त्यानंतर कितीतरी वेळ मी जागा होतों, पण मला कांहींच ऐकूं आलें नाहीं.

दुसऱ्या दिवशी सकाळीं नित्याप्रमाणें आम्हीं सर्वजण चहापान करावयास बसलों होतों. शेटसाहेबांच्या येथें इंग्रजी व देशी पद्धतीचा मिलाफ असे, त्याची मंडळी जेवण देशीपद्धतीनें घेत व चहा विलायतपद्धतीनें घेत असत. म्हणून आम्ही सर्व एकाच खोलींत चहा पीत होतों. आज मोटीबेनचा चेहरा म्लान दिसत होता व ती रोजच्याप्रमाणें आपल्या पित्याशीं इकडच्या तिकडच्या गोष्टींविषयीं चर्चा करीत नव्हती. शेटसाहेब मणीबेनशीं व मोहनलालशीं हास्यविनोद करीत होते. शेटाणी माझ्याशीं गप्पा मारीत होत्या. मोटीबेन हातांत एक वर्तमानपत्र घेऊन बसली होती व तिच्यासमोर मगनलाल शांतपणें बसला होता.

"मोटीबेन, कांहीं नवीन खबर आहे कां?" तिच्याकडे पाहून किंचित् हास्य करून मगनलाल म्हणाला.

"कांहीं नाहीं." वर्तमानपत्रावरची दृष्टी न काढतां मोटीबेन म्हणाली. तिचे हात कंप पावत आहेत असें मला वाटलें.

"मगनलाल, मी तुला एक नवीन बातमी सांगतों." मणीबेनकडे पहात हंसत हंसत शेटसाहेब म्हणाले.

"कसली?" आश्चर्यानें मगनलाल म्हणाला.

"ते सुरतेचे मोत्याचे मोठे व्यापारी आहेत ना? ते आपल्या सुंदरलालला मणीची मागणी करताहेत. मोटीबेन, तुला हें स्थळ पसंत पडतें कां?"

"सुंदरलाल चांगला शिकलेला आहे व तो विलायतेस बॅरिस्टर व्हायला जायचा आहे असं मी ऐकलं आहे. जमलं तर स्थळ चांगलं आहे." खालीं पहातच मोटीबेन म्हणाली.

"हो. पण मला आपल्या सर्वांचाच विचार पाहिजे आहे. मगनलाल तुला कसें काय वाटतें?" त्यांच्या खाजगी गोष्टींत आपण बसूं नये म्हणून मी उठून जाऊं लागलों. परंतु शेटसाहेबांनीं मला बसविलें व ते म्हणाले, "तुम्ही येथें बसलांत म्हणून कांहीं हरकत नाही." पुनः त्यांनीं मगनलालला तोच प्रश्न केला. शेटसाहेबांच्या ऑफिसांत मी जरी एक शेवटल्या दर्जाचा कारकून होतों, तरी ते मला घरीं त्यांच्या कुटुंबांतल्या सारखेच वागवीत असत. त्यावर कांहींतरी उत्तर दिलें पाहिजे म्हणून खिडकीबाहेर बागेकडे पहात व कपाळाला आठ्या चढवून मगललाल म्हणालाः—

"आपण जे कराल ते पूर्ण विचारानेंच कराल. मला काय अधिक कळणार आहे?"

" पण तूं सुंदरलालला पुष्कळ वेळां पाहिलेला आहेस व त्याची आणि तुझी चांगली ओळख आहे, तेव्हा तो कशा प्रकारचा आहे हें तुला माहीत असेल." शेटसाहेब म्हणाले.

"हं. चांगला आहे." किंचित् हंसून मगनलाल म्हणाला व तेथेंच पडलेलें एक पुस्तक घेऊन वाचूं लागला. त्यानंतर शेटसाहेबांनीं आपल्या पत्नीलाहि विचारलें, मणीबेनलाहि विचारलें. पित्याला कांहींच उत्तर न देता ती तेथून निघून गेली. त्यानंतर मोटीबेन व शेटसाहेब यांचें कांहीं घरगुती बाबींसंबंधीं संभाषण झालें. घरगुती चर्चेत मोहनलालची आई मुळींच भाग घेत नसे. मोटीबेनचा स्वभाव बराच कडक होता व तिच्यापुढें तिच्या सावत्रआईचें बिलकूल चालत नसे. नोकरलोकसुद्धां जितके मोटीबेनला भीत, तितके शेटाणीला भीत नसत. एखादी गोष्ट मोटीबेन करावयाची म्हणेल त्याला खुद्द शेट साहेबांसहि अडथळा करतां येत नसे. शेटाणी स्वभावानें फार सालस होती, ती मोटीबेनच्या मर्जीनें वागत असे. अलीकडे कांहीं दिवस मोटीबेनचें चित्त स्थिर नव्हतें. कारण प्रथम तिला घरातली देखरेख ठेवतां ठेवतां दिवस पुरत नसे. माडीवरून खालीं व खालून वर दिवसातून तिच्या कितीतरी खेपा होत. जे नोकर कामात कुचराई करीत, त्यांच्या जवळून ती धमकावून कामें करवून घेत असे. दरएक काम वेळच्या वेळीं झालेंच पाहिजे व दरएक वस्तू जागच्या जागीं ठेवलीच पाहिजे असा तिचा कायदा होता. कोणत्याहि कामांत आळस अगर कुचराई तिला खपत नसे. घरातल्या दरएक माणसाविषयीं मोटीबेन काळजी घेत असे, कोणाला काय वस्तु पाहिजे, कोणाच्या आवडीची कोणती वस्तू आहे, हें ती ज्याच्या त्याच्या आवडीप्रमाणें करीत असे. कोणालाच कुरकुरण्याला कारण राहूं देत नसे. त्यामुळें तिचा स्वभाव जरी कडक होता, तरी त्याबद्दल तिचा कोणाला राग येत नसे. कोणी पाहुणा जरी आला तरी त्याच्या खाण्यापिण्यासंबंधीं ती उत्तम व्यवस्था ठेवीत असे. शेटसाहेबांना त्याबद्दल मुळींच पहावें लागत नसे. शेटाणीलाहि कोणत्याच बाबतींत लक्ष घालण्याचें कारण उरत नसे. एखाद वेळेस त्यांना आपल्या परतंत्रतेचा खेद होत असला, तरी त्यापासून त्यांना

त्रास होत नसे. उलट आपल्यावर कोणत्याच प्रकारची जबाबदारी नाहीं म्हणून हलकेंच वाटत असें. स्वतः घटकाभर विश्रांति न घेतां मोटीबेन मोठ्या आजीबाईसारखा घरसंसार चालवित असे. तिच्या दक्षतेची व हुशारीची तारीफ करण्यासारखी होती. मी एक यत्किंचित् मनुष्य, पण माझीसुद्धां ती घरच्या माणसासारखी काळजी घेत असे. तिच्या या सर्व गुणांवर एका गोष्टीनें पाणी फिरविले होतें. वैधव्याच्या प्रखरज्वालेनें बिचारीच्या सर्व आयुष्याची रक्षा केली होती ! ती नेहमीं गंभीर असे. फारसें मोठ्यानें हंसतांना अगर बोलताना मी तिला कधीं पाहिलें नव्हतें. कारणाशिवाय ती कोणाशीं फारसें बोलतच नसे.

" मोटीबेन, आपल्या नेहमीच्या खर्चांत या दोन तीन महिन्यांत वाढ झाली आहे असें वाटतें. " शेट साहेब सिगारेटचें फूत्कार सोडीत म्हणाले. आपला घरखर्च किती होतो, हें शेटसाहेब दर महिन्याचा अखेरीला पहात असत. मगनलालनें आपल्या पुस्तकावरून किंचित वर डोळे करून मोटीबेनकडे स्मितपूर्वक पाहिलें. इतका वेळ हातात धरून ठेवलेलें वर्तमानपत्र तिच्या हातून खाली पडलें. वर्तमामपत्र उचलून मोटीबेन म्हणाली:—

" होय. बाप्पा, अलीकडे खर्च जास्त होतो असं मलाहि वाटतं. कशात जास्त होतो कांहीं कळत नाहीं, मी आतां पुनःएकदा दोन महिन्याचा हिशेब तपासून पहाणार आहे. मला वाटतं माझीच कुठं तरी चुक होत असेल. " बोलताना तिच्या अवाजात कंप सुटला होता. तिची झालेली चलबिचल पाहून शेटसाहेब म्हणाले:—

" अं ! त्यांत पुनः पहाण्याची जरूर नाही. एखाद्या महिन्याला अधिकउणा खर्च होतो, " मगनलालनें पुस्तक बाजूला ठेवून तो आळस देत उठला व मोटीबेनकडे वळून म्हणाला:—

" मोटीबेन, मी मार्किटात जातो, कांहीं आणायचें आहे का मार्किटांतून ? "

" कांहीं नाहीं. " मोटीबेन म्हणाली. त्यानंतर कोणी भेटावयास आले असल्यामुळें शेटसाहेब दिवाणखान्यात गेले व शेटाणी तर केव्हांच ऊठून गेल्या होत्या. मोहनलालहि केव्हाच बाहेर गेला होता. मोटीबेन खुर्चीवर बसून खालीं पहात होती. व मगनलाल तिज्याकडे पहात उभा होता. मीहि नंतर बाहेर मोहनलालकडे गेलो.

मी आल्यापासून मगनलालविषयीं माझा ग्रह उलटा झालेला होता. काय असेल तें असो. त्याच्या डोळ्यांत एकप्रकारचें विलक्षण तेज चमकत होतें ! जेव्हां जेव्हां मी त्याच्याकडे पाहीं व त्याचे ते घारे डोळे चमकताना पाहिले कीं मला कसेंसेंच होत असे. मगनलाल दिसण्यांत चांगला देखणा होता. त्याच्या टापटीपीच्या पोषाकावरून तर तो अधिकच देखणा दिसे. घरांत नेहमी तो स्वच्छ तलम धोतर नेसून तसाच अगदीं परिट घडीचा शर्ट घालून त्यावर काळें जाकीट घालीत असे. पायांत बहुतेक सारा दिवस ' पेटंट लेदरचे पंप शूज असत; त्याच्या पोषाकावरून त्याला स्वच्छतेची फार आवड आहे असें पहाणाराला भासे; शेटसाहेब त्याला अगदीं आपल्या

पुत्राप्रमाणें मानीत असल्यामुळें श्रीमंताच्या तरुण मुलाला शोभेसाच त्याचा थाट असे. आपल्या बारीक मिशांची टोकें घटकोघटकां पिळून वर करण्याची त्याला संवय होती. मिशाला पीळ भरतांना त्याच्या बोटांतील हिरकणीच्या आंगठीचें तेज त्याच्या नेत्राच्या तेजाशीं साम्य पावत असें. शेटसाहेबांच्या मनात त्याला पुष्कळ शिक्षण देण्याचें होतें; परंतु मॅट्रीकच्या तीन फेऱ्या केल्यावर आपणास अधिक अभ्यास होणार नाहीं, असे त्याने शेटसाहेबांस अपरोक्ष रीतीनें कळविल्यामुळें विश्वविद्यालयाच्या पुढच्या पायऱ्या न चढतां त्याने तेथेंच प्रवास पुरा केला. दोन वर्षांपासून शेटसाहेबानीं त्याला बँकेतच नोकरी लावून दिली होती. मी ऑफिसांत गेल्यावर मला कळले होते कीं मगनलाल ऑफिसातहि विशेष कांहीं करीत नाहीं. कामात लक्ष घालण्याविषयी शेटसाहेब वेळोवेळीं त्याला सूचना देत असत. शेटसाहेबापुढें तो फारच नम्रतेनें वागत असे.

---

## स्मृति तेरावी.

# मनाची तळमळ



मोहनलाल व मी एके दिवशीं बाजारांत गेलो होतो. मोहनलालला आज क्रिकेटचा बॉल व बॅट घेण्याची लहर लागली होती. शेठसाहेबाची परवानगी घेऊन तो मला आपल्याबरोबर घेऊन गेला होता. त्याला पाहिजे त्या वस्तु खरेदी करून आम्ही दोघे दुकानातून बाहेर पडलो. समोरून एक उत्तम करड्या रंगाची डॉगकार्ट जात होती व माझें तिकडे सहज लक्ष गेलें, तो ती गाडी हांकीत जात असलेला तो सुंदर मुलगा माझ्या दृष्टीस पडला व त्याच क्षणीं त्याची दृष्टी माझ्याकडे गेली व त्यानें मधुर हास्य केलें. गाडी झपाट्यानें पुढें निघून गेली. मोठ्या ऐटीनें तो स्वतःच गाडी हांकीत असलेला पाहून मला त्याच्या हुशारीबद्दल कौतुक वाटूं लागलें. त्याच्यामागें एकदम धावत जावें व तो कोठें जातो हें पहावें असा विचार माझ्या मनांत आला. मोहनलालनें जर माझा हात धरला नसता तर मी खरोखरीच वेड्यासारखा त्या अनोळखी मुलाच्या गाडीमागें धांवत सुटलो असतो. माझ्या मनावर त्याचा इतका पगडा बसला होता कीं तो कोण आहे व त्याची ओळख व्हावी अशी अनावर जिज्ञासा मला उत्पन्न झाली. खरें पाहिलें असतां मुंबईंत त्यांच्यासारखीं श्रीमंतांचीं सुंदर अशीं मुलें किती तरी असतील पण त्या मुलानेंच मला वेड लाविलें होतें. त्याच्या ओळखीची मला एवढी उत्कंठा कां लागावी, हें माझें मलाच कळेना. इतक्यांत तर तो मुलगा त्याच्या गाडीसह त्या गर्दीत कोणीकडे अदृश्य झाला ! तो ज्या दिशेला गेला त्या

दिशेला वेडगळासारखा मी किती तरी वेळ पहात उभा होतो. जेव्हां मोहनलालनें मला घरीं चलण्याविषयीं सांगितलें तेव्हां मी शुद्धीवर आलो व नंतर आम्ही घरीं आलो.

दोन दिवसापासून माझी प्रकृति अस्वस्थ होती. मी ऑफिसांताहि दोन दिवसांत गेलो नव्हतो. आज अनंतचतुर्दशी असल्यामुळें समुद्रतीरावर गणपति बुडविण्याचा उत्सव पहाण्यास शेटसाहेब मोहनलालला बरोबर घेऊन गेले होते. नोकरचाकरहि घटकाभर रजा घेऊन उत्सव पहाण्याला गेले होते. शेटाणी आपल्या एका नातेवाईकाकडे वांदऱ्यास गेल्या होत्या. सारा दिवस एका जागीं पडून राहिल्यामुळें मला अगदीं कंटाळा आला होता. म्हणून संध्याकाळच्या वेळीं मी बागेंत जाऊन बसलों; अनंतचतुर्दशी होती तरी आज पाऊस मुळींच नव्हता. मी बसलो होतो तेथून बंगल्याचा सर्वभाग दिसत होता. माझ्यापासून अगदीं थोड्याच अंतरावर एका खिडकींत मोटीबेन येऊन उभी राहिली. माडीवर हारमोनियमच्या सुस्वर अवाजांत आपलाहि सुस्वर अवाज मिळवून मणीबेन गात होती.मणीबेनला गायनाचा फार नाद होता तिचा आवाज मधुर होता.मणीबेनच्या सुस्वर कंठामुळें व तिला गायनाची विशेष आवड असल्यामुळें शेटसाहेबांनीं तिला त्या कलेचेंउत्तम ज्ञान प्रवीण शिक्षकापासून देवविलें होतें. आपल्या कन्येचें त्या कलेंत चातुर्य पाहून शेटसाहेबांस तिच्याबद्दल अभिमान वाटत असे. मणीबेन त्यांच्या जातीच्या रिवाजाप्रमाणें अद्याप विवाहित झाली नव्हती परंतु शेट साहेबांनीं तिला इतर सर्व आवश्यक विद्येंत पारंगत केली होती. तिला इंग्रजीचेंहि चांगलें ज्ञान होतें. गायन, वादन, वीणकाम व गृहकृत्यांत ती निपुण होती. ती रूपानें जशी सुरेख होती तशीच ती गुणानेंहि फार चांगली होती. तिच्या सारखी सर्वगुणसंपन्न मुलगी सांपडणें विरळाच. सुरतेच्या बड्या मोत्याच्या व्यापाऱ्याच्या सुशिक्षित सुंदरलाल नावाच्या मुलाशीं तिचा विवाह होण्याचें घाटत होतें. सुंदरलालची प्रथम पत्नी थोड्या दिवसापूर्वीच निवर्तली होती. त्याच्या जातींत मणीबेनला तिच्या योग्य प्रथमवर मिळणें कठीण होतें. कारण त्यांच्या जातींत मुलांचीं लग्नें बरेंच लवकर करवून देण्याची चाल होती. बिजवराशिवाय इतर गुणांनीं सुंदरलाल मणीबेनला योग्य असाच होता. त्यालाच आपली कन्या द्यावयाची असा शेटसाहेबांचा नक्की बेत झालेला होता. शेटसाहेबांचीं मतें बरींच प्रगतीपर असल्यामुळें व त्यांच्या एका लाडक्या कन्येला समाजाच्या घातुक चालीचा परिणाम जन्मभर भोगावा लागत आहे हें जाणून त्यांनीं मणीबेन व मगनलाल यांस अद्याप अविवाहित ठेविलें होतें.

माडविर मणीबेन गाऊन वाजवून आपली करमणूक करून घेत होती व खालच्या खिडकींत मोटीबेन हाताच्या तळव्यावर हनुवटी ठेऊन विचार करीत उभी होती. इतक्यांत मोटीबेनच्या मागें मगनलाल येऊन उभा राहिला. त्याचा चेहरा बराच खिन्न दिसत होता. मी बसलो होतो त्या जागेपुढें एक मोगऱ्याचा मंडप होता त्यामुळें मला त्यांनीं पाहिलें नसावें असें वाटतें, मगनलाल आल्यानंतर मी तेथून ऊठून जाण्याचा

विचार केला,परंतु तेथून जाण्याचा एकच मार्ग अगदीं खिडकींजवळून होता व तेथून ऊठणें म्हणजे सहज त्यांच्या दृष्टीस पडणेंच होतें. त्यांतून मोटीबेन एकटी होती तितक्या अवधींत गेलो असतो तरी हरकत नव्हती. परंतु आतां मगनलालच्या समोरून जाणें मला बरें वाटेना !मी आल्यापासून मगनलालचा माझ्याविषयीं ग्रह चांगला नसावा, कारण तो माझ्याशीं नेहमीं बेपर्वाईनें वागत असे. माझेंहि त्यांच्याविषयीं चांगलें मत नव्हतें. आम्ही दोघानीं एकमेकाविषयीं अकारणच शत्रुत्व पतकरलें होतें.

मगनलाल आला तो कांहीं वेळपर्यंत मोटीबेनला कळलें नाहीं. ती आपल्याच विचारात चूर होती. दोन्ही हात पाठीमार्गे ठेऊन आपल्या लांब काळ्या कोटाचीं बटनें वरपासून खालपर्यंत तशींच उघडीं ठेऊन, कपाळावर अगदीं डोळ्यापर्यंत टोपी घेऊन खालीं पहात मगनलाल घटकाभर निःस्तब्ध उभा होता. आपल्याकडे मोटीबेनचें लक्ष जात नाहीं हें जाणून तो किंचित् वर मान करून म्हणाला.

" मोटीबेन, मी केव्हाचा येथें उभा आहे. " दचकून मार्गे वळून मोटिबेन म्हणालीः—

" काय ? मगनलाल, केव्हां आलास ? "

" मी तर केव्हाचा येथें उभा आहे, पण तुझें लक्ष कोठें आहे माझ्याकडे ? " कपाळाला आठ्या चढवून व नंतर बळेंच हास्य करून तो म्हणाला.

" तूं बाप्पाच्याबरोबर गेलास नाहीं वाटतं ? "

" कोठें ? "

" आज बाप्पा समुद्रावर गेले आहेत ना गणपतीचा उत्सव पाहयला ?

" हं " एक दीर्घ निश्वास सोडून तो म्हणाला " ज्याचें मन ठिकाणावर नाहीं त्याला उत्सव न बित्सव कांहीं गोड का वाटणार आहे ? "

" वा ! तुला कसलं एवढं दुःख येऊन पडलं आहे ? " कांहींशा उपरोधीक स्वरानें हंसून मोटीबेन म्हणाली.

" होय, मोटीबेन. तुला हंसूच येणार मला कांहीं झालें तरी. माझा जरी जीव जात असला तरी तूं हंसशीलच ! " तो जरा रागानेंच म्हणाला. व लागलाच नरम पडून म्हणालाः—

" मोटीबेन, मला कांहीं तरी सांगावयाचें आहे तुला ?" प्रथम ती त्याचें म्हणणें ऐकेना, परंतु अखेर त्यानें तिचें मन वळविलें. नंतर ते दोघे तेथून निघून मी जेथें बसलो होतो, त्याच्या पलीकडल्या बाजूला एका बांकावर बसलें. आतां मला तेथून उठतां येईना. ते प्रथम अगदीं हळुहळु कांहीं तरी बोलत होते, पण नंतर मगनलाल जरा मोठ्यानें म्हणाला,

" खरोखरीच माझी अगदीं जीव जाण्याची पाळी आली आहे. मोटीबेन, जर तूं मला या वेळीं मदत करणार नाहींस तर मला जीव दिल्यावांचून गत्यंतर नाहीं. " दुसऱ्याचें संभाषण आपण आडून ऐकूं नये व येथून उठून जावें असें मला वाटत होतें,

परंतु त्यांच्या समोरून जाण्याचें मला धैर्य होईना. मी मुद्दामच त्यांचें संभाषण ऐकावयास बसलो असा त्यांचा समज व्हावयाचा! नाइलाजास्तव मी तेथेंच बसलों.

जरा घाबरूनच मोटीबेन म्हणाली. " काय? आणखी काय कुलंगडं आणलं आहेस?"

" मोटीबेन, मला क्षमाकर, पण या वेळेस तूं नाहीं म्हणूं नकोस? पहा जर तूं मला नाहीं मदत केलीस तर मी उद्यां काहीं कोणाच्या दृष्टीस जिवंत पडणार नाहीं?" आतुरपणें तो म्हणत होता, " मला फक्त दोनशे रु-"

मोटीबेन आश्चर्यानें मध्येंच एकदम म्हणाली. " काय? दोनशे रुपये? मगनलाल, बाप्पाच्या नकळत तुला मी इतकी रक्कम कशीं देऊं, तूंच विचार कर. यापूर्वी तूं ज्या थोडया थोडया रकमा नेत होतास त्याबद्दल बाप्पांना मी कांहीं तरी सबब सांगत आले. घरांतल्या खर्चांतच मी जास्त रकमा लिहीत गेले,पण ती गोष्ट बाप्पांच्या लक्षांत आली हें तुला माहितच आहे. तें दिवशीं रात्रीं असेंच माझ्या जवळून शंभर रुपये घेऊन गेलास. मी घरांतला खर्च पहाते म्हणून तुला नेहमीं नेहमीं अशा रकमा कशा देऊं? बाप्पांच्या कानावर खरी गोष्ट गेली तर ते काय म्हणतील? छे? मला इतकें पैसें आतां देतां येणार नाहीं."

" बरें आहे! मी मरावें अशींच तुझी इच्छा दिसते. तुम्ही मला नाहीं म्हणून म्हणावें व मी पुनः पुनः तुमच्याजवळ तोंड वेगाडावें त्यांत काहीं अर्थ नाहीं. मीच मूर्ख म्हणून तुमच्या येथें अद्याप राहिलों आहे! तुम्हाला कंटाळा येईपर्यंत मी येथेच रहाणें चागलें नाहीं. वास्तविक पाहता मला समजूं लागताच मी माझी दुसरीकडे सोय करायला पाहिजे होती! ज्या अर्थी मी तुमच्या येथें आहे त्याअर्थी मला तुमच्या मर्जीनें वागायला पाहिजे." उपरोधीकपणें तो म्हणाला.

" मगनलाल, माझे स्वतःचे पैसे असते तर तुला कांहीं न विचारतां मी दिलें असतें; पण बाप्पांना विचारल्याखेरीज अशा रकमा मी तुला कशा देत जाऊं? तूंच साग बरं? तूं विचार केल्याशिवाय बोलतोस त्याला मी काय करूं?" आतां तिचा कंठ दाटून आल्यामुळें तिला पुढें बोलतां येईना.

" मी जगावें अशी जर तुझी इच्छा असली, तर आतां एकच वेळ मी मागतो तेवढी रक्कम मला दे. मग मी पुनः कधींहि मागणार नाहीं. आज रात्रीं जर मला पैसे मिळाले नाहीं तर माझी पत राहणार नाहीं व मला तोंड दाखवायला जागा उरणार नाहीं. माझी अब्रू बचावणें तुझ्या हातीं आहे."

" पण, मगनलाल, तुला आतासे असें पैसे कां लागतात? यापूर्वी तुला कांहीं जरूर पडत नव्हती?" कंप पावणाऱ्या आवाजानें मोटीबेन म्हणाली.

" हें पहा, तुला म्हणून मी खरी हकीकत सांगतो, इतक्यांतच कोणाला ही गोष्ट कळवायची नव्हती." विश्वासदर्शक स्वरानें तो म्हणाला. " मी अलीकडे एका व्यापारांत पडलों आहे. त्यांत आपल्या नशिबाची परिक्षा पाहण्याचा माझा विचार

आहे; परंतु मला त्यांत यश येईल असें चिन्ह दिसत नाहीं. आजचा शेवटचा दिवस आहे. एकाला मी वचन देऊन चुकलो आहे; व्यापारांत वायदा चुकविणें म्हणजे अब्रू गमाविणें हें तुला माहितच आहे. मोटीबेन, यापुढें मी अशा भानगडींत न पडण्याचा निश्चय केला आहे, मग देशीलना तूं तेवढी रक्कम ? नाहीतरि अब्रूसाठीं मला आपला प्राण देणें भाग आहे ! ”

एक अस्पष्ट हुंदका देऊन मोटी बेन म्हणाली, “ पाहीन कांहीं तरी जमलें तर ! पण मगनलाल, या पुढं जर तूं अशाच रकमा मागूं लागलास, तर नाइलाजानं ही गोष्ट मला बाप्पांच्या कानावर घालावी लागेल, मग बाप्पा मला रागावलें तरी हरकत नाहीं. अशी अडकित्त्यांत सुपारीसारखी स्थिति मला फार दिवस सहन होणार नाहीं. आज तीन चार महिन्यापासून मी तुला असे पैसे देते खरी, पण मला त्यापासून किती त्रास होतो हें माझें मन जाणतं. ” व ती रडूं लागली. मोटीबेनवर आपलें किती वर्चस्व आहे व ती आपण मागतो तेवढे पैसे वडिलांच्या नकळत कां देतें, हें मगनलाल पुरतेपणीं जाणून होता. ती आपल्याव डिलांची जरी खोटी धमकी देत असली, तरी ती, ती गोष्ट कोणाला कळविणार नाहीं याची त्याला पूर्ण खात्री होती. तिच्या अविचारी दुर्बळ मनाचा फायदा घेऊन तो तिला आपल्या मनाप्रमाणें करावयाला लावीत होता.

“ हें पहा, तूं अशीं रडूं लागलीस म्हणजे मला किती वाईट वाटतें याची तुला कल्पना होणार नाहीं. मी शपथपूर्वक सांगतों कीं यापुढें कधींहीं तुला असा त्रास देणार नाहीं. एवढी एकच वेळ माझी गरज भागीव. माझी अब्रू रक्षण करणें सर्वस्वी तुझ्यावर अवलंबून आहे.” तिच्याशीं गोड बोलून त्याला आपलें काम साधावयाचें होतें व आपणास फार खेद होत आहे असें तो दर्शवित होता. पूर्वींपेक्षांहि त्यानें आतां आपल्या स्वरांत माधुर्य आणलें होतें. बाकी तो तिला फसवीत आहे अशी माझ्या मनाची खात्री झाली होती. बंगल्यांत आतां चोहींकडे दिवे लागले होते. स्वच्छ चंद्रप्रकाश पडला होता. माझ्याकडे त्यांची दृष्टी गेल्यास त्यांना काय वाटेल अशीं क्षणोक्षणीं मला भीति वाटत होती. ती दोघें केव्हां एकदां येथून उठून जातात व केव्हां माझी या बंदीवासांतून सुटका होते, असें मला होऊन गेलें होतें. अवघडल्यासारखें एका जागेंत केव्हांपासून बसून राहिल्यामुळें मला त्रास होत होता. इतक्यांत बंगल्याच्या फाटका बाहेर मोहनलालचा हास्य ध्वनी ऐकूं आला, त्याबरोबर मगनलाल व मोटीबेन तेथून उठून बंगल्यांत गेले व माझी त्या बंदीवासांतून एकदांची सुटका झाली.

दररोज सायंकाळीं चौपाटीवर हिंडावयाला मी व मोहनलाल जात असूं. माझ्या मुंबईतल्या पहिल्या दिवसाचा अनुभव मी कधीं विसरणार नाहीं. ज्या जागीं मला जबरदस्तीनें चोर म्हणून पकडून नेले ती जागा मला पक्की स्मरते ! माझ्यावर तो अनपेक्षित प्रसंग येऊन मला एक रात्र भयंकर मानसिक यातना झाल्या तो प्रसंग मी कधींच विसरणार नाहीं! असाच एकदां मी चौपाटीवर फिरत होतो, मोहनलाल वाळूंत खेळत होता, माझ्यासमोर थोड्या अंतरावर माझ्याच वयाचे दोन तरुण मुलगे फिरत होते.

त्यांच्या त्या उंच दिवालाच्या टोप्याखालून बाहेर येणारें केंस दिसत होतें, त्यावरून ते कोणत्या तरी नाटक मंडळींतले स्त्री नट असावे असा मी तर्क केला. त्यानंतर त्यांची व माझी ओळखहि झाली. कारण नाटक मंडळींची ओळख करून घ्यावयाची मला फार इच्छा असे. एखाद्या नाणावलेल्या नटाबद्दल प्रशंसोद्गार ऐकले म्हणजे आपण तसें कां होऊं नये असें मला वाटे. कोणा तरी नटांची ओळख करून आपण नाटकासंबंधीं सर्व माहिती मिळवावी असें मला लहानपणापासून वाटे. मी घरीं असतां गंगुमामा नाटकांचें व नटींचें फार रसभरीत वर्णन करीत. तेव्हां अशा मंडळींची व आपली ओळख असावी अशी माझी लहानपणापासून इच्छा होती. तेव्हां आलेला संधि फुकट घालवूं नये असें वाटून त्या मुलांची मीच होऊन ओळख करून घेतली व रोज आम्ही चौपाटीवर भेटूं लागलों. हळू हळू आमची दाट मैत्री झाली. ते आपल्या नाटक मंडळींचें व त्यांतल्या नटांचें माझ्याजवळ असें कांहीं वर्णन करीत कीं मला त्यांच्याविषयीं फार आदर वाटून त्यांना पहाण्याची इच्छा झाली. त्यापैकीं एकानें मला असें सांगितलें कीं ' तुम्ही जर आमच्या मंडळींत याल तर खात्रीनें कांहीं दिवसांनीं उत्तम नट व्हाल. तुम्हाला स्त्रीवेष फारच खुलून दिसेल. आमच्या मॅनेजरला सांगून आम्ही तुम्हाला आमच्या मंडळींत दाखल करवूं. आमच्या मंडळींत देखण्या मुलाची जरूर आहे व तुम्ही तसे आहांत.' इत्यादि. माझी त्यानें इतकी स्तुति केली कीं खरोखरीच मी फार देखणा आहे असा मला अभिमान वाटूं लागला. व मंडळींत जाण्याविषयीं मला फार उत्सुकता उत्पन्न झाली. शेटसाहेबांच्या बँकेंत ' एकडा एक ' जन्मभर करीत बसण्यापेक्षां कोठें तरी आपलें नांव प्रसिद्धीस आणावें अशी मला महत्वाकांक्षा झाली. आपण फार मोठे होऊं व प्रसिद्ध पुरुषांत आपली गणना होईल अशी जी मला लहानपणापासून जबर महत्वाकांक्षा होती, ती मध्यंतरीं लुप्तप्राय झाली होती. ती माझ्या या नवीन मित्रांच्या उत्तेजनानें पुनः माझ्या हृदयांत जागृत झाली. आपण असें करूं आणि तसें करूं. अशाविषयीं मोठें मनोहर कल्पनाचित्र रेखाटून हवेंत उंच उंच भराऱ्या मारण्यांत मला फार आनंद वाटे. आपल्या मित्रांच्या सांगण्याप्रमाणें जर आपण त्यांच्या मंडळींत गेलों, तर खात्रीनें प्रख्यात नट म्हणून आपली लवकर प्रसिद्धी होईल. इतर धंद्यांत आपण प्रसिद्धीला आलों नाहीं, तरी नटाच्या धंद्यांत कां होईना, आपलें चातुर्य जगाच्या दृष्टीसमोर येऊन आपण प्रसिद्ध व्यक्ति व्हावें असें मला वाटूं लागलें. परंतु ज्या शेटसाहेबांनीं आपत्कालीं आपणांस हातांशीं धरून आज जिवंत ठेविलें, त्यांच्या घरून कांहीं कारण नसतां निघून जाणें मला प्रशस्त वाटेना. दरमहा मला पंधरा रुपये पगार मिळत असे. नोकरीस राहिल्यापासून आतां सात महिने झाले होते. मला माझ्या पोटापाण्याची काळजी नसल्यामुळें माझा पगार तसाच शिल्लक होता. त्यापैकीं कांहीं पैसे मी कपड्यालत्त्यांत खर्च केले होते व मजजवळ पाऊणशें रुपये रोख होते; त्यावर मी ' शेखमहंमदाच्या मनोराज्यासारखें मनोराज्य करीत होतों. माझ्या मनाची अशी चलबिचल स्थिति झाली होती. त्यानंतर एके दिवशीं माझ्या मित्रांनीं मला त्यांच्या मंडळींच्या उत्तम

म्हणलेल्या नाटकाला येण्याचा आग्रह केला. मी अद्यापपर्यंत दाक्षिणी नाटक मुळींच पाहिलें नव्हतें. शेटसाहेबांच्याबरोबर एकदां गुजराथी नाटक पहावयाला गेलो होतो. शेटसाहेबांना नाटकाचा फारसा शोक नसल्यामुळें त्यांच्या घरची मंडळी नाटकाला फार क्वचित् जात असत. माझ्या मित्रांचें म्हणणें मला कबूल करतां येईना. निदान त्यावेळी तरी त्यांचें म्हणणें कबूल केलें नाहीं. त्यानंतर काहीं दिवसांनीं एकदां शेटसाहेब स्वतः आमच्याबरोबर चौपाटीवर आले असतां माझे नाटकी मित्र मला भेटले व शेटसाहेब कोणते हें मी त्यांना दुरून दाखविलें. त्यांच्यापैकीं जो धीट होता त्यानें शेटसाहेबाजवळ येऊन मला एक दिवस नाटक पहाण्याची परवानगी मागितली. माझी जाण्याची मर्जी आहे असें पाहून त्यांनीं मला जाण्याची परवानगी दिली, पण ती एका अटीवर ! त्यानंतर मी पुनः शेटसाहेबानीं सांगितल्याशिवाय जाऊं नये. ती गोष्ट आम्ही कबूल केली.

ठरल्याप्रमाणें मी नाटक पहावयास गेलो. मी पुष्कळच लवकर गेलो होतो. माझ्या मित्रानीं मंडळीच्या मालकाची व माझी ओळख करून दिली, त्यांनीं त्या थोड्या अवधींत माझ्याशीं फार प्रेमळपणा दाखविला. त्यामुळें नाटक-मंडळी सर्वच चांगल्या स्वभावाची असावी असे मला वाटूं लागलें. नाटकाचा बरेवाईटपणा मला मुळींच कळत नसल्यामुळे मला तरी तें नाटक फार आवडलें. नटांचें ते उत्तमोत्तम पोषाख आणि हावभाव पाहून मी अगदीं चकीत होऊन गेलो. मुख्य स्त्रीनटाला प्रेक्षकांकडून मिळणारे ‘वन्समोअर वर वन्समोअर’ टाळ्याचा कडकडाट, काळ्यांची आपटाआपट व शिट्याच्या आरोळ्यांनीं सारें नाटकगृह वरपासून खालपर्यंत हादरून जात होतें. नाटक संपल्यावर मी माझ्या मित्रांचा निरोप घेऊन घरीं जाण्यास निघालों. रस्त्यांत नाटक पाहून घरीं जाणाऱ्या लोकांच्या झुंडींतून कोणी मुख्य पात्रांची स्तुति करीत तर कोणी देखाव्याची स्तुति करीत असलेले आढळलें. मुख्य स्त्रीनटाविषयीं प्रशंसोद्गार ऐकूं येत होते. ‘ किती बहारीचें काम ! अगदीं कमाल करून सोडली बुवा ! त्याच्यामुळेंच नाटक पहावेसें वाटतें. आवाज किती गोड आहे ॲक्टिंग तर विचारूंच नका !.’ असे व अशाचसारखे शब्द ज्याच्या त्याच्या तोंडून निघत होते. आपण जर नाटक मंडळींत शिरलों तर आपलीहि अशीच प्रशंसा होईल. व सर्व आपणांस धन्यवाद देतील ! मी मला घटकाभर मुख्य स्त्रीपात्र लेखून लोकांकडून होणाऱ्या प्रशंसेचा आनंद अनुभवूं लागलों !

घरीं आल्यावर माझ्या अपरात्रीं येण्यानें झोंपमोड होऊन ज्या नोकरांस दरवाजा उघडावा लागला त्याबद्दल तो माझ्यावर बडबडून आपलें समाधान करून घेत होता; परंतु माझें लक्ष त्याच्या बडबडण्याकडे कोठें होतें ? मी माझ्या सुखदायक विचारांत दंग होतो. निजण्यापूर्वी मी माझा चेहरा एकदां आरशांत पाहिला व त्या नटापेक्षां माझा चेहरा अधिक देखणा जाणून माझें हृदय आनंदानें व गर्वानें फुलून गेलें. मुख्य नटाला आपला चेहरा सुंदर दिसण्याला किती तरी काळजी व हुशारी

वापरावी लागत होती. मला तसें कांहीं करण्याची मुळींच जरूर नव्हती. मला नटाचें काम उत्कृष्ट करतां येईल अशी मला आतां खात्री वाटूं लागली. नाटक मंडळींत शिरण्याचा मला अतोनात मोह उत्पन्न झाला. त्या रात्रीं उजाडेपर्यंत माझा डोळा लागला नाहीं. आपण मंडळींत गेल्यानंतर लवकरच चांगलें काम करूं लागूं म्हणजे मंडळींत सर्वजण आपली बडेजाव करतील व आपणांला अगदीं स्वतंत्रपणानें वागावयाला मिळेल. शेटसाहेबांच्या येथें मी होतों, परंतु तेथें माझ्या मनाला एक प्रकारची संकोच वृत्ति वाटत होती. याच्या घरांत आपण अगदीं अगांतुक आहोंत, आपला व यांचा वास्तविक बिलकूल संबंध नाहीं, सर्व मंडळी आपल्याशीं चांगल्या रीतीनें वागतात हा त्यांच्या मनाचा थोरपणा होय, असें मला वारंवार वाटत असे.

---

## स्मृति चौदावी.

# नोट हरवली !

मागें मी सांगितल्याप्रमाणें नाटकमंडळींत जाण्याची मला अनिवार इच्छा झाली, परंतु माझ्या मनाची व्हावी तितकी तयारी अद्यापि झाली नव्हती. अशा डळमळीत मनःस्थितींत आणखीहि कांहीं दिवस गेले. पूर्वीप्रमाणें माझें लक्ष आतां त्या घरांत रमेना. एका स्थळीं आपण राहिलों व आपल्या मनानें एकदा दुसरीकडे जाण्याची उचल केली म्हणजे त्या पहिल्या स्थळीं आपणांस चैन पडेनासें होतें.

एके दिवशीं शेटसाहेबांनीं मला त्यांच्या लिहिण्याच्या खाजगी खोलींत बोलाविलें. त्यांनीं मला एक इंग्रजी पत्र लिहावयास दिलें व तेथेंच बसावयास सांगितलें. त्यावरून तेथेंच बसून मी पत्र लिहीत होतों. शेटसाहेबांच्या घरीं आल्यापासून त्यांच्या येथें येणारीं इंग्रजी, गुजराथी वृत्तपत्रें, मासिकें वगैरे वाचण्याचा मी परिपाठ ठेवला होता. माझें इंग्रजी ज्ञान जरी बेताचें होतें, तरी इंग्रजी लिहिण्या-वाचण्याची मला चांगली संवय होती. मी लिहीत असताच कांहीं कामासाठीं शेटसाहेब बाहेर गेले. अर्ध्या तासांनीं ते परत आले तरी मी लिहीत होतोच. त्यांनीं सांगितल्याप्रमाणें मी सर्व मजकूर लिहून त्यांना दाखविला. तें पत्र त्यांना एका युरोपियन फर्मला पाठवावयाचें होतें व मला इंग्रजी किती येतें याचीहि परीक्षा घ्यावयाची होती. माझें इंग्रजी अक्षर व बिनचूक पत्र पाहून ते खूष झाले. त्यानंतर मी ऑफिसांत जावयास निघालों. तेव्हां ‘ शेटसाहेब तुम्हाला बोलावीत आहेत ’ असें एका नोकरानें सांगितल्यावरून मी त्यांच्या खोलींत गेलों. मी आंत जातांच शेटसाहेबांनीं मला विचारिलें.

“ चिंतामणी ! मी सकाळीं येथून बाहेर गेलों व तुम्ही येथेंच लिहीत होतात, तेव्हां मी गेल्यावर तुम्ही येथून बाहेर गेला होतात काय ? ”

" नाहीं." शेटसाहेब असें कां विचारतात म्हणून मी विचारांत पडलों.

" मग! तुम्ही येथें असतां कोणी आंत आले होतें कां?"

" नाहीं." शेटसाहेबांच्या या प्रश्नाचें मला आश्चर्य वाटूं लागलें. त्यांनाहि जरा आश्चर्य वाटल्यासारखें दिसलें.

" असें कसें व्हावें? येथें मी एक शंभराची नोट ठेविली होती ती काय झाली बरें?" इतके शब्द आपल्याशींच उच्चारून लागलेच माझ्याकडे वळून म्हणाले. " मी ती नोट कोठें ठेविली हे कांहीं मला आठवत नाहीं. ती नोट आता मी पाह्यला गेलों तर कोठेंच सांपडत नाहीं! सकाळीं तुम्ही येथेंच होतात, तेव्हां म्हटलें तुम्हाला माहीत असलें तर विचारून पहावें."

मी अगदीं स्तंभित होऊन गेलो! ती नोट मी मुळींच पाहिली नव्हती. शेटसाहेबांनीं ती केव्हा ठेविली व त्याच्याजवळ केव्हां होती हें मला मुळींच माहीत नव्हतें. नोट अशी गेली कशी याचें मला आश्चर्य वाटूं लागलें. नोट मीच घेतली असावी असा तर शेटसाहेबाना संशय आला नसेल ना? मीच सकाळीं या खोलींत होतों व ती नोट येथूनच गेली, तेव्हां माझ्यावरच संशय येण्याचा अधिक संभव होता. माझ्याशिवाय येथें दुसरें कोणीच आलें नव्हतें. तितक्यांतल्यातितक्यात अशा प्रकारचे शेंकडो विचार माझ्या अंतःकरणात उद्भवले! मी निस्तब्धपणे समोरच्या खिडकींतून बाहेर बागेकडे पाहूं लागलों. नोट नाहीशी झाली हें ऐकताच माझें मन अगदीं गोंधळून गेलें. शेटसाहेबानीं विचारिलें त्या प्रश्नाला काहीं तरी उत्तर दिलें पाहिजे हें जाणून मी म्हणालों.

" नोट मी मुळींच पाहिली नाहीं व आपण कोठें ठेविली हेंहि मला माहित नाहीं."

" मोठें आश्चर्य आहे बुवा? अशी कशी नोट जावी? मला पक्कें आठवतें कीं ती नोट मी सकाळी येथेंच कोठें तरी ठेविली." क्षणभरानें शेटसाहेब म्हणाले. " बरें आहे, तुम्ही आतां ऑफिसांत जा. संध्याकाळीं पुनः एकदा तपास करून पाहूं." मी तेथून खिन्नातःकरणानें बाहेर पडलो. नाहींशीं झालेली नोट मीच घेतली असावी असा शेटसाहेबांना संशय आला आहे, अशी माझी खात्री होऊं लागली. त्यांनीं तसें जरी स्पष्ट बोलून दाखविलें नाहीं, तरी त्यांच्या त्या वेळच्या बोलण्याच्या रोखावरून मला तसें वाटूं लागलें. मी बँकेत गेलो खरा, पण आज माझे चित्त स्थिर नव्हतें. ऑफिसांत बसल्या बसल्याच होल्डर नांवाला हातांत धरून त्या हरवलेल्या नोटीचा मी विचार करीत होतो. मी ज्या खोलींत बसलो होतो, तेथूनच नोट कां हरवावी? शेटसाहेबांचा माझ्याविषयीं प्रतिकूल ग्रह झालेला आहे हें जाणून मला फार वाईट वाटलें. माझ्या विलक्षण नशीबाचा काय चमत्कार आहे पहा! जेथें तेथें असाच कांहीं तरी विलक्षण बनाव बनून येत होता. खरोखरीं मी प्रामाणिकपणानें वागत असतां, दैवाच्या प्राति

कूलतेमुळें माझ्या प्राणाणिकपणाचें पर्यवसान नेहमीं अशा भलत्याच बाजूला होऊन ज्याच्या त्याच्या दृष्टीला मी अप्रामाणिक ठरत असे.

शेटसाहेबांच्या घरीं आल्यावर जर ती नोट सांपडली असें कळेल तर किती चांगलें होईल, अशी आशा माझ्या मनाला वाटत होती. न जाणो शेटसाहेबांनींच कोठें दुसऱ्या जागीं ती नोट ठेविली असेल,: व त्यांना त्या गोष्टीची आठवण नसेल. त्यांना आतां आठवण होऊन तसें ते आपणांस सांगतील असेंहि वाटे. घरीं जाईपर्यंत माझ्या मनाला रुखरुख लागून राहिली होती. पांच वाजतां मी घरीं गेलों. शेटसाहेब अद्याप घरीं आले नव्हते. नोटीसंबंधानें घरांतल्या इतर मंडळीला त्या वेळपर्यंत कांहीं माहीत नसावें असें मला वाटलें. मोहनलाल नित्याप्रमाणें मला समुद्रावर फिरावयास चलण्याचा आग्रह करूं लागला. कांहीं जरूरीचें काम आहे म्हणून आज मला येतां येणार नाहीं अशी कांहीं तरी सबब सांगून दुसऱ्या कोणास तरी आजचे दिवस घेऊन जाण्यास सांगितलें, परंतु तो ऐकेना, तेव्हां निदान शेटसाहेब आल्याखेरीज तरी मला येतां येणार नाहीं असें मी त्याला सांगितलें. मी येणार नाहीं अशी खात्री झाली तेव्हांच तो आपल्या आईला विचारून एका गड्याला बरोबर घेऊन गेला. शेटसाहेब आले म्हणजे काय तें नक्की कळेल म्हणून आज मी त्यांच्या येण्याची आतुरतेनें वाट पहात होतो. रोजच्यापेक्षां किती तरी उशीर झाला तरी शेटसाहेब येण्याचें चिन्ह दिसेना! माडीवरील गॅलरींत शेटसाहेबांच्या वाटेकडे डोळे लावून मी उभा होतो. एक विक्टोरिया फाटकाच्या बाहेर येऊन उभी राहिली. शेटसाहेब आले असावे असें वाटलें. परंतु शेटसाहेब उतरण्याऐवजीं मगनलालची स्वारी उतरतांना पाहून माझी निराशा झाली. कोणत्याहि गोष्टीचा, मग ती बरी असो अगर वाईट असो एकदां सोक्ष-मोक्ष झाला म्हणजे मनावरचें तेवढें दडपण उतरल्यासारखें वाटतें. द्विधा स्थितींत मन उद्विग्न होऊन कांहीं सुचेनासें होते. शेटसाहेब येऊन केव्हां एकदां आपल्या दैवाचा खरेखोटेपणा आपल्या निदर्शनास येतो असे मला होऊन गेलें होतें. जों जों त्यांना वेळ होऊं लागला, तों तों माझें मन अधिकच चंचल होऊं लागलें.

मगनलाल फाटकाच्या आंत आला; आज त्याचा पोषाख अगदीं ऐटबाज होता. तो नखशिखात युरोपियन पोषाखान्त होता. कोटाच्या डाव्या बाजूला एक सुंदर ताज्या गुलाब पुष्पाचा गुच्छ दिसत होता. फाटकाच्या आंत शिरतांच त्यानें युरोपियन पद्धतिप्रमाणें डोक्याची हॅट काढून हातात घेतली, त्याचा आधींच मोहक चेहरा आतां अधिकच मोहक दिसत होता. त्याच्या बारीक ओठावर मधुर स्मित दिसत होतें, तो आज खुषींत असावा असें वाटत होतें. मी उभा होतो त्या गॅलरी खालींच एका गुलाबाच्या ताटव्याजवळ मणीबेन गुलाबाचीं फुलें तोडीत होतीं. प्रथम मी तिला पाहिलें नव्हतेंच. परंतु मगनलालनें बागेंत प्रवेश करतांच त्याची दृष्टी साहाजिकच तिच्यावर गेली व त्याच्या पूर्वींच्याच झळकणाऱ्या स्मितांत अधिकच भर पडली. व तो झपझप पावलें टाकून तिच्याजवळ येऊं लागला. इकडे कोणाकडे पाहून तो हंसत

आहे हें न जाणून मी खालीं वांकून पाहिलें, तेव्हां तेथें असलेली मणीबेन माझ्या दृष्टीस पडली. तिच्यापासून थोड्या अंतरावर तो उभा होता व आपल्या मुखावर पूर्वीप्रमाणेंच मंद स्मित आणून व आवाजांत आणवेल तितकें माधुर्य आणून म्हणाला,

" मणी, चल, जरा आपण त्या पलीकडच्या लतामंडपांत बसूं. येतेस कां ? कांहीं तरी मी तुला सांगणार आहे. " त्याचें आजचें एकंदर वर्तन मला जरा चमत्कारिक भासलें. तो मणीबेनला ' मणी ' या एकेरी नांवानें आजपर्यंत कधीं हांक मारतांना मी ऐकले नव्हतें. मणीबेनला त्याच्या बोलण्याचा रोख न कळून ती म्हणाली.

" मगनभाई, काय सांगायचं ते इथंच सांगना. "

" बाप्पा आले कां ? " तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून तो म्हणाला.

" नाहीं अद्याप. " एक फुल खालीं पडलें तें उचलतां उचलता ती म्हणाली.

" मोटीबेन आली कां ? "

" आज येणार नाही. हें तुला माहितच आहे, " आश्चर्यानें भुंवया वर चढवून ती म्हणाली. मोटीबेन कालपासून ' शीव'ला तिच्या मामाकडे मामाचा मुलगा अजारी असल्यामुळें त्याला पहावयास गेली व त्याची प्रकृति जास्त असल्यामुळें रात्रीं ती तेथेंच राहिली. त्याला जरा आराम पडल्यावर येणार होती. हें मगनलाललाहि माहित होते.

" हो, खरंच ! मला वाटलें ती आली असेल." आपल्या पाटलूनच्या खिशांत उजवा हात ठेऊन, व टोपी असलेला डावा हात मागे ठेऊन, मान एका बाजूला झुलती करून व डोळे अर्धवट उघडे ठेऊन, सहास्यमुद्रेनें तो पुनः म्हणाला, " जरा तूं येतेस कां इकडे ! "

" पण, तुला काय सांगायचं आहे ? इथं नाहीं कां सांगतां येणार ? आज मला घरात किती तरी कामं आहेत. मोटीबेन नाही तेव्हा तिची सर्व कामं मलाच करायला हवीं. ती आली म्हणजे बरी आपली कशाची काळजी नसते. "

" हें पहा, फार वेळ कांहीं लागणार नाहीं. पांच मिनिटांचेंच काम आहे ? " तो तिच्याजवळ येत म्हणाला. "मला जें सांगायचं आहे तें इथें सागण्यासारखें नाहीं " आता तो तिच्या अगदीं जवळ आला होता. त्याच्यापासून जरा मागें सरून मणीबेन म्हणाली:—

" हं. चल पाहूं, तुझं एवढं मोठं कसलं काम आहे अन् तुला एवढं काय गुप्त सागायचं आहे तें ? " कांहीं दिवसांपूर्वी जेथें मी अडकून राहिलो होतो व जेथें मगनलाल व मोटीबेन बोलत बसले होते, त्या स्थळीं तो तिला घेऊन गेला. मणीबेनला अशी गाठून बागेच्या एका बाजूला घेऊन जाण्यांत मगनलालचा कांहीं तरी अंतस्थ हेतु असावा, असा मला संशय आला. परंतु ते आतां बऱ्याच दूर गेल्यामुळें त्यांचा संवाद ऐकूं येणें शक्य नव्हतें. त्यांचें पुढचे संभाषण ऐकावयास मिळावें असें मला वाटूं

लागले. दुसऱ्याच्या एकांतांतल्या गोष्टी ऐकणें हें जरी पातक असले, तरी मगनलाला-विषयी माझा ग्रह प्रतिकूल झालेला असल्यामुळें तो मणीबेनसारख्या निष्पाप कुमारि-केवर कांहींतरी प्रसंग आणील असें माझें मन मला सांगू लागले. वास्तविक पहातां मला तसें वाटण्याचें मुळीच कारण नव्हतें. मगनलाल चारपांच वर्षांचा असता शेटसा-हेबांनी त्याचा पुत्रवत् प्रतिपाल केला होता व तो त्यांच्या येथें आज वीसबावीस वर्षे असून त्यांच्या घराच्या कुटुंबांतलाच एक बनला होता. तसेंच तो त्यांच्या ज्ञातीचा व त्यांच्या एकादूरदूरच्या बहिणीचा मुलगा होता. त्याविषयीं तसें कांहीं मला वाटण्याची जरूर नव्हती. उलट मी त्यांच्या ज्ञातीचा नाहीं, अगदीं अपरिचीत असा असून, त्यांच्या कुटुंबात येऊन मला अवघे सात आठ महिनेच झाले होते. माझ्यासारख्या एका नवख्या इसमाला मगनलालासारख्या शेटसाहेबांच्या एका स्वकीयाविषयीं अविश्वास वाटण्याचा मुळींच अधिकार नव्हता. मी अद्याप माझ्या जागेवरच होतो; शेटसाहेबांना आज घरीं येण्याची स्मृति नसावी किंवा ते आपला नेह-मींचा रस्ता चुकले असावे असे मला अधीरपणामुळें वाटूं लागले.

इतक्यांत मणीबेनने मोठ्यानें उच्चारलेलें शब्द माझ्या कानीं आले, त्यामुळें मी माझ्या विचारतंद्रींतून जागृत होऊंन त्या बाजूला पाहूं लागलो. आतां दिवस अगदीं मावळून गेला होता, मणीबेन जरा घाईघाईनें पुढे आली, परंतु मगनलालाहि तिच्या मागें होताच. ती तेथेंच उभी राहिली. संधिप्रकाशात तिचा चेहरा चांगला स्पष्ट दिसत नव्हता. परंतु तिचें सर्वांग थरथर कांपत असावें असे वाटलें. तिच्या अवा-जांत कंप सुटला होता.

"मगनलाल ! तुझा एकहि शब्द ऐकण्याची माझी इच्छा नाहीं. एवढ्याचसाठीं तूं मला इकडे घेऊन आलास कां ?" मगनलाल काहीं तरी बोलला पण मला ऐकूं आलें नाहीं. त्यावर क्रोधकंपितस्वरानें मणीबेन म्हणाली,

"नाहीं ! नाहीं ! कधींहि नाहीं. तूं जर एक शब्द अधिक बोलशील तर मी हें सारं बाप्पाला सागून देईन. बाप्पाच्या कानावर काहीं जाऊं नये अशी जर तुझी इच्छा असेल, तर तूं मला यापुढें बिलकुल त्रास देतां कामा नये. नाहींतर मी त्याना सारं सांगून देईन पहा ?" इतकें बोलून ती तेथून पुढें येऊं लागली, पण आतां त्यानें तिचा हात धरण्याचा प्रयत्न केला असावा, कारण ती एकदम ओरडून म्हणाली.

"पहा हं ? तूं पुढं आलास तर—" तिचा कंठ भरून आल्यामुळे तिच्या तोंडां-तले शब्द तोंडांत राहून ती तेथून धांवतच बंगल्यांत आली. मगनलाल मूढासारखा तेथेंच बराच वेळ उभा होता. मणीबेनला मगनलालाचा काहीं तरी नीच हेतु कळून ती त्याच्यावर एवढी संतापली असावी. त्याच्या त्या नीच हेतूची मला अस्पष्ट कल्पना करतां आली. सुंदरलाल मोतीवाल्याशीं मणीबेनच्या लग्नाचे जुळत होतें, तें मगनलालला कांहीं ठीक वाटत नव्हतें. जेव्हां जेव्हां सुंदरलालची गोष्ट निघे, तेव्हां तेव्हां सुंदरला-

लची अपरोक्षरीतीनें तो निंदा करीत असे. परंतु आपल्या बऱ्या वाईट अभिप्रायावर विश्वास ठेवून शेटसाहेब एखादी गोष्ट करतील असे त्याला वाटत नसावें, म्हणून शेट-साहेब जेव्हा हजर नसत, तेव्हां सुंदरलालविषयीं मुख्यत्वेकरून मणीबेनला संशय उपन्न होईल असें कांहीं तरी बोलत असे. शेटसाहेबाना ती गोष्ट कळली नसावी, कारण जेव्हा तेव्हां ते सुंदरलालविषयीं प्रशंसाच करीत. त्यावेळीं मगनलाल तेथें असला तर त्याच्या कपाळाला तिरस्कारानें आठ्या चढत असत. असो. मणीबेन जी बागेतून धावत आली ती आपल्या खोलीत जाऊन तिनें आतून कडी लावून घेतली. ती त्या रात्रीं बाहेर आलीच नाहीं. आपले फार डोकें दुखतें अशा बहाण्याने ती जेवावयास देखील आली नाहीं. मगनलाल मात्र खिन्न दिसत होता।

रात्रीं आठ साडेआठ वाजता शेटसाहेब घरीं आले. आज त्याच्या मंडळींची सभा होती असें मला नंतर कळलें. आता नोटीसंबंधाने खुलासा होईल असें मला वाटलें; जेवणें वगैरे होईपर्यंत शेटसाहेब त्या संबंधीं कांहीं बोलले नाहींत. आता शेटसाहेब बोलतील, क्षणभराने बोलतील, असें मला एकसारखें वाटत होतें. जों जों त्याच्याकडून दिरंगाई होऊं लागली, तों तों माझ्या अंतःकरणात कालवाकालव होऊं लागली, बरें. स्वतः त्यासंबंधाने विचारावें तर धीर होईना. मोहनलाल तर केव्हाच निजावयास गेला होता, व नंतर थोड्या वेळानें शेटाणीहि गेल्या, मगनलालहि केव्हाच गेला. शेटसाहेब सिगारेट पेटवून ईजिचेअरवर वाचीत पडले होते, मी एका खिडकींत उभा राहून बाहेर खिन्नपणे पहात होतो. किती तरी वेळ मी तेथेंच उभा होतों, जेव्हा शेटसाहेब त्या नोटीसंबंधी कांहींच बोलेना, तेव्हा मनाची तळमळ असह्य होऊन शेवटीं हलकेंच शेटसाहेबाना भीत भीत विचारलें.

" सकाळीं हरवलेली नोट सापडली का ? "

वर्तमानपत्रावरून किंचित वर मान करून ते म्हणाले. " नाहीं. आणि ती पुन: सापडेल असें वाटत नाहीं. " त्यानंतर कांहीं एक न बोलता शेटसाहेब पुनः वाचनात गढून गेले. त्याचे त्यावेळचे ते शब्द माझें अंतःकरण भेदून गेले ! मीच नोट घेतली असावी, असें शेटसाहेबांस वाटत असावें; एकवेळ मी त्याच्या लाडक्या मोहन-लालचें अरिष्ट टाळलें त्यामुळें ते जरी माझ्यावर नोट चोरल्याचा स्पष्ट आक्षेप करीत नसले, तरी ती नोट माझ्याशिवाय दुसरीकडे गेली नाहीं असेंच त्यांना वाटत असावें. मी नंतर तेथून माझ्या निजावयाच्या खोलींत गेलों; पण आज मनाच्या अशा स्थितीत निद्रा कशी येणार ? मी किती अभागी पहा ! मला कोठेंच सुख पडूं न देण्याचा माझ्या दुर्दैवाचा निश्चय होता की काय ? घरून निघाल्यापासून कोठेंशीं सुखाची आशा वाटूं लागली, तो पुनः माझें मंद भाग्य माझ्या आड येऊन उभें राहिलें ! शेटसाहेबाच्या मनात माझ्याविषयीं असा संशय उत्पन्न झाला असतां, यापुढें त्याच्या येथे रहाणें किती गैरशिस्त आहे, असें मला वाटूं लागलें. बराच वेळ मी असा विचार करीत होतो. मी ज्यावेळीं शेटसाहेबाच्या खोलींत लिहीत बसलो

होतो. त्यावेळी दाराकडे माझी पाठ होती, ती संधी साधून कोणी तरी खोलींत प्रवेश करून तेथे पडलेली नोट लांबविली नाही ना? नोकर-चाकराच्यानें तसे करण्याचे धाडस होणार नाही; परंतु कदाचित मगनलालची दृष्टी त्या नोटीवर जाऊन त्यानें तर हे कृत्य केलें नसेल ना? माझ्यावर चोरीचा आळ आला तरी त्यांत त्याचें कांहीं जाणार नव्हतें. त्याच्या गरजा अतांशा बऱ्याच वाढल्या होत्या व तो मोटीबेनजवळून शेटसाहेबांच्या नकळत बरेंच पैसे उकळवीत असल्यामुळे मला त्याचाच संशय अधिक येऊं लागला. मनुष्य एकदां संशयाच्या भोंवऱ्यात सापडला म्हणजे कोठें कसा वहात जाईल याचा नेम नाहीं. आपल्यावर एखादा खोटा आरोप आला असता तो टाळण्याकरितां आपण ज्याचा बिलकूल संबंध नाहीं अशाविषयींहि भलभलते संशय घेऊन आपल्या मनाचें समाधान करून घेतो. त्यांत एखाद्या माणसाविषयीं आपला चांगला ग्रह नसला म्हणजे त्याच माणसाचा आपल्याला प्रथम संशय येतो. खरे पहाता मगनलालला मी खोलींत आलेला पाहिला नव्हता आणि नोट घेतांनाहि पाहिला नव्हता. पण मला त्याचाच संशय येऊन तो अधिकाधिक दृढ होऊं लागला. अशा रकमा जर वारंवार जाऊं लागल्या तर इतरांपेक्षा मलाच त्याचा परिणाम भोगावा लागणार! असे वाटून माझ्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला. यापुढे येथे रहाणे म्हणजे जाणून बुजून आपणावर संकट ओढून घेणें असें मला वाटूं लागलें. शेटसाहेबांच्या घराचा कायमचा निरोप घेऊन तेथून दुसऱ्या कोठें तरी जाण्याचा मी निश्चय केला. आपण येथून निघतांच आपले नाटकमंडळींतले मित्र आपणास आश्रय देतील, नाटकमंडळींत गेल्यावर आपला भाग्योदय तेथेंच कशावरून होणार नाहीं? यापूर्वीच नाटकमंडळींत शिरण्याचा माझा विचार होता, परंतु असा आपल्यावर चोरीचा वहीम येऊन आपल्याला या घराचा त्याग करावा लागेल, असे माझ्या स्वप्नांतहि आले नव्हतें. युक्तियुक्तीनें शेटसाहेबांची परवानगी घेऊन मग नाटकात दाखल होऊं असे मला वाटत होते. अगदीं पहांट होईपर्यंत माझा डोळा लागला नाहीं. फटफटीत उजाडल्यावर मी माझ्या आंथरूणावरून उठलो व माझ्या मनात तेथून जाण्याचा निश्चय मी कायम केला.

रोजच्यासारखा मोहनलाल माझ्याजवळ येऊन त्याच्या लीलांनीं मला हंसविण्याचा प्रयत्न करीत होता; पण आज माझे लक्ष कशांतच नव्हतें. माझा चेहरा उदास पाहून त्यालाहि जरा वाईट वाटले. 'तुम्हाला तुमच्या घरच्या मंडळींची आठवण झाली काय? तुमच्या घरीं कोण कोण आहे? तुमच्या घरची मंडळी येथे का येत नाहीं' असे अनेक प्रश्न विचारून तो उलट माझ्या खिन्नांतःकरणाची खिन्नता अधिक वाढवित होता. त्याला मी कांहीतरी उत्तरें देत होतो. मोहनलालला सोडून जाण्याचे माझ्या अगदीं जिवावर आलें होतें. तो माझ्यावर वडील बंधूप्रमाणे प्रेम करीत होता. व माझेहि त्याच्यावर तसेंच बंधुवत् प्रेम जडले होते. बॅंकेंत जाण्यापूर्वी मी शेटसाहेबांना पुढीलप्रमाणें एक पत्र लिहून त्यांच्या टेबलावर ठेऊन बॅंकेंत जाण्याकरितां निघालो तो त्यांच्या घरून कायमचा निघण्याचा विचार करूनच निघालो होतो.

“ शि. सा. न. वि. वि. आज मी आपल्या घराचा कायमचा निरोप घेऊन जात आहे. आपल्या कुटुंबांतून अशा रीतीनें जाण्याबद्दल मला फार वाईट वाटत आहे. आपल्या कुटुंबांतल्या सर्व मंडळीनें मला अगदीं कुटुंबांतील माणसासारखें वागवून माझ्यावर जे अगणित उपकार केले आहेत ते मी कधींहि विसरणें शक्य नाहीं. मी कां जात आहे याचें कारण ताडण्याला आपणास वेळ लागणार नाहीं. आपल्या घरांतून जर अशाच यापुढेहि रकमा जाऊं लागल्या तर माझ्यासारख्या अपरिचितावर संशय येण्याचा अधिक संभव आहे, तेवढ्याचसाठीं मी जात आहे. माझ्या हातून असें नीच कर्म कधींहि होणार नाहीं. आणि तेहि आपल्यासारख्या उपकारकर्त्यासंबंधीं तर शक्यच नाहीं ! आपण माझ्यावर जे उपकार केले आहेत, ते माझ्या हातून फिटणें शक्य नाहीं, व आपले आभार कोणत्या शब्दानें मानावें हें मला कळत नाहीं. मी आपल्या येथें असेपर्यंत जर माझ्याहातून काहीं चूक झाली असेल तर आपण मला क्षमा कराल अशी मी आशा करतों. मोहनलालला सोडून जाणें म्हणजे माझ्या लहान बंधूला सोडून जाण्याइतकें मला वाईट वाटतें.

आपला कृपाभिलाषी,
**चिंतामणी.**

पत्र लिहून झाल्यानंतर किती वेळ तरी मी ते वाचून पाहिलें. शेटसाहेबांना यावेळीं देऊं नये, तसेच निघून जावें असा पुष्कळ विचार करून धडकणाऱ्या हृदयानें व थरथरणाऱ्या हातानें एकदांचें ते पत्र टेबलावर ठेऊन मी बाहेर पडलों. बरोबर एक वर्षापूर्वीं मी असाच माझ्या घराचा त्याग करून निघालों होतों. जेथें जेथें मी जाणार तेथून तेथून मला अशाच स्थितींतून बाहेर पडावें लागेल काय ?

---

## स्मृति पंधरावी.

# माझा नाटकमंडळींत प्रवेश.



शेटसाहेबांकडून निघालों तो मी थेट माझ्या नाटकमंडळींतल्या मित्रांचा शोध करीत मंडळीच्या बिऱ्हाडीं गेलों. सुदैवानें माझे ते दोघे मित्र मला बिऱ्हाडीं भेटले. माझी हकीकत ऐकून घेऊन मंडळींत मला दाखल करण्याबद्दल मालकास सांगण्याचें त्यांनीं कबूल केलें. मी तेथेंच बसलों असतां त्यांच्यापैकीं जे गृहस्थ मुख्य पुरुषपात्राचें काम करीत ते तेथें आले. माझ्या मित्रांनीं माझी सर्व हकी-कत त्या गृहस्थाला सांगितली. त्याचें नांव गोपाळराव होतें. गोपाळरावांनीं मला मंडळींत ठेवून घेण्याचें अभिवचन दिलें. आतां मालक काय म्हणतात यावर अवलंबून होतें. परंतु गोपाळरावांनीं सांगितल्याप्रमाणें खरोखरींच मालकांनीं मला बिनहरकत मंडळींत ठेवून घेतलें. त्यादिवसापासून गोपाळरावविषयीं मला फार आदर वाटूं लागला

गोपाळराव माझ्याशीं फार ममतेनें वागत असत. तालमीच्या वेळीं ते माझी चूक मला नीट समजावून सांगत. हळुहळु माझी गोपाळरावांवर विलक्षण भक्ति बसली. ते सांगतील तें मला खरें वाटूं लागलें. शेटसांहेबांच्या घरून निघतांना मी माझें पैसे घेण्यास विसरलो नव्हतो. ते पैसे मी माझ्या कोटाच्या आंतल्या खिशांत ठेवीत असे. गोपाळरावजवळ आपण आपली ठेव ठेवावयास द्यावी, असे अनेकवार माझ्या मनांत आलें असेल. परंतु मी अद्याप त्यांनाहि कांहीं बोललो नव्हतो. तो कोट मी केव्हाहि विसंबत नसे. एकदा मी व गोपाळराव असें दोघेच बिऱ्हाडीं बसलो होतो, गोपाळराव मला इकडच्या तिकडच्या गोष्टी सागत होते. मुंबईतल्या सोनेरी टोळीविषयीं व त्यांच्या विलक्षण धाडसी कृत्याविषयीं ते सागत होते. कित्येक चोर किती भयंकर असतात व ते किती चातुर्यानें चोऱ्या करून मी मी म्हणविणाऱ्या लोकांच्या डोळ्यात कशी सहज धूळ टाकतात याचे ते यथार्थ वर्णन करून व आपणावर दोन तीन प्रसंग तसें आले, पण आपण त्यांतून अचानक आपली सुटका कशी करून त्याच्या हातावर कशा तुरी दिल्या वगैरे सागत होते. त्यांच्या त्या विलक्षण चातुर्याचे मला मोठें आश्चर्य वाटलें ! मला त्यांच्याविषयीं पूर्वीपासून आदर वाटत होताच, तो त्यांच्या यावेळच्या संभाषणानें अधिकच वाढला. सोनेरी टोळीच्या गोष्टी ऐकून मला माझ्या खजीन्याबद्दल धास्ती वाटूं लागली. आपला जंगी खजीना सारा वेळ आपल्याजवळ बाळगणें धोक्याचें वाटूं लागले. गोपाळरावजवळ आपली रक्कम अनामत ठेवावी असें वाटून मी चटकन माझ्या खिशातून ते पैसे काढून गोपाळरावला म्हणालो,

"गोपाळराव, आतां तुम्ही सोनेरी टोळीविषयीं गोष्टी सांगितल्या म्हणून मला भीति वाटते कीं माझ्यावरहि तसा प्रसंग एखादवेळेस यायचा, तर माझे इतके पैसें तुमच्या जवळ ठेवता का ?"

त्यावर गोपाळराव हंसत हंसत म्हणाले. "वा ! सोनेरी टोळीला तुम्ही इतके भ्याल असे मला वाटले नाहीं, नाहीं तर मी त्या गोष्टीच काढल्या नसत्या."

"तशी मला एवढी भीति कांहीं वाटत नाहीं; पण हें मला कोठें तरी ठेवायचें आहेतच, नेहमीं जवळ बाळगून काय करायचें ? समजा एखादे वेळेस माझ्या खिशांतून पडले तर कोणाला विचारणार ? तुमच्याजवळ ठेवाल तर बरे होईल, सुरक्षित तरी रहातील."

"तुम्ही म्हणतांच तर मी ठेवीन पाहिजे तर. तुमचे म्हणणें कांहीं खोटें नाहीं म्हणा; केव्हा काय प्रसंग येईल आणि काय नाहीं कोणी सांगावें ? माझ्याजवळ असले तर तुम्हांला हक्कानें मागतां तरी येतील. कोणी नेले अथवा कोठें पडले, हरवले तर काय कराल ?" माझ्या जवळून पैसे घेऊन आपल्या खिशात ठेवतां ठेवतां पुढें म्हणतात "तुम्हांला जेव्हां जरूर लागेल, तेव्हां माझ्याजवळून मागून घ्या

बरें कां ?" ते पैसे गोपाळराव जवळ दिल्यावर मलाहि आतां तो कोट एकसारखा उराशीं बाळगावयास नको असें वाटून बरें वाटलें.

नाटकमंडळींत शिरण्यापूर्वी आपण तें काम लवकर शिकून तयार होऊं अशी मला फार उमेद होती, परंतु आतां अनुभावांतीं तेंहि काम वाटतें तेवढें सोपें नाहीं अशी माझी खात्री होऊं लागली. नटवर्गालाहि आपलें काम किती काळजीपूर्वक करावें लागतें, प्रेक्षकांवर आपली छाप बसवावी लागते, जी भूमिका घेतली असेल त्यांत आपलें सर्व चातुर्य खर्चून त्या भूमिकेशीं तदाकार बनून जावे लागते, याची आतां मला काल्पना होऊं लागली. मला उत्तम नट होतां येणार नाहीं असें मला वाटूं लागलें, तरी माझ्याकडून होईल तितकी हुशारी खर्चून मीं माझें काम शिकण्याचा प्रयत्न करीत होतों. थोड्याच दिवसांत तुम्ही चांगलें काम करूं लागाल, असें गोपाळराव मला वारंवार उत्तेजन देत असत. आमची मंडळी दिवाळीनंतर बाहेरगांवीं जाणार होती. मी मंडळींत आल्यापासून फार क्वचित् बाहेर पडत असे, कारण मला कोठें रस्त्यात पाहिल्यास मोहनलाल त्याच्या घरीं परत घेऊन गेल्याखेरीज कधीं रहाणार नाहीं, ही माझी खात्री होती, तेव्हां शक्य तो त्याच्या दृष्टीस पडूं नये असा मी विचार केला होता. मोहनलालची मला क्षणोक्षणीं आठवण येत असे; त्याचें माझ्यावर किती प्रेम होतें, हीं आठवण झाली कीं, माझें हृदय भरून येत असें.

बाहेरगावीं जाण्यापूर्वी मला एकदां रंगभूमीवर जाण्याचा प्रसंग आला. मला चांगलेंसें गातां येत नव्हते. व माझा आवाजहि तितका गोड नव्हता, ज्यावेळीं मी प्रथम रंगभूमीवर आलो, त्यावेळीं माझी जी स्थिति झाली तो प्रसंग मी कधीं विसरणार नाहीं. मी नवीनच असल्यामुळे व मला नाटकासंबंधीं विशेष माहिती नसल्यामुळें माझ्याकडे फार जोखमीचे काम नव्हतेच. मला दासीच्या वेशाने रंगभूमीवर प्रथम प्रवेश करावा लागला. पाहिल्यानेंच मी तो स्त्रीवेष घेतल्यानें मला कसेंसेंच वाटूं लागलें; व तो अगदीं त्रासदायक वाटूं लागला. रंगभूमीवर माझ्या कामाची अगदीं जरूर असतांहि मला तेथें जाण्यास वेळ होऊं लागला. आमच्यापैकीं एकानें मला जेव्हां अगदीं पडद्याजवळ ओढून आणलें व 'जा, नाहीं तर लोटून देतो.' म्हणून जेव्हा धमकी दिली, तेव्हां नाइलाजास्तव मी पडद्याबाहेर आलो. नायिका आपल्या प्रियकरास चोरून भेटावयास जावयास निघाली व तिला त्या कामांत आपल्या विश्वासु दासीची जरूर होती. दासीला येण्याला उशीर झाल्यामुळें नायिकेचा जीव खालीवर होत होता. आपल्या प्रियकराकडे जातांना नायिकेचा ऊर धडधड उडत होता, सर्वांगाला दरदरून घाम सुटला होता, दासी दृष्टीस पडतांच नायिका विचारूं लागली कीं, 'माझी ही अशी स्थिति कशाने झाली ?' 'बाईसाहेब, मलाहि तसेंच झाले आहे.' मी चटकन् बोलून गेलो ! माझ्या कंप पावणाऱ्या आवाजांतून निघालेले ते शब्द प्रेक्षकांना कसें ऐकूं गेलें कोण जाणे ? कारण त्यामुळें प्रेक्षकांत एकच हंशा पिकून माझ्या धडकणाऱ्या हृदयांत अधिकच धडकी भरली. माझी अगदीं तिरपीट त्रेधा उडून गेली. येथून केव्हां

एकदां आपली सुटका होते, असे मला होऊन गेलें! गुदमरून आपला प्राण जातो कीं काय असें वाटूं लागले! माझ्या त्या वेळच्या बेअकलीपणामुळें मालकांची माझ्यावर खप्पा मर्जी झाली. त्यांच्याकडून बोलून घ्यावें लागलें. पुनः अशी चूक करणार नाहीं, पहिल्यानेंच मी इतक्या प्रेक्षकासमोर आल्याकारणानें घाबरून गेलो, आता चांगली काळजी घेईन, असे मी अगदीं दीन मुद्रेनें जेव्हां गोपाळरावाला सांगितले, तेव्हां त्यानी मालकाजवळ माझ्याबद्दल रदबदली केली. नाहीं तर मला मंडळींतून त्याच वेळीं अर्धचंद्र मिळाला असता.

आम्ही दिपवाळी झाल्यानंतर बेळगांवला गेलो. दोनतीन महिने आम्ही बाहेरगांवी फिरून परत मुंबईत आलो. शेटसाहेब व त्याची मंडळी आता मला बहुतकरून विसरून गेले असतील, मोहनलालहि केव्हांच विसरला असेल असें मला वाटलें. मला मात्र मोहनलालची आठवण होत असे.

माझ्या पाच सहा महिन्याच्या अनुभवावरून मला आता रंगभूमीवर पहिल्याप्रमाणे गोंधळून गेल्यासारखें वाटेनासें झालें. मी उत्तरोत्तर अधिक चांगलें काम करूं लागेन असे मला गोपाळराव नेहमीं बोलून दाखवीत व मलाहि आत्मविश्वास वाटूं लागला. माझा गळा तितका गोड नव्हता हें मी सांगितलेंच आहे, तरी हळूं हळूं गायनकेंलतहि प्राविण्य मिळवून पुरुषनटाची कामे करूं लागेन असेंहि कांहीं मंडळी बोलून दाखवीत. आपण नामांकित नट व्हावें अशी माझी फार दिवसाची महत्वाकांक्षा होती, ती कांहीं कालाने तरी खचित पूर्ण होईल, असें मला अंतर्यामीं वाटूं लागलें. माझ्या बरोबरीच्या मंडळींत मी फारसा मिसळत नसे. त्यामुळें तें मला द्रुष्टाचार्य, भीष्माचार्य वगैरे बोलून माझी फार थट्टा करीत, मी त्यांच्याकडे दुर्लक्ष करीत असे, तरी कित्येक वेळा त्याची थट्टा मला असह्य होत असे.

अशा रीतीने आणखीहि कांहीं दिवस गेले. अलीकडे आमच्या मालकाचें व मुख्य स्त्रीपात्राचे काम करणारे शामराव, ज्याच्यामुळे नाटकाला प्रेक्षकाची फार गर्दी होत असे, त्याचे वारंवार खटके होऊं लागले होते. मालक त्यांची हाजी हाजी करीत व आम्हांला तुमची जरूर नाहीं आम्ही वाटेल तिथें जाऊन आमचें पोट भरूं असें म्हणून शामराव त्यांचा वाटेल तसा उपमर्द करीत असत. वास्तविक पाहतां मालकांनींच मूळ शामरावला गरीब स्थितींतून हाताशीं धरून हल्लींच्या दर्जापर्यंत आणलें होते. ज्यावेळीं त्यांना खाण्यापिण्याची भ्रांत होती, त्यावेळीं मालकांच्याच प्रोत्साहनानें व मदतीनें नटाच्या धंद्याची माहिती घेऊन ते रंगभूमिवर विराजमान झाले होते. पुढें त्याच्याच जिवावर मालकांनीं नाटक मंडळी स्थापन केली. आपल्यावर पूर्वीं ज्यानें उपकार केलें, त्याचें विस्मरण होऊन आतां त्यांच्या मंडळींतून निघून दुसऱ्या मंडळींत जाण्याचा त्यांचा विचार होता.

अखेरीस एके दिवशीं मालकाचे व शामरावचें शेवटचें कडाक्याचें भांडण

होऊन ते रागारागानें आमच्या मंडळींतून निघून गेले! झाले! त्यांच्याच जिवावर आमची मंडळी नांवारुपास आली होती! यापुढें मंडळींचा खर्च भागविणें आपल्या अटोक्याबाहेर आहे हें जाणून आमच्या मालकांनीं सर्व मंडळीस रजा देऊन आपण दुसऱ्या गांवीं निघून गेले! पुनः आम्हाला पूर्वस्थिति प्राप्त झाली!

नोट घेतल्याबद्दल शेटसाहेबांनीं माझ्यावर प्रत्यक्ष आरोप केला नसतां मी अविचारानें त्यांच्या घरांतून निघाल्याबद्दल आता मला पुष्कळ खेद होऊं लागला. पुनः त्यांच्या घरीं जाणें मला बरे वाटेना. पुढे काय करावें हेंहि सुचेना! आता माझा सारा भरंवसा गोपाळरावंवर होता. मंडळींची फाटाफूट होताच मला गोपाळराव आपल्या घरी घेऊन गेले, 'मी माझी जेथें सोय करीन तेथें तुमचीहि करीन' असें त्यांनीं मला आश्वासन दिलें होते. त्याच्या येथे मी कांहीं दिवस होतो. रोज संध्याकाळीं घरीं आल्यावर 'अद्याप कोठेच पत्ता लागत नाहीं' असे गोपाळरावाचे निराशेचें उद्गार ऐकावयास मिळत, गोपाळरावाच्या घरात—नव्हे बिऱ्हाडीं त्यांचें कुटुंब व चार मुलें एवढी मंडळी होती,गोपाळरावाची नाटकमंडळींतली नोकरी सुटताच त्याच्या घरच्या मंडळींची बरीच त्रेधा उडत असलेली मला दिसली. मंडळीवर आपले ओझे पडूं नये, आपण कोठेंतरी आपली सोय लावावी असा मी विचार केला. त्याप्रमाणे गोपाळरावाला तसे मी विचारलें. प्रथमतः ते मला रहाण्याबद्दल आग्रह करीत होते, पण मीं अगदीं जाण्याचा निश्चय केला आहे, हे जाणून त्यानीं मला जाण्याला अनुमति दिली. परंतु माझे पैसे मी त्यांच्याजवळ दिले होते, व पुढेहि मंडळींतून मला मिळणाऱ्या पगारापैकी जो कांहीं शिल्लक रहात असे तो त्याचेजवळ देत असे; मंडळींत असता मला पैशाची फारशी जरूर वाटत नव्हती. माझ्या पैशासंबंधीं ते कांहींच बोलेनात, पैशाशिवाय मी दुसरीकडे काय करणार? ते बोलत नाहीं हें पाहून मीच त्याना त्याबद्दल विचारले असता, 'सध्या माझ्याजवळ तुमचे सर्व पैसे द्यावयाला सवड नाही. माझी घरची स्थिति तुम्ही पहाताच अहात? मी तुमचे सर्व पैसे हळूहळू देईन, एवढ्याचसाठीं आमचे येथे कांहीं दिवस रहा म्हणून मी तुम्हाला आग्रह करीत आहे. मी तुमची दुसरीकडे व्यवस्था करतो. मला नोकरी मिळाली कीं, मी तुमचे पैसे तुम्हाला परत देईन.''

माझे पैसे चोरीस जाऊं नये म्हणून मी ते गोपाळरावाजवळ ठेवावयास देत असे. परंतु आतां तें मला परत मिळतलि याची आशा फार थोडी होती. कितीवेळ तरी मी स्तब्ध बसून राहीलों. गोपाळरावाला काय म्हणावे हेंच मला सुचेना! आपण कांहीं केले तरी त्याच्या हल्लींच्या स्थितींत माझे पैसे मला परत मिळणे अगदीं अशक्य होतें! काही तरी दुसरी सोय होईपर्यंत येथेच रहाणे भाग होते. दुसऱ्या कोठें जावे तर नोकरी मिळेपर्यंत पैशाशिवाय खाणार काय? माझी जर चांगली स्थिती असती, तर गोपाळरावाच्या कुटुंबाला माझ्या पैशाचा उपयोग झाला त्याबद्दल मला तितके वाईट वाटलें नसतें. दुसऱ्या कोठेच जाण्याला मार्ग नसल्यामुळें नाइलाजास्तव कोठे तरी सोय लागे-

पर्यंत गोपाळरावाच्या येथेंच रहाण्याचें मी ठरविलें व तसें त्यांना सांगितलें. ती गोष्ट त्यांनीं कबूल केली. सकाळीं उठल्याबरोबर तें दुपारची जेवण्याची वेळ होईपर्यंत मी कोठें तरी सोय लागते कां म्हणून तपास करावयास भटकत असे. जेवणानंतरहि जो मी बाहेर पडे तो रात्रीं आठ नऊ वाजतां घरीं येत असे. अशा रितीनें दोन तीन दिवस भटकून आलो तरी मला कोठेंच यश आलें नाहीं. अशाचप्रमाणें एके दिवशीं मी दुपारीं बाहेर पडलो तो रात्रीं नऊ वाजतां बिऱ्हाडीं आलो तो गोपाळरावाच्या दाराला कुलूप ! आणि त्यामुळें त्या रात्रीं माझ्या पोटालाहि कुलूपच !

---

## स्मृति सोळावी.

# शांन्तीगृहाचे मालक.

ती रात्र मी गोपाळरावाच्या त्या बंद दारापुढें गॅलरींत निजून काढली. तशा परिस्थितींत झोंप येण्याची तर आशाच नव्हती. उद्यां काय करावें व कोठें जावें ? हा एकच प्रश्न माझ्या शरीरांतलें सर्व रक्त शोषून घेत होता. घरून अविचारानें निघाल्यापासून तें हल्लींपर्यंत माझ्या हातून एकसारख्या चुकाच होत गेल्या असें मला वाटूं लागलें. परंतु पुनः घरीं परत जाण्याचा विचार माझ्या मनांत कधींच आला नाहीं. ही रात्र अशीच न उजाडतां राहिली तर उजाडल्याबरोबर आपणास पोटाच्या पाठीमागें धांवावें लागणार नाहीं व सर्व जगाच्या बरोबर आपला आणि आपल्या दुःखाचा अंत होईल, असे मला वाटूं लागलें. दिवस उगवूं नये असे जरी मला कितीहि वाटत असलें, तरी आपल्या ठराविक वेळेला तो उगवलाच. जो तो आपल्या कामांत गढून गेला होता; मला मात्र कांहींच काम नव्हतें. येथें बसून माझ्या पोटांतला वणवा शांत होणार नाहीं; त्याची कोठें तरी तजवीज केलीच पाहिजे असा विचार करून मी खिन्नांतःकरणानें तेथून बाहेर पडलो. पोटांत सपाटून भूक लागलेली. खिशांत एकहि दिडकी नाहीं, गांवांत कोणी नात्याचे ओळखिचें ज्याच्या येथें गेले असतां एक वेळची तरी भूक भागेल असें कोणी नाहीं; सकाळपासून संध्याकाळपर्यंत भटकत होतो ! पुनः माझ्या चक्रीभ्रमणाला सुरवात झाली. साऱ्या मुंबईंत नव्हे साऱ्या दुनियेंत जरी मी एकसारखा भटक भटक भटकलों तरी ‘ बाबा, तूं असा कां भटकतोस ? ’ असें मला कोणी तरी विचारलें असतें काय ? दोन प्रहरची वेळ टळून गेल्यावर, वरून सूर्यनारायणाचा ताप असह्य होऊं लागला व पोटांत भयंकर क्षुधाग्नी भडकला म्हणजे मनुष्य किती लीन होतो याचा मला पक्का अनुभव आला आहे.

संध्याकाळ झाली होती; माझ्या पोटांत क्षुधेने अगदीं विलक्षण काहूर माजविलें होतें, चालून चालून हातपाय दमून अगदीं निर्जीव झाले होते, घशाला कोरड पडली होती व त्याचा वचपा डोळ्यातून निघणाऱ्या अश्रुधारांनीं बाहेर पडत होता. विचार करतां करतां माझे मस्तक भ्रमिष्ट होण्याच्या बेतांत आले होतें; इतक्यांत मला एक विचार सुचला ! मी ज्या दिवशीं पहिल्यानें मुंबईस आलों व असाच त्या दिवशीं भुकेनें व्याकूल झालों असता एका क्षुधाशांतीगृहांत गेलो होतो, तेव्हां त्या मालकाने माझ्या जवळून दुप्पट पैसे घेतले होते, तर आतां त्या मालकाकडे जावे व मला त्या पैशात तो आता कांहीं खावयास देतो का पहावे ? हा विचार मनात येताच मला पूर्वीपेक्षा दुप्पट जोर येऊन हुशारी वाटू लागली. व मी त्या दिशेनें पायाची मर्जी नसता त्याना बळेच ओढूं लागलो. मानवप्राण्याची एकदा चोहोंकडून अगदीं निराशा झाली असता यत्किंचित् आशातंतू जरी दिसला तरी पुढची इमारत बाधावयाला त्याला तेवढा धागा पुरे होतो !

मी झरझर चालून एकदांचा त्या शांतीगृहाजवळ येऊन पोचलो, पण आत जाण्याचें एकदम धाडस होईना. आत मालक कोणाशीं मोठमोठ्यानें बोलत होते. दोन व्यक्तींचा मोठ्याने संवाद चालला होता. दुसरा इसम बाहेर पडल्यावर आपण आंत जावे असें वाटून मी बाहेरच उभा होतो. अरेरे ! माझी केवढी शोचनीय स्थिति ! एका तुकड्याची आशा करून मी किती लांबून आलों होतों ! निराश्रित दहा माणसांचें पोट भरण्याचें ज्या माझ्या पित्यास सामर्थ्य, त्याचा मी मुलगा रस्त्यात अन्नाच्या आशेनें भणंगभिकाऱ्यासारखा भटकत होतो !

क्षणभराने शांतीगृहातून किडकिडीत, शरिराच्या वजनापेक्षा डोक्याचेंच वजन जास्त आहे, असा एक मुलगा ' माझें मी कुठंहि पोट भरीन तुमची एवढी भिजास कशाला पाहिजे. ' असें कांहींसें तोडानें बडबडत बाहेर पडला. आंत कोणी नसेल असें जाणून मी हळूंच आत प्रवेश केला. मालक एकटेच बसले होते, मला आत आलेला पहाताच मालक जरा चमत्कारिक दृष्टीनें माझ्याकडे रोखून पहात म्हणाले,

" काय हो ? तुम्ही कोण ? काय पाहिजे तुम्हाला ? "

मी जरा भीतभीतच म्हणालो " गेला हा कोण ? "

" कां ? तो माझा नोकर आहे. " मालक म्हणाले.

" त्याने आपल्या इथली नोकरी सोडली आहे कां ? तो जाताना तसें कांहीं बोलत होता म्हणून म्हणतो. " माझा पहिला विचार बदलून नोकरी मिळेल अशी आशा उत्पन्न होऊन मी म्हणालो.

" हो, तो उर्मट पोऱ्या आतांच नोकरी सोडून चालता झाला. आणि मला तरी कुठें त्याची एवढी जरूर आहे ? आतां मी दुसरा ठेवीन, पण तुम्हाला काहो एवढी चौकशी ? "

" आपण मला जर आपल्या येथें नोकरीस ठेवीत असाल तर मी तयार आहे."

" काय ? तुम्ही ? " मालकाच्या तोंडून आश्चर्योद्गार निघाले व ते माझ्याकडे क्षणभर पहातच राहिले !

" होय. आपण जर कृपा करून मला ठेवाल तर आपण सांगाल तें काम मी करीन" मी अगदीं नम्रपणानें म्हणालो, प्रथम मी कांहीं तरी थट्टाच करीत असावा असें त्या मालकाला वाटलें. अखेर मला नोकरीस ठेवण्याला मी खरोखरच विनवणी करूं लागलो, तेव्हां त्यांना माझें बोलणें खरें वाटूं लागलें. मला गरज आहे हें जाणून त्या कावेबाज मालकानें आपणास नोकराची मुळींच जरूर नाहीं असा आविर्भाव आणला. ते म्हणाले,

" पहा बुवा, पगार बिगार फार कांहीं मिळणार नाहीं."

" आपण जें द्याल तें मला कबूल आहे. "

" पण जें म्हणजे किती ! मला जास्त पगार देण्याची ऐपत नाहीं म्हणून तर तो हरामखोर गेला ! काय मजा आहे पहा ! मी त्याला माझ्या पोरासारखा वागवला. पण त्याची त्याला कांहीं किंमत आहे कां ? " आपले रुप्यासारखे रुपयाच्या आकाराचे नेत्रद्वय गरगर फिरवून मालक म्हणाले.

" आपण मला मुळींच पगार नाहीं दिला तरी चालेल. फक्त मला पोटापुरेंसें अन्न देत जा म्हणजे झालें ! आपण मला कसेंहि करून ठेवाच. "

" पण तुझ्यानें येथलें सर्व काम होईल ना ? " येथें आमच्या बहुमानाचा लोप झाला ! मालक आपल्या लंब ओष्ठावर स्मित आणून म्हणाले. " आडला नारायण गाढवाचे पाय धरी " ही म्हण कांहीं खोटी नाहीं, मला कसें तरी करून माझें पोट भरावयाचें होतें. हल्लीं मालकाला जरूर आहे, हें जाणून मी फारसे आढेवेढे घेण्याच्या भानगडींत पडलों नाहीं. पोटावारी तर पोटावारी, सध्यां तर रहावें, मग पहातां येईल दुसरी कांहीं तरी युक्ति ! असा विचार करून मी म्हणालों,

" आपण माझें काम पहा ! जें सांगाल तें मी करीन."

" बरें आहे, उद्यांपासून येत जा. "

" मला राहाण्याला कोठेंच जागा नाहीं. दोन दिवसांपासून मी उपाशीं आहे, मला आपण आजपासूनच ठेवून घ्यावें. मला आपण कांहीं तरी खायला द्या नंतर जें काम असेल तें मी करीन. " माझ्यापासून दुप्पट घेतलेल्या पैशाची ओळख न देतां मी म्हणालो. मला पाहिल्याबरोबर मालकांनीं मला ओळखलें असून ते मुद्दामच तसें दर्शवित नाहीं, असें मला वाटत होतें. मालक कांहीं न बोलतां मला आंतल्या खोलींत घेऊन गेले व मला कांहीं शिळेपाकें खावयास दिलें.मला सपाटून भूक लागली असल्यामुळें, मालकांनीं मला जें क्षुधा शमाविण्यार्थ दिलें होतें ते अगदीं अपुरें होतें. एखाद्या दुष्काळांतून आणलेल्या माणसाप्रमाणें मी एका सपाट्यांत सारें चट् करून बसलो. मालक माझ्याकडे आश्चर्ययुक्त चेहऱ्यानें पहात होते. माझा असाच कायमचा आहार असल्यास पगाराच्या दुप्पट आपल्याला चट्टा बसणार अशी त्यांना धास्ती पडली असावी. असो. त्या दिवसापासून आमची स्वारी क्षुधाशांतीगृहाच्या

मालकाच्या येथे दुय्यम कारभारी, वाढपे, मदतनीस वगैरे वगैरे कामें करूं लागली. जरा क्षुधेची शांती होतांच मालकाच्या एकंदर स्वरूपाचें निरीक्षण करण्याला मी सुरवात केली. मालक दारासमोर एका खुर्चीवर विराजमान होऊन कोणी गिऱ्हाईक येतें का याची आतुरपणें वाट पहात बसले होते. त्यांचा वर्ण कोळशालाही लाजविणारा होता. आपल्या सर्वांगाचा वर्ण, सर्वांच्या चटकन लक्षांत यावा म्हणूनच कीं काय, आपल्या अंगावर एका कळकटशा पंचाशिवाय त्यांनीं दुसरें वस्त्र ठेविलें नव्हतें. त्यांच्या उंचीचें व रुंदीचें प्रमाण जवळ जवळ सारखेंच होतें. पोटाचा घाट अगस्त्य ऋषीच्या बापासारखा होता ? त्यांच्या तोंडाच्या मानानें डोळें फारच मोठे होते; ते विशालाक्ष होते. त्यांनीं सहज जरी भुंवया चढविल्या तरी डोळे डोक्याबाहेर पडतात कीं काय अशी भीति वाटत होती. त्यांच्या नासिकेचें वर्णन कसें करावें हें ठरविणें मोठें कठीण काम होतें. त्याला कांहींशी डेरल्या वांग्याची उपमा शोभेल संक्रांतीसारखें दीर्घ ओष्ट. लंबकर्ण ( लंबनासिके ऐवजीं ) त्यांच्या वाट्याला आले होते. पुनः मिशांना काय उपमा द्यावी ही अडचण आलीच ? करवतीची उपमा दिल्यास हरकत नाहीं कारण त्या अगदीं अखुड असून राठ होत्या; असो; आमच्या मालकांचें एवढें वर्णन पुरे. यावरून ते कसे होते याची साधारण कल्पना होण्यासारखी आहे. मालक स्वतःच व्यवस्थापकाचें, व बल्लवाचार्याचें अशीं दोन्हीं कार्यें करीत असत.

आमचें दुकान भर वस्तींत पण नाहीं व अगदीं गल्लींत नाहीं अशा जागीं होतें. सकाळच्यापेक्षां संध्याकाळींच विशेष गर्दी होत असे. व त्यांत बहुतकरून हलक्या धंद्याच्या लोकांचीच गर्दी असे. आमचे ' गृहात ' सभ्य गृहस्थ कधींच येत नसे. एकाने टाकलेले उष्टे पदार्थ बिनदिक्कत दुसऱ्यावेळीं ताजे, एकदम, ' गरम ' म्हणून विकण्यांत येत असत.

विठोबाच्या येथें राहिल्याला जवळ जवळ दोन अडीच महिने होत आले. मी घर सोडल्यापासून जेथें जेथें रहात गेलो, तेथें तेथें कांहीं तरी वाचण्याला लिहिण्याला मिळून तेवढाच मला आनंद वाटत होता; परंतु येथें आल्यापासून मला वाचावयास मिळण्याचा मुळींच संभव नव्हता. तरीपण, पुड्या वगैरे बांधून वर्तमानपत्राचें कागद येत असत, तें जेवढा वेळ मिळेल तेवढ्यांत वाचून पहाण्याला मी चुकत नसे. बाकी उजाडल्यापासून रात्रीं दहा अकरावाजेपर्यंत बिलकुल वेळ मिळत नसे. येथें मला सर्व प्रकारचीं हलकीं भारीं कामें करावीं लागत. भांडीसुद्धां घासावीं लागत असत. माझ्या शरीरांतहि पुष्कळ फरक पडला होता. जीं कामें जन्मात कधीं केलीं नाहीं तसलीं कामें करूं लागल्यामुळें माझ्या शरिरावर त्याचा परिणाम झाला ! मला जर माझ्या ओळखीच्या कोणी इसमाने पाहिलें असतें तर खात्रीनें ओळखलें नसतें. पूर्वीच्या माझ्या स्थितिबद्दल मला जें दुःख वाटत होते, तें हल्लींच्या स्थितिपुढें कांहींच नव्हे ! माझ्या भविष्यकाळांत चोहीकडे गर्द अंधार मला दिसूं लागला. या स्थितींतून माझी सुटका होऊन मला पुनः सुस्थिति येईल अशी मला आशा वाटेना ! माझ्यासारखा अभागी

दुर्दैवी प्राणी या साऱ्या पृथ्वीवर तरी कोणी असेल कीं नाहीं याची मला शंका येऊं लागली. अंतःकरणांतलें दुःख मी मोठ्या प्रयासानें सहन करीत होतो. आतां मला माझ्या स्वतःसंबंधानें सुद्धां कंटाळा आला होता. अशा स्थितींत जगण्यापेक्षां मरणें शतपटीनें बरें, असें किती वेळ तरी माझ्या मनात आलें असेल. आत्महत्येचा विचार-देखील हळूच आपलें डोकें वर करीत होता. अशा अपमानकारक स्थितींत रहावें कीं, आपला सोक्षमोक्ष करून घ्यावा असें क्षणोक्षणीं मला वाटत होतें. पण आशा मोठी बलवत्तर आहे.

---

## स्मृति सतरावी.

# रात्रींचें कारस्थान.



आमचे मालक क्षुधिताची क्षुधाच शात करीत होते, असे नाहीं; तर ते दुसराहि कसला तरी धंदा करीत असावे असा मला संशय येऊं लागला होता. रात्रीचें दहा अकरा वाजले म्हणजे कधीं कधीं त्याचेकडे त्याचा एक मित्र येत असे, व त्या दोघांचें बराच वेळ एकातात कांहीं तरी गुप्त खलबत होत असे. त्या इसमाला दिवसा आमचेकडे आलेला मी कधींच पाहिला नव्हता. आमच्या 'गृहा'तलें सर्व काम आटो-पल्यावर तो येत असल्यामुळे, तो कशा प्रकारचा मनुष्य आहे हें मला पहाता आलें नाहीं. कारण ते दोघे जेथे बसत, तेथे जाण्याची मला परवानगी नव्हती. तो असा नेहमीं रात्रींच का येत असतो व त्याचे एवढें गुप्त कारस्थान काय होत असतें, हे जाणण्याची मला सहाजिक जिज्ञासा उत्पन्न झाली. परंतु मालकाने त्या खोलींत जाण्याचा प्रतिबंध केल्यामुळें मला काहीं कामाच्या निमित्तानें तेथे जाता येईना. ते दोघे एकातात असलें तर हलकेच जाऊन त्याचे संभाषण ऐकावें असे मनात येई; परंतु न जाणो आणि त्यांच्या नकळत त्याचे संभाषण ऐकण्याचा प्रयत्न केला व ती गोष्ट त्याच्या नजरेस आल्यास त्याचा भलताच परिणाम व्हावयाचा. एके दिवशीं दिवे लागण्यापूर्वींच तो आमचा रात्रीचा गृहस्थ आला. मालक खुर्चीवर गिऱ्हाईकाची वाट पहात बसलेच होते, व मीहि तेथेंच कांहींसें मालकाच्या सांगण्यावरून करीत होतो. असा भलत्याचवेळीं त्या गृहस्थाला आलेला पहाताच मालक जरा चपापले व आश्चर्यानें त्याच्याकडे पाहूं लागले. तो गृहस्थ मालकाकडे पाहून हंसत म्हणाला,

"कां विठोबा? तुला कसलें एवढें आश्चर्य वाटलें? जरा इकडे ये. एक आपल्या फायद्याची गोष्ट तुला सांगायची आहे."

"अरे? पण तूं यावेळीं—"

"हं, हं." दंतप्रदर्शन करून तो गृहस्थ म्हणाला. "तूं भारीबुवा भित्रा. यावेळीं मला यावयाला काय झालें! मी काय कोणाची चोरीबिरी केली आहे वाटते?



रात्रींचि कारस्थान.　　　　प्र० १७ वें (पृ० १००)

अरे, दीड शहाण्या, चल, जरा इकडे ये पाहूं. मला लवकर जायचें आहे." माझ्याकडे वळून "हा तूं नवीन पोऱ्या ठेवलेला वाटते?" मला उद्देशून तो म्हणताच मीहि त्याच्याकडे पाहूं लागलों. मालकानें मला आंत जाण्याचा हुकूम केला. तेव्हां तेथें अधिक वेळ उभें रहाणें मला शक्य नव्हतेच. आमचे विठोबा व त्यांचे ते मित्र अगदीं जवळ उभे राहिले असता त्या दोघांची मी तुलना केली तर विठोबा जितके ठेंगू होते, तितकेच त्याचे मित्र उंच होते. विठोबाचा वर्ण जितका काळा होता, त्यापेक्षा त्यांच्या मित्राचा बराच पांढरा होता. विठोबा जेवढे गिद्दीसारखे लठ्ठ होते, तेवढे त्याचे मित्र वाऱ्यानें उडून जाण्यासारखे बारीक होते. त्या गृहस्थाचा खालचा ओठ तुटका असून तो कोणाच्या दृष्टीस पडूं नये म्हणून तो यत्न करीत असे. शरीराच्या वरच्या भागापेक्षा खालचा भाग वाजवीपेक्षा फाजील लांब असून विजार घातल्यामुळें तो फारच लंबटांगू दिसत होता. आमचे मालक व ते त्याचे मित्र जवळ जवळ उभे असता त्याच्यातले तें महदंतर पाहून मला विलक्षण हंसू येत होतें. मला आत जाण्यास सांगितल्यानंतर त्यांचे काय संभाषण होतें हें जाणण्याची मला इच्छा झालेली असल्यामुळें मी तेथेंच दारामागे क्षणभर उभा होतो, तो त्या गृहस्थाचे पुढील शब्द माझ्या कानीं आले.

"कायरे विठोबा! हा छोकरा तूं कोठून आणलास!"

"अरे, आणला कसचा? त्याला काय मी विकत घेऊन आलो आहे का काय? आहे आपला गरीब, त्याला कोणी नाहीं म्हणून मी ठेवून घेतला झालें! जें काम सांगावे ते करतो कशाला नाहीं म्हणत नाहीं."

"मी नेहमीं रात्रींच येत असल्यामुळें या पोराला चांगलेंसे पाहिलेंच नव्हतें. मला वाटतें तो चांगला पांढरपेशापैकीं असावा!"

"तो कोण, कुठला, हें मला कांहीं माहित नाहीं. पण तो पांढरपेशापैकींच आहे. काय करील बिचारा गरिबीमुळें त्याला ही दशा आली असेल."

"हो. पण हा असा दिसण्यात बऱ्या तोंडाचा छोकरा आपल्या कांहीं उपयोगाचा नाहीं." आंबट चेहरा करून तो म्हणाला. "दिसण्यात जे कुरूप तुझ्यासारखे बुद्रुक असतील तेंच आपल्या उपयोगी पडतील." विठोबाकडे तिरक्या डोळ्यानें पहात तो हंसत म्हणाला.

"हं हं. पुरे पुरे पुंड्या, तूं मोठा स्वरूपवान आहेस ते मला माहित आहे." विठोबा तीव्रस्वरानें रुपेरी डोळे गरगर फिरवून म्हणाले.

"वाहवा रे! एवढी थट्टा केलेली सुद्धां तुला कळत नाहीं! विठोजीराव! हे बघ त्या पोराला पाहिल्याबरोबर मला त्याच्याविषयीं भीति वाटूं लागली. असलीं सुरेख दिसणारीं तोंडे आपल्या सारख्यांचा केव्हांच घात करतील बघ. मी म्हणतो, तो आपल्याला केव्हांतरी दगा देईल बघ बरें का?"

" ओहो ! पुंड्या ? मला तूंच भितरा म्हणत होतासना ? आतां तूं भितरा कां मी ? त्या एवढ्याशा पोराला तूं किती घाबरतोस ? " हंसत हंसत विठोबा म्हणाले.

" कांहीं म्हण, पण त्या छोकऱ्याविषयीं चांगली खबरदारी घेत जा नाहींतर बघ कांहीं तरी घोंगडें ओढून घेशील ! "

"पुंड्या, मला वाटलें नव्हतें कीं, तूं इतका भीशील तो ? अरे, तूं मोठमोठ्या मी-मी बहादूराला देखील दाद देत नाहींस तो तूं त्या पोराला असा भागुबाईसारखा भीतोस तो ? तो आपलें काय करणार आहे ? काल तर तो अन्नासाठीं रस्त्यावर भटकत होता—तो काय करणार ? "

" तुझी तशी खात्री असली तर मला तशी काळजी वाटण्याचें कारण नाहीं. मी म्हणजे त्या टिलुरड्या पोऱ्याला भितो असे कांही नाही. " विठोबाने चढविल्यावरून फुशारून पुंडोबा म्हणाले.

त्यांचें संभाषण जरी अगदीं खालच्या आवाजात चाललें होतें, तरी मी दाराच्या फटीजवळ कान ठेवून उभा असल्यामुळें मला सर्व ऐकूं आलें. पुंडोबाच्या सल्ल्यावरून विठोबा मला रजा देतात कीं काय अशी भीति वाटत होती. विठोबांच्या संभाषणावरून मनाला जरा धीर आला. त्यानंतर ते एकमेकाच्या कानाशीं लागून कांहीं बोलत होते, तें मला मुळींच ऐकूं आलें नाहीं. आता जास्त वेळ येथें उभें रहाण्यांत अर्थ नाहीं हें जाणून मी पाऊल न वाजविता तेथून निघून गेलों; पुंड्याला पहाताच मला त्याच्या विषयीं अकारण भीति उत्पन्न झाली. त्याचे डोळे आपल्या भक्ष्यावर अचानक झडप घालणाऱ्या बहिरी ससाण्यासारखे दिसत होते. हा मनुष्य महाभयंकर असावा असा माझा ग्रह होऊन गेला.

आमच्या शांतीगृहाचें विस्तृत आवार म्हटलें म्हणजे एक स्वयंपाकघर व पुढच्या बाजूला एक खोली होती. तींतच एक कापडाचा पडदा लावून दोन भाग केलेले होते, पुढच्या भागात गिऱ्हाईकाला बसण्याकरिता पांचसहा अर्धवट मोडकळीस आलेल्या खुर्च्या व त्याच्या जोडीचें एक टेबल होते. पडद्याच्या आड दोन तसल्याच खुर्च्या व वाटोळे टेबल होते. जी पडद्याची खोली केली होती, तिच्या डाव्या बाजूला एक चिंचोळी पट्टीवजा खोली होती. त्या खोलींत मालकाचें खासगी सामानसुमान असें व तेथे जाण्याची मला परवानगी नसे. मालक स्वतः त्याच खोलींत निजून असत मी बाहेरच्या बाजूला निजत असे. असो; बाहेर कोणी गिऱ्हाईक आले होते म्हणून विठोबांनीं मला हांक मारली, गिऱ्हाकाच्या पुढयात सांगितलेले जिन्नस ठेवावयास मी गेलो. त्या गृहस्थाला पहाताच मी अगदीं आश्चर्यचकित झालो ! ते गृहस्थ आमच्या मराठी शाळेंतील मास्तर चिंचपोकळे होते ! मला ते ओळखतात कीं काय अशी प्रथम भीति वाटली होती; परंतु माझी ती भीति व्यर्थ होती. त्यांनीं आपणांस ओळखूं नये म्हणून तेथें फार वेळ उभा न राहतां मी आंत गेलो. मास्तरांच्या दर्शनानें मला पूर्वीच्या गोष्टीचें स्मरण होऊन आपण त्यावेळीं कोणत्या कल्पना तरंगांत तरंगत होतो व हल्लीं कोणत्या स्थितींत येऊन पडलों आहोंत; व पुढील

भविष्य काय आहे ? या तिन्ही काळाविषयींची वेगळी दृश्यें माझ्या हृदयांत उद्भवलीं. भविष्य काळांत गडद काळोख दिसूं लागला व निराशेनें मी हताश बनून गेलों! माझ्या या चमत्कारिक परिस्थितीबद्दल मला खेद होऊं लागला! मास्तरांनीं मला त्या तशा वेषांत व त्यास्थळीं ओळखलें नाहीं हें माझें सुभाग्य होय! क्षणभरानें मास्तर बाहेर पडले; त्यानंतर पुंडोबांनीं विठोबाला उद्देशून मोठ्यानें उच्चारलेले शब्द माझ्या कानीं आले.

" चल. विठोबा, शिरस्त्याप्रमाणें माझी बोळवण कर पाहूं, त्याशिवाय मी येथून जाणार नाहीं हें तूं खूप समजून ऐस."

" ती गोष्ट तूं कधीं विसरणार नाहींस हें मला पक्कें ठाऊक आहे." विठोबा हंसून म्हणाले. मला बोलावून 'कोणी गिऱ्हाईक आल्यास लक्ष असूं दे' म्हणून बजावून ते दोघे विठोबाच्या खास बैठकीच्या खोलींत गेले. बऱ्याच वेळानें ते दोघे बाहेर आले यावेळीं ते दोघे जानीदोस्त फारच रंगांत आल्यासारखें दिसत होते. पुंडोबांनीं आपला शुष्क हस्त विठोबाच्या भरीव गर्दनीवर ठेवला होता. जातां जातां त्यांना गाण्याची लहर लागल्यामुळें, आपल्या गर्दभसुरांत एक गाण्याची लकेरी मारून ते बाहेर पडले व अदृश्य झाले! विठोबांचें मित्र त्यानंतर चार पांच दिवसांत आले नाहीं.

कांहीं सामान खरेदी करावयाचें होतें, म्हणून मी विठोबाबरोबर मार्कीटांत गेलो होतो, सामानाचा बराच मोठा बोजा खांद्यावर घेऊन मी विठोबांच्या मागून हळुहळु चाललों होतो. गिरगांव रस्त्यावरून आम्ही जात असता सडकेच्या मध्यभागीं ट्रॅम उभी होती म्हणून ट्रॅमच्या बाजूनें आम्ही चाललों होतो. इतक्यांत उभ्या असलेल्या ट्रॅममधून उतरणाऱ्या दोन व्यक्तिकडे मी सहज पाहिलें; तर त्यापैकीं एक व्यक्ति माझा अपरिचित मित्रच होता. त्याला पहातांच मला फार आनंद झाला!

आज तो ट्रॅम मधून उतरून पायींच जात असल्यामुळें त्याच्यामागून गेले असतां त्याचा पत्ता आपल्याला लागेल; त्याची आणि आपली ओळख होईल तर काय बहार होईल ? परंतु माझ्या त्या वेळच्या त्यावेषांत त्याच्या मागें जाऊन त्याची ओळख करून घेणे किती मूर्खपणाचें आहे हें माझ्या लक्षात यावयाला वेळ लागला नाहीं. अशा भिकार वेषांत तो आपल्याला आतां ओळखणार नाहीं तरी बरें, असें मला वाटूं लागलें. माझ्या स्थितीबद्दल मला अतोनात खेद होऊं लागला, दुःखद विचारानें माझें पाऊल लवकर उचलेना, "किती हळूं चालतोरे ? असा बावळटासारखा काय करतोस ?" असें जेव्हां विठोबांनीं शब्द उच्चारले तेव्हा सर्व विचार बाजूला सारून मी जलद चालूं लागलो. माझा अपरिचित मित्र तर केव्हांच नाहींसा झाला होता.

पुंडोबाच्या सूचनेवरून विठोबा मला एकट्याला आतां सहसा बाहेर जाऊं देत नसत. जेथें जावयाचें असेल तेथें ते मला बरोबर घेऊन बाहेर पडत असत. बाजारांतून सामान सुमान वाहण्याचें काम मीच करीत असे, परंतु माझ्या बरोबर विठोबा नेहमीं असत. एक प्रकारच्या बंदींतच मी होतो. कांहीं दिवस मला त्यांचा कावा कळला नाहीं.

पण पुढें पुढें ती गोष्ट माझ्या लक्षांत येऊं लागली. त्या कोल्ह्याच्या तडाक्यांत मी चांगलाच सांपडलो होतो. मला ते अशा प्रकारें बंदींत ठेवीत असत ही गोष्ट त्यांना न कळूं देण्याचा मी यत्न करीत असे, त्यांचा मतलब मला बिलकूल कळलाच नाहीं अशा रीतीनें मी वागत असें.

नित्याप्रमाणे सर्व कामधंदा आटोपल्यावर मीं माझें एक रकटें टाकून विठोबाच्या खाजगी खोलीसमोरील दारापुढें निजलो होतो; सारा दिवस मनाला आणि शरिराला बिलकुल विश्राती न मिळाल्यामुळें त्या रकट्यावर पडताच मला केंव्हा झोंप लागली हें कळले सुद्धा नाहीं. अकस्मात माझ्या पायावर कोणाचा तरी पाय पडून मी दचकून जागा झालो; परंतु काळोखात मला कांहींच दिसलें नाहीं, अशा रात्रीच्या समयीं पुंडोबाची स्वारी आली असावी, असा माझ्या मनांत विचार येताच पुढील ओळखीचे शब्द मला ऐकूं आले.

" हे कोण येथें आहे बुवा ? काळोखात मला काहीं दिसले नाहीं. "

' अं, तो आमचा नोकर आहे. थाबा, मी जरा दिवा दाखवतो म्हणजे तुम्हाला आंत यायला दिसेल. " असे आमच्या विठोबाचे शब्द ऐकूं आले. दिवा येण्यापूर्वी मी माझें मन पूर्वस्थितीवर आणून भिंतीकडे तोंड करून अगदीं गाढ झोंप लागल्याप्रमाणें सावकाश श्वासोश्वास करूं लागलो. माझे नेत्र मिटलेले होते, तरी दिव्याचा प्रकाश तेथें आला असावा असें मला वाटलें.

" याला तूं येथेच निजायला सागतोस कायरे विठोबा ? त्याला झोंप लागली आहे म्हणून बरें. मी जेव्हां येतो तेव्हां हा आपला इथेंच निजलेला ! " असें कांहींसे रागानें उच्चारलेले पुंडोबाच्या तोंडचे शब्द मीं ऐकले, तेव्हा ही मंडळी कोण हें मी ताडले. विठोबा, पुंडोबा व त्याशिवाय तिसरा एक इसम; त्याचाच पाय पडून मी जागा झालो होतो.त्याच्या अवाजावरून त्या इसमाला मी ओळखले होते.पण पूर्ण खात्री अद्याप झाली नव्हती.तो इसम जर माझ्या ओळखीपैकीं असला,तर त्याला विठोबा व पुंडोबा यांच्याशीं अशा अपरात्रीं भेटण्याचें काय कारण असावें बरें ? तो येथें कशाला आला असावा हें जाणण्याची मला अतोनात इच्छा झाली. काय होईल तें होवो पण ते काय बोलतात हें ऐकण्याचा मी निश्चय केला. मी माझे डोळे किलकिले करून पाहिलें व माझ्याशिवाय त्या खोलींत दुसरें कोणी नाहीं अशी मनाची खात्री करून घेऊन मी अगदीं हलकेच उठून बसलो. ते विठोबाच्या खासगी खोलींत बसले होते, दार लोटलेलें असल्यामुळें फटींतून दिव्याचा प्रकाश दिसत होता. मी जागेवरून हळूच उठलो पाऊल न वाजवितां चवड्यावर चालून दाराजवळ तर गेलो, माझें हातपाय लटलट कांपत होते, हृदय भीतीनें धडधडत होते, एक हात माझ्या धडकणाऱ्या हृदयांवर ठेवून माझें पंच प्राण माझ्या कानांत आणून मी त्या दाराच्या फटीजवळ उभा राहिलो. विशेषकरून मला पुंडोबाचीच फार भीति वाटत होती. खोलींत ते तिघे इसम खाली सतरंजीवर बसले होते, पुंडोबाची दाराकडे पाठ होती हें माझें भाग्यच

म्हटलें पाहिजे. नाहींतर आपलें भाषण कोणी ऐकत आहे असा संशय आल्याशिवाय त्याला राहिला नसता. त्याच्या त्या तीक्ष्ण नजरेतून कांहींहि दिसल्यावांचून राहिलें नसतें. पुंडोबाच्या डाव्या बाजूला विठोबा बसले होते, व दाराच्या अगदीं समोरच तो तिसरा इसम बसला होता. त्यानें आपली टोपी अगदीं कपाळावर ओढून घेतली होती, तरी त्याला पहाताच हा कोण हें ओळखण्यास मला वेळ लागला नाहीं. तो मगनलाल होता ! त्याला तेथे पहातांच प्रथम मला फार आश्चर्य वाटलें. विठोबा व पुंडोबासारख्या माणसाशीं त्याचें एवढें मोठें कसलें काम असावें याची मला कल्पना करता येईना. या सात आठ महिन्यांत त्याला मी आज पाहिले होते. इतक्या अवधींत त्याच्यात बराच फेर पडलेला दिसत होता; त्याचा चेहरा अगदीं फिकट दिसत होता, गालव्या बसल्या होत्या व डोळे जरा खोल गेलेले दिसत होते, परंतु त्यांतील चमक मात्र कायम होती. तो आपल्या मिशांना पिळ देत होताच व त्याच्या बोटांतल्या आंगठीचा हिरा पूर्वीप्रमाणेच चमकत होता. त्या तिघांच्यापुढें एक काळ्या रंगाची मोठी बाटली होती व ग्लासच्याऐवजीं चहाचे तीन कप होते. पुंडोबांनीं ते तिन्ही कप भरून त्या दोघांच्या पुढे दोन ठेवून एक आपल्या तुटक्या ओठाजवळ नेला. मगनलाल अगदी विचारांत गढून गेल्यासारखा दिसत होता. तरी पण पुढें आलेला पेला त्याने चटकन गट्ट करून टाकला. त्या धंद्यांतहि त्यानें बरीच प्रगति करून घेतली असावी असें दिसत होतें. पुंडोबांनीं कप भरण्याची पुनरावृत्ति केली व ते मगनलालला उद्देशून अगदीं हलक्या स्वरांत म्हणाले. " हं. आतां काय आपले म्हणणें आहे तें लवकर सागून टाका."

" मला जें सांगायचं आहे ते फार गुप्त आहे. पहा, कोणी बाहेर फोडणार तर नाही ना ? " मगनलाल हळूंच म्हणाला; त्याचा अवाज कापरा होता, आणि मुखावर अधिकच फिकटपणा पसरला होता.

" आम्ही दोघे आणि तुम्ही असें आपण तिघेंच येथे आहोंत, तेव्हां आपणापैकी कोणाकडून एखादी गोष्ट फुटेल असें कधींच होणार नाही. आम्हांपैकी जी गोष्ट एकाला कळली ती दुसऱ्याला कळलीच म्हणूनच समजावी. का? पुंडोबा, खरेंना ? " विठोबा पुंडोबाकडे वळून आपली आखूड मान करवेल तितकी लांब करून म्हणाले,

" आम्ही दोघे अगदीं बालमित्र जिगरदोस्त आहोत, जें सांगायचे ते बिनदिक्कत सांगा." आपल्या हातांतला दुसरा पेला गट्ट करून पुंडोबा म्हणाले. त्यानंतर आपला आवाज शक्य तितका हळूं करून मगनलालनें कांहीं तरी त्या दोघांना सांगितलें. पण मला तें पुरें ऐकूं आलें नाहीं. त्या मित्रद्वयांनीं आपले कान अगदीं त्याच्या तोंडाजवळ नेले होते. त्याचें शब्द अगदी अस्पष्ट ऐकूं येत असल्यामुळें नुसता गुणगुणल्यासारखा भास होत होता. त्यांचें पुढील संभाषण ऐकण्याविषयीं मी अगदीं उत्सुक झालो होतो, पण मला फारसें ऐकूं आलें नाहीं. त्यांचा काहीं तरी

नक्की बेत ठरून, त्यांनीं ती बाटली खलास केली व ते उठण्याच्या बेतांत आहेत हें जाणून मी त्या जागेवरून हलकेंच येऊन माझ्या जागेवर भिंतीकडे तोंड करून निजलों. पांच मिनिटें झालीं असतील, तों दार उघडण्याचा अवाज माझ्या कानीं आला, माझ्या जवळून कोणी तरी गेल्याचा मला भास झाला, क्षणभरानें माझ्या नेत्राजवळ एकदम प्रकाशाचा झोंत आला. मी अगदीं मेल्यासारखा निपचीत पडलो होतो. कोणाचा तरी थंडगार हात माझ्या उरावर ठेवला गेला. माझी शंभर वर्षें भरलीं असें मला वाटलें. मी सर्वस्वीं परमेश्वरावर भार ठेवून हालचाल न करतां पडून राहिलों होतो. " पुंड्या, काय करतोस त्याला ? " हलक्या अवाजांत विठोबाने उच्चारलेले शब्द ऐकूं आले.

" कांहीं नाहीं, तो जागा आहे का पहातो. " इतकें म्हणून पुंडोबांनीं माझ्या हृदयावरचा मृत्युरूपी आपला हात काढून घेतला. " अरे, अशा कामात फार सावधगिरी बाळगली पाहिजे थोड्या चुकीचा घोर परिणाम होतो माहित आहे, प्रत्येक कामात हुशारी वापरली पाहिजे. जर हा जागा आहे असें मला कळतें तर याच जागेवर याला यमसदन दाखविले असतें. " पुंडोबांच्या त्या शब्दाने माझ्या काळजाचें पाणी पाणी होऊन गेलें. मी जागा नाहीं अशी त्याची खात्री झालेली होती म्हणूनच त्यावेळीं यमाच्या दरबारी जाण्याचा मला मिळणारा बहुमान टळला ! परमेश्वराच्या कृपेनेंच माझा आजचा मृत्यु टळला होता ! बाहेरचें दार बंद झालें, विठोबांचेहि दार बंद झाले, परंतु मी माझे डोळें घट्ट मिटून घेतले होते ते किती वेळ तरी उघडण्यास धीर होईना. पुंडोबा माझ्या जवळ बसून माझ्या छातीवर अद्यापिहि आपला हात ठेवित आहे असा मला भास होत होता. चोहोंकडे अगदीं सामसुम झाली; विठोबांच्या घोरण्याचा अवाज जेव्हां मला स्पष्ट ऐकूं येऊं लागला, तेव्हा मी आपले डोळे हळूच उघडले.काळोखांत मी असून माझ्याजवळ कोणी नाहीं. अशी जेव्हां माझी पक्की खात्री झाली, तेव्हाच माझ्या जिवांत जीव आला दारूच्या धुंदींत मगनलालचें माझ्याकडे लक्ष गेलें नाहीं, अगर माझ्या झालेल्या फरकामुळें त्यानें मला ओळखलें नाहीं कोण जाणे ? त्यानें मला ओळखलें नाहीं हे एका अर्थीं बरेंच झालें. नाहीं तर त्या दुष्ट पुंड्यानें मला तेव्हांच परलोकचा मार्ग दाखविला असता ! त्या प्रसंगांतून माझा प्राण वांचविला म्हणून मी मनांतल्यामनात ईश्वराचे सहस्रशः आभार मानिले. नंतर मला मुळींच निद्रा येईना, डोळें मिटतांच पुंडोबाची मूर्ति डोळ्यापुढे उभी राहून माझी निद्रा कोठच्या कोठें पळून जाऊं लागली.



## स्मृति अठरावी.

# जवाहिरांची चोरी.



मगनलाल ज्या रात्रीं आला होता, त्यानंतर दोन दिवस गेलें. विठोबाला माझा संशय येऊं नये असा मी माझ्याकडून प्रयत्न करीत होतो. परंतु तो कावळा क्षणोक्षणीं आपल्या काकदृष्टीनें माझ्या हृदयात काय आहे हे जाणण्याची खटपट करीत असावा असें मला वाटत होतें. एखादी गुप्त गोष्ट आपणास कळली असली व ती दुसऱ्या कोणास कळूं नये अशी आपली मनापासूनची इच्छा असता सहज जरी कोणी आपणाकडे पाहिलें तरी आपली गोष्ट कळली का काय अशी आपणास शंका येते. विठोबा माझ्याकडे सहज जरी पाहूं लागला तरी तो मुद्दामच पाहतो असे मला वाटे. दोन दिवसात पुंडोबाची स्वारी देखिल आली नाहीं. तिसऱ्या दिवशीं शनिवारीं संध्याकाळीं दिवे लागून गेल्यावर पुंडोबा आला;व तो विठोबा बिठोबाच्या खोलीत अर्धा तास बोलत बसले होते. ते काय बोलतात हें ऐकण्याविषयीं माझा जीव खालीवर होत होता.मगनलालबरोबर ज्या रात्रीं पुंड्या आला होता, व त्यारात्रीं त्याचें जे कारस्थान झालें, त्या संबंधानेच आजचें पुंडोबांचें येणें असावें अशी मला शंका आली. परंतु त्यांचें जे संभाषण होईल तें आज मला ऐकतां येण्यासारखें नव्हते. एखादा तरी शब्द ऐकूं यावा म्हणून माझी धडपड चालली होती. कांहीं काम नसताहि मी त्या खोलीच्या दारावरून घटकोघटकीं खेपा घालूं लागलो, हेतु हा कीं जातां येता एखादा तरी शब्द कानावर यावा. परंतु ते काय बोलत आहेत हें मला मुळींच ऐकूं येणें शक्य नव्हते. जेव्हा ते दोघे मित्र बाहेर आले, तेव्हां पुंडोबा बऱ्याच घाईंत असावा असें मला वाटलें. जाता जातां " विठोबा, दोहोनंतर लक्षांत असूं दे, हं ? " इतकें बोलून तो घाईघाईनें निघून गेला. त्यानें उच्चारलेल्या वाक्याचा अर्थ कांहींच कळण्यासारखा नव्हता. मी माझ्या मनाशीं त्या-बद्दल पुष्कळ तर्ककुतर्क करून पाहिले, पण तो कशाविषयीं बोलला याची मला मुळींच अटकळ करता येईना. ते अर्धवट वाक्य ऐकल्यापासून मला उलट अधिकच तळमळ लागून राहिली. पुंडोबा गेल्यापासून विठोबा बरेंच चिंतातूर दिसले ! मग पुंडोबानीं त्यांना असें काय सांगितलें असेल तें त्यांचे त्यांनाच माहित ! दिवे लागल्यापासून आमच्या गृहात गिऱ्हाईकांची गर्दी होऊं लागली, रात्रीचे अकरा वाजेपर्यंत मला विचार करण्यालाहि फुरसत मिळाली नाहीं.

मी माझ्या अंथरुणावर पडल्या पडल्या पुंडोबांच्या त्या वाक्याविषयीं विचार करीत होतो. त्या रात्रीं मला मुळींच निद्रा येईना, झोंप न आल्यामुळें माझ्या मनांत अनेक प्रकारच्या विचारांनीं धुमाकूळ माजवून दिला. केव्हां एकदां उजाडतें असें मला होऊन गेले. बरींच रात्र उलटून गेल्यावर बाहेरच्या दारा-वर कोणीतरी हळूंच थाप दिली असावी असा मला भास झाला. पुनः तशीच

थाप ऐकूं आली. दार उघडून कोण आहे ते पहावें असें मला प्रथम वाटलें; इतक्या रात्रींच्या समयीं येणारी व्यक्ति बहुधा पुंडोबाच असावे असें मनांत येतांच मी उठण्याचा प्रयत्न केला नाहीं. पुनः तिसरी थाप जरा जोरानें ऐकूं आली, त्याच क्षणीं विठोबांच्या खोलींत काडी ओढल्याचा आवाज ऐकूं येऊन दिव्याचा प्रकाश दिसूं लागला. एका हातांत दिवा घेऊन विठोबा बाहेर आले व त्यांनी दाराजवळ जाऊन हळूंच कांहींतरी शब्द उच्चारले. बाहेरूनही कोणीतरी त्यांना हलक्या स्वरांत प्रत्युत्तर दिलें. विठोबांनीं दार उघडलें असावें; कारण दार उघडल्याचा कर्रर्र असा अवाज होऊन उघड्या दारांतून थंड वाऱ्याचा झोत आंत आला. लगेच दार बंद झालें. आलेली व्यक्ति पुंडोबाच होते. आंत येतांच पुंडोबांनीं जरा खेंकसूनच कांहीं तरी रागाचें शब्द उच्चारले; परंतु माझ्या हृदयाच्या धडाक्यामुळें मला नीटसें ऐकूं आलें नाहीं. दार उघडण्याला उशीर लागल्यामुळेच पुंडोबा त्याच्यावर रागावत असावे. ते दोघेहि विठोबाच्या खोलींत अंनर्धान पावल्यावर मी चोरट्या पावलांनीं दाराजवळ आलों, माझ्या सुदैवानें याहि वेळेस दार लोटलेलेच होतें. दृष्टी अगदीं संकुचित करून व कान अगदीं टवकारून आत काय होतें तें पहाण्याचा व ऐकण्याचा यत्न करूं लागलो. कांहींच ऐकूं आलें नाहीं. परंतु पुंडोबानी एक लहानशी पेटी–पेटीच असावी ती मला निटसें दिसूं शकले नाहीं. मी तर्कानेच ती पेटी असावी असें अनुमान केलें. आपल्या काखेंतून झटक्न काढून विठोबाजवळ दिली व विठोबानेंहि तितक्याच त्वरेने तेथें असलेल्या एक अगदीं जुन्या कपाटात ठेऊन दिली. त्यानंतर पुंडोबानें आणखीहि कांहीं कागदाच्या पुडक्यासारखे आपल्या कोटाच्या आंतल्या खिशांतून काढून त्याच कपाटात खुपसून दिले, व तो घोगऱ्या अवाजात हळुहळु बोलत होता. त्याच्या बोलण्यापैकीं एखादा तरी शब्द ऐकूं यावा अशी माझी आनिवार इच्छा होती. शक्य तितका दाराजवळ जाण्याचा मी प्रयत्न केला. पुढे सरकल्यामुळें माझा किंचित दाराला धक्का लागून दाराची फट मोठी झाली व थोडासा अवाजहि झाला. मी तर अगदीं भयभीत होऊन गेलों! तो अस्पष्ट अवाजहि पुंडोबाला ऐकूं गेल्याखेरीज राहीला नाहीं. त्यानें चटकत् आपले यमराजासारखें नेत्र दाराकडे फिरविले व "कोण आहे?" असा घोगऱ्या स्वरात प्रश्न केला. आपण आतां काळाच्या विकराळ दाढेखालीं सांपडलों असें मला वाटले, माझें सर्व रक्त गोठून गेले, कसें तरी करून मी एकदाचा माझ्या अंथरूणावर येऊन पडलो; भयाने माझें सर्वांग थरथर कांपत होतें. आतां तो यमदूत येऊन माझ्या नरडीचा घोंट घेईल, असें दर पळाला वाटत होते. "दम धर विठोबा! दार कां वाजलें हें पहातो, असें म्हणत तो दाराजवळ आला असावा. मी माझ्या जागेवरच निजलेला आहे हें पाहून आपल्याला भास झाला असावा असें त्याला वाटलें. तरी पण त्याच्या मनाची पूर्ण खात्री होईना! तो विठोबाला म्हणाला. " विठोबा, तूं कांहीं म्हण, पण मला तुझ्या या पोराची बिलकुल खात्री वाटत नाहीं. दार वाजल्याचा भास झाल्यामुळें मला याचाच संशय

आला. परंतु तो एकदां निजला म्हणजे मढ्यासारखा निजतो. रात्रींत केव्हांहि जागा होत नाहीं असें तूं सांगितलेस म्हणून मला त्याचा एवढा संशय आला नाहीं. आतां मी जातो, नीट काळजी घे, पुढें काय करायचें तें मी तुला उद्यां सांगेन." जातां जातां मी खरोखरींच निजलो आहे कां नाहीं याची पक्की खात्री करून घेतल्याखेरीज तो गेला नाहीं. तो गेल्यानंतर माझा जीव जरा शांत झाला.

दुसऱ्या दिवशीं रविवार होता; आज आमच्या गृहांत सकाळींसुद्धां बरींच गर्दी होती. दर रविवारीं सकाळसंध्याकाळ विशेष गर्दी होत असे. आलेल्या गिऱ्हाईकाला चहा करून देण्याच्या धांदलींत आमचे मालक होते. कपबशा धुऊन ठेवणें व फराळाचें मागणाराला फराळाचें पुरविणें ह्या धांदलींत मी गुंतलो होतो. गिऱ्हाईकांपैकीं दोघेतिघे चहाचे घुटके घेत बसले होते व आणखी दोघे नवीन इसम आल्यावरून मालक त्यांच्यासाठीं नवीन चहा बनवीत होते. गिऱ्हाईकांपैकीं एक दुसऱ्याला म्हणाला,

"आमच्या शेटकडे चोरी झाली तुम्हाला खबर आहे का?"

"केव्हां हो राव?" दुसरा आश्चर्यानें उद्गारला. आमचे गिऱ्हाईक बहुतकरून गिरणीकामगारच असत.

"काल रात्रीं. आमच्या शेट—"

त्या पहिल्या इसमाच्या तोंडचें वाक्य पुरें होण्यापूर्वींच आमच्या मालकाचे हात उकळत्या पाण्याच्या किटलींसह लटपटून ती किटली त्याच्या पायावर पडली. डावा पाय सपाटून भाजल्यामुळें त्याना तीव्र वेदना होऊं लागल्या. गिऱ्हाईक मंडळीहि असें कसें झालें? कशी किटली पडली? किती भाजलें? वगैरे चौकशी करून निघून गेली. विठोबा म्हणजे विलक्षण चिक्कू माणूस होता; आपला पाय एवढा पोळून असह्य वेदना होत होत्या, तरी त्यानें डॉक्टरचे औषधोपचार न करता स्वतःला जे साधारण माहित होतें तेंच उपचार सुरूं केले. त्याने सबंध दिवस तळमळून काढला. संध्याकाळपर्यंत त्याना जागचें हलताहि येईना! पायाला मोठमोठे फोड आले होते, त्याच्या वेदना पाहून मला वाईट वाटत होतें. जेव्हा पायाला अतिशय आग होऊं लागली, तेव्हा डॉक्टरला तेथे न आणता डॉक्टरकडून काहीं तरी औषध आणण्याकरिता त्यानीं मला पाठविलें. औषध आणण्याकरिता मी डॉक्टरकडे गेलो. आमच्या गृहापासून बऱ्याच अंतरावर एका डॉक्टरचा दवाखाना होता. रस्त्याने मी चाललो असता कोणालासा माझा धक्का लागल्यामुळें चटकन् मी भानावर येऊन पाहूं लागलो, तर तो एक वर्तमानपत्रें विकणारा पोऱ्या होता! त्याच्याकडे निरखून पहाताच तो कोण हे मी तावडतोब ओळखलें व त्यानेंहि मला ओळखलें. तो आश्चर्यानें म्हणाला.

"कोण? चिंतामणी? तूं का रे? मी तर तुला ओळखलाच नाहीं." हंसत हंसत तो पुढें म्हणाला, "वारे वा! असा रस्त्यानें दुसऱ्याला धक्के देऊन जातोस काय? आता मी तुला चांगलाच चोपणार होतो!"

छापखान्यांत मी जेव्हां प्रथम चाकरीस राहिलो, तेव्हां माझ्याबरोबर जी दोनचार

पोरें होतीं त्यापैकीं हा एक होता. छापखान्याची चाकरी सुटल्यावर तो वर्तमानपत्रें विकण्याचा धंदा करूं लागला, त्यानंतर त्याची व माझी ही प्रथमचीच भेट होती. आम्ही आपली एकमेकांविषयीं साधारण माहिती सांगितली. छापखान्यांतून निघाल्यानंतर मी शांतीगृहाच्या मालकाकडेच राहिलो आहे, असें त्यास सांगितलें. दुसरें कांहींच सांगितलें नाहीं. आजच्या वर्तमानपत्रात ताजी बातमी काय आहे म्हणून मी त्याला सहज विचारले, तर कोणी भगवानदास नांवाच्या शेटाकडे काल रात्रीं मोठी चोरी झाल्याचें त्यानें सांगितलें. भगवानदासच्या येथें चोरी झाल्याचें ऐकून मला अगदीं चमत्कारिक होऊन गेले! पांच मिनिटांकरिता मी त्याच्या जवळून एक वर्तमानपत्र मागून घेतलें. "मी पलीकडच्या रस्त्यावरून फिरून येतो, तोंपर्यंत तूं वाचून घे." असें सांगून बाकीच्या वर्तमानपत्राचा पुडका कांखेत मारून पूर्ववत ओरडत तो रस्त्यानें चालला. मी तेथेंच रस्त्याच्या एका बाजूला उभा राहून वर्तमानपत्रातील फक्त चोरीसंबंधाचा लेख वाचूं लागलो.

"शेट भगवानदास याचेंकडे काल रात्रीं विलक्षण चोरी झाली आहे. चोर कसा व कोठून आला याचा पत्ता लागत नाहीं. सकाळीं शेटसाहेब जेव्हा जागृत झाले, तेव्हां त्यांच्या निजावयाच्या खोलींत असलेली तिजोरी उघडीच आहे असें त्यांच्या निदर्शनास आले. प्रथम आपणच विसरलेपणीं उघडी टाकली असावी असें त्यांना वाटलें. परंतु मनाची पक्की खात्री करण्याकरिता ते तिजोरी पहावयास गेले. [तिजोरीच्या किल्ल्या नेहमीं त्यांचेच जवळ असत व ते तिजोरी नेहमी स्वतःच उघडीत असत.] तिजोरी उघडून पहातांच त्यात असलेली अडीच लाख किंमतीची जवाहिरांची पेटी व एक लाख चौतीस हजारांच्या नोटा नाहींशा झाल्याचें आढळण्यांत आलें! त्या धक्क्यानें प्रथम कांहीं वेळ ते अगदीं चैतन्यशून्य झाले! त्यानंतर त्यांनीं ताबडतोब ती वर्दी पोलिसांत दिली. पोलिस तपास चालूं आहे; परंतु चोराचा अद्याप मुळींच पत्ता लागला नाहीं. चोरीस गेलेलें जवाहीर शेट साहेबांचें स्वतःचें नव्हतें; तें जवाहीर एका संस्थानिकाचें असून संस्थानिकाच्या कारभारीसाहेबानीं तें दोन तीन दिवसांपूर्वीच संस्थानिकांसाठीं विकत घेतलें असून तें शेटसाहेबांच्याजवळ सुरक्षिततेकरितां ठेवावयास दिलें होतें. कारभारीसाहेब शेटसाहेबाचे स्नेही असल्यामुळें ते शेटसाहेबांकडेच उतरले होते. जवाहीर एक फूट लांब व अर्धाफूट रुंद अशा काळ्यारंगाच्या शिसवी पेटींत असून त्यावर संस्थानिकांचें नांव आहे."

चोरीसंबंधी ती हकीकत वाचून मी अगदीं आश्चर्यचकित होऊन गेलो! शेटसाहेबांवर आज केवढा विलक्षण प्रसंग होता! माझ्या मनांत एकदम एक विचार आला, व त्याबरोबर मला एक प्रकारचा उत्साह वाटला. मी दवाखान्यांत जाण्याचा बेत रहीत करून शेटसाहेबांच्याकडे जाण्याचें ठरविलें. त्या वर्तमानपत्रवाल्या पोराला त्याचें वर्तमानपत्र देऊन मी अगदीं धांवतच शेटसाहेबांच्या बंगल्याचा रस्ता धरला, मी इतक्या वेगानें जात होतो कीं, सडकेच्या बाजूला असलेल्या कंदीलाच्या खांबावर माझें

मस्तक आपटून मला जरा तिरमिरी आली; परंतु तितक्यांत सावध होऊन पुनः तितक्याच वेगानें मी धाऊं लागलो. शेटसाहेबाच्या बंगल्याचे फाटक दिसतांच मला समाधान वाटलें. धांवून धांवून मी अगदीं दमून गेलो होतो. फाटकांत प्रवेश करून मी बंगल्याच्या पायऱ्यापर्यंत गेलो. पण तेथें दारावर असलेला भय्या मला आंत जाऊं देईना ! मी कोणत्या वेषात आहे याचें आता मला स्मरण झाले, माझ्या विचित्र वेषांवरून त्यानें मला ओळखलें नसावे. कारण तो मला शिव्या देऊन बाहेर लोटूं लागला. शेवटीं मी त्याला म्हणालो " गयाप्रसाद, तूं मला ओळखलें नाहींस काय ? मला आत जाऊं दे,शेटसाहेबाजवळ मला जरूरीचे काम आहे. " तरीहि त्यानें मला ओळखलें नाहीं.

" अरे भय्या, मी चिंतामणि ! मला तूं अजूनहि ओळखले नाहींस काय ? " माझें नाव ऐकताच तो भानावर आला व माझ्याकडे निरखून पाहूं लागला. अखेरीस त्याने मला ओळखलें असावें. आश्चर्याने तो म्हणाला.

" कोन ? तुम चिंतामणि ? हम तो तुमकु नही पिछाना ? तुम कहा थे इतने दिनतक ? "

"भय्या, तें मी मग सागेन, पण मला प्रथम शेटसाहेबाना भेटायचें:आहे. आहेत ते घरांत ? "

"ओऽ धनीसाब तो अंदर हय,लेकीन ओ भारी फिकीरमें हय," तो म्हणाला. " कल. रातकु याह बडी चोरी हुयी, इसलिये धनीसाबका दील बोत खराब हो गया है, और दो दीन हुये मगनभाईभी बिमार है. " त्याची आणखीहि चरपट पंजिरी चालली असती, परंतु त्याच्या बोलण्याकडे फारसे लक्ष न देता शेटसाहेब घरीं आहेत असें कळतांच मी आंत शिरलो व त्यांच्या लिहावयाच्या ज्या खोलींतून नोट चोरीला गेली होती त्याच खोलींत गेलो. शेटसाहेब आपलें मस्तक हातावर ठेऊन, नेत्र झांकून चिंतातूर होऊन बसले होते. मी आंत आलों हे त्याना कळले नाहीं. शेटसाहेबांच्या चेहऱ्यांत मला बराच खिन्नपणा दिसला. व त्यांच्यांत बराच फरक झालेला दिसला. त्यांचें लक्ष आपल्याकडे वेधावें म्हणून मी त्यांच्या अगदीं समीप गेलो, तरी त्यांना माझी चाहूल लागली नाहीं इतकें तेच आपल्या विचारांत निमग्न झाले होते. आणखीहि पुढे सरून मी त्यांच्या नांवाचा उच्चार केला.

" शेटसाहेब ! "

स्वतःच्या नांवाचा उच्चार होतांच शेटसाहेब स्वप्नांतून जागृत झाल्याप्रमाणें चपापून माझ्याकडे पाहूं लागले. त्यांनींहि मला ओळखले नसावे. मी पुढें सरून म्हणालो,

" आपण मला ओळखलें नाहीं. मी चिंतामणी, "

" कोण ? " आश्चर्योद्गार त्यांच्या मुखांतून निघाले व ते माझ्याकडे टक लावून पाहूं लागले. पूर्वीचा सर्व देखावा माझ्या नेत्रासमोर उभा राहिला. अद्यापिही

ती नोट मीच चोरली असावी असा शेटसाहेबांचा झालेला ग्रह बदलला नाहीं, असें वाटून मी खाली पाहूं लागलो. शेट साहेबांनीं स्वतःच आपल्या थरथरणाऱ्या हातांत माझा हात धरून म्हटले.

" चिंतामणी, तुम्ही माझें घर सोडून असें कां गेलांत ? " त्यांच्या वाणींत मायाळूपणा होता.

" त्या नोटी—"

" ती नोट सापडली ! "

" सांपडली ! " आतां आश्चर्य वाटण्याची माझी पाळी होती.

" होय," शातपणें ते म्हणाले, "मीच पुस्तकात ठेविली होती, व मला ती कोठें ठेविली याची आठवण नव्हती.तुम्ही गेल्यावर मला ती पुस्तकउघडतांच आंत सापडली. नंतर मी तुमचा पुष्कळ तपास केला, पण कोठेच पत्ता लागला नाहीं, तुम्हाला आणण्यासाठीं मोहनलालने तर अगदीं माझा पिच्छा पुरविला होता. " आता मला माझ्या उतावळेपणाचा खेद होऊं लागला. इतका वेळपर्यंत मोहनलाल माझ्या दृष्टीस पडला नव्हता. घरात नेहमीप्रमाणे आनंद दिसत नव्हता. एक प्रकराचा उदासीनपणा चोहीकडे पसरलेला होता. नोट सापडली हे ऐकून मला इतका आनंद झाला कीं मी ज्या कामासाठीं एवढ्या तातडीने धावत आलो ते काम क्षणभर विसरलो. शेटसाहेबाच्या विषण्ण मुखाकडे पहाताच मला त्यांच्यावर कोणता प्रसंग आहे याची स्मृति झाली.

" आपल्याकडे काल रात्रीं जवाहीराची चोरी झाली, असे ऐकले ! " मी म्हणालो. शेटसाहेबाच्या चेहऱ्यात अधिक उदासीनपणा दिसूं लागला.

" होय. " एक निःश्वास सोडून ते म्हणाले.

" काहीं तपास लागला का ! " शेटसाहेबासारख्या थोर माणसाजवळ माझ्यासारख्याने अशी चौकशी करणे गैर नव्हे काय ? मी केवढा ते केवढे ? ते आपल्या मनात मला काय म्हणाले असतील बरे ? माझ्या प्रश्नाला त्यानीं निराशपूर्ण उत्तर दिले.

" काहीं नाही. " त्यानीं आपले मस्तक दोन्ही हातानीं दाबून धरलें होते.

" शेटसाहेब, आपण जर माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवाल, तर आपले चोरीस गेलेले जवाहीर व नोटा कोठे आहेत हे मी आपणास सागतो. " माझा हात जोरानें दाबून व माझ्याकडे वेड्यासारखी टक लावून शेटसाहेब म्हणाले,

" काय ? जवाहीर कोणी चोरले हे तुम्हाला माहित आहे काय ? "

" होय, आपण आताचें आता बंदोबस्त केल्यास आपला माल आपल्या हातीं लागण्याचा संभव आहे ! " माझा हात खेंचून मला दाराकडे ओढीत वेड्याप्रमाणें शेटसाहेब अधीरतेनें म्हणूं लागले,

" चिंतामणी, चल, चल, लवकर. तें जवाहीर कोठें आहे तें मला दाखव. तें जवाहीर माझें नाहीं!" त्यांची त्यावेळची ती चमत्कारिक स्थिति पाहून मला फार वाईट वाटलें मी त्यांना स्वस्थ बसण्यास सागितलें. मगनलाल कोठें आहे म्हणून चौकशी केली.

तो कालपासून आजारी असून आपल्या खोलींतून बाहेर आलाच नाहीं असें कळलें. शेटसाहेबांचें मन जरा स्थीर झाल्यावर मी मला माहित असलेली सर्व हकीकत त्यांना सांगितली. मगनलालची त्या शांतीगृहांतल्या मित्रद्वयाशीं झालेली मैत्री व त्याचें त्यांना अपरात्रीं भेटणें, हें ऐकून शेटसाहेबांना फार आश्चर्य व उद्वेग वाटला ! या झालेल्या चोरींत मगनलालचा कांहीं तरी संबंध असावा, असें त्यांना वाटूं लागलें. पुढें काय करावें या विचारांत ते पडले होते. आतां फार वेळ न गमवितां जें करणें तें लवकर केलें तर बरें, नाहीं तर मला शांतीगृहांत जाण्याला वेळ लागल्यास माझा संशय येऊन ते दोघे बदमाष तेथून फरारी होण्याचा संभव आहे असें मी शेटसाहेबांना सुचविलें. माझी सूचना त्यांना पटून क्षणाचाहि वेळ न दवडतां त्यांनीं पोलिस सुपरिन्टेन्डंटला टेलिफोन करून बंगल्यावर बोलाविलें. सुपरिन्टेन्डंटसाहेब येईपर्यंत मी मोहनलाल कोठें आहे म्हणून विचारलें, तर तो आपल्या मातेबरोबर आठ दिवसांपूर्वीच अमदाबादेस आपल्या आजोळीं गेला आहे, असें त्यांनीं सांगितलें.

---

## स्मृति एकूणिसावी.

# पुंडोबाचें पलायन.



टेलिफोन केल्यानंतर सुमारें अर्ध्यातासानें सुपरिन्टेन्डंट साहेबांची स्वारी आली आहे म्हणून गयाप्रसाद सांगावयास आला. त्यानंतर पांच मिनिटांनीं साहेबाच्या स्थूलोदराने आंत प्रवेश केला व एवढ्या तांतडीनें आपल्याला कां बोलाविलें याची आपल्या मुळच्या गंभीर चेहऱ्यांत अधिक गंभीरपणा आणून ते चौकशी करूं लागले. शेटसाहेबांनीं त्यांना बसावयास सांगून मी जेवढी हकीकत सांगितली होती, तेवढी सर्व सांगितली. परंतु त्यांनीं मगनलालच्या नांवाचा त्यात संबंध देऊं दिला नाहीं. चालेपर्यंत मगनलालचें नांव न कळविण्याविषयीं साहेब येण्यापूर्वीं मलाहि त्यांनीं सूचवून ठेवलें होतें. त्याच्यावर संकट येऊं नये म्हणून अद्यापिहि शेटसाहेब यत्न करीत होते. शेटसाहेबाची सर्व हकीकत ऐकल्यानंतर सुपरिन्टेन्डटसाहेबानी मलाहि कांहीं प्रश्न केले. शांतीगृहाचा पत्ता त्यानी आपल्या रोजनिशींत टिपून घेतला, तसेंच विठोबाच्या मुखाकृतिचें वर्णनाहि त्यानी टिपून घेतलें. विठोबाचा स्नेही पुंडोबा याचें वर्णन मी करीत असता मध्येंच आश्चर्यानें ते म्हणाले " त्या इसमाचा खालचा ओठ फाटका आहे कां ? " मी " हो " म्हणतांच त्यांना फार आश्चर्य वाटून ते म्हणाले,

" बस, बस ! तोच मनुष्य. त्याच्या शोधांत आम्ही कधींपासून तरी आहोंत. तो अद्याप आमच्या हातीं लागत नाहीं. तो तुरुंगांतून फरारी झालेला महा-

भयंकर डाकू आहे. आज रात्रीं तो शांतीगृहांत केव्हां येणार आहे ? " मला त्यांनी विचारीलें.

" तो नेहमीं अकरा वाजल्यानंतर येत असतो, पण आज केव्हां येईल हें मला नक्की माहीत नाहीं. " आपल्या खिशांतल्या घड्याळाकडे पाहून सुरिन्टेन्डंटसाहेब म्हणाले. " आतां आठ वाजण्याचा सुमार आहे, आणखी तीन साडेतीन तासांनीं तो येईल, तर त्यापूर्वी आपल्याला त्याला अडकाविण्याची तजवीज करतां येईल. या विचारानें पुंडोबाचा सुगावा लागतांच साहेबांना अत्यानंद झालासें दिसत होतें. माझ्या कामगिरीबद्दल त्यांनीं माझी बरींच प्रशंसा केली व तुला गुप्त पोलिसचें काम उत्कृष्ट येईल म्हणून माझी पाठ थोपटली. शांतीगृहांत पुंडोबा परत येईपर्यंत त्याला कोणत्याहि प्रकारची शंका येऊं नये म्हणून मला विठोबाकडे जाण्याला साहेबांनीं सांगितलें व आपण आपले कांहीं लोक टेहळणीकरितां त्या गृहाच्या आसपास ठेऊं असें ते म्हणाले. विठोबापेक्षां मला पुंडोबाचीच जास्त भीति वाटत होती व साहेबांनी पुंडोबा कशाप्रकारचा मनुष्य आहे हें सांगतांच ती अधिक दुणावली. मी त्यांच्या गुप्त गोष्टींचा कोठें स्फोट केला आहे याची त्याला यत्किंचित् खबर लागतांच तो आपणास काय शिक्षा करील याची मला चांगलीच जाणीव होती. शांतीगृहांतून निघाल्याला जवळ जवळ दोन अडीच तास झाले होते, इतक्या उशिरानें परत शांतीगृहांत जावयाला माझें मन कचरूं लागलें व त्याप्रमाणें मी साहेबांना सांगितलेंहि. " पुंडोबा येईपर्यंत तुला तशी कांहीं भीति नाहीं, आम्ही तुझ्या जीविताविषयीं चांगली खबरदारी घेऊं तूं बिलकूल घाबरूं नको असें जेव्हां साहेब म्हणाले, तेव्हा मी परत जाण्यास कबूल झालों. माझ्या जिवाला जर कांहीं धोका असण्याचा संभव असला तर मला तेथें पाठवूं नये असें शेटसाहेबानी सांगितलें. ती सर्व जबाबदारी आमच्या शिरावर आहे अशी साहेबांनीं हमी घेतली. लागलाच फोन करून त्यांनीं आपल्या कांहीं हुशार व विश्वासु लोकाना साध्या पोषाकांत शेटसाहेबांच्या बंगल्यावर बोलाविलें. ते लोक येईपर्यंत मलाहि जाऊं दिलें नाहीं. कांहीं वेळानें पोलिस लोक आल्यानंतर आम्ही सर्वच बाहेर पडलो. आतां आपला चोरीस गेलेला माल खात्रीनें सांपडला म्हणून समजावें, असें शेटसाहेबांना आश्वासन देऊन आम्ही पांचजण साहेब व त्याचें तीन हस्तक आणि मीं साहेबांच्या मोटारींत बसून शांतीगृहाच्या दिशेने चाललों. गृहाच्या बऱ्याच अंतरावर मोटार उभी करून आम्ही चौघे खालीं उतरलो व तेथून मी गृहांत पायीं जाऊन तें 'गृह'साहेबांच्या हस्तकांनीं दुरून पाहून ठेवावें व पुंडोबा येईपर्यंत त्याच्या आसपास टेहळणी करीत असावें असें ठरलें. साहेब स्वतः ऑफीसमध्यें जाऊन आणखी पोलिस पार्टी घेऊन पुंडोबा येण्याच्या सुमारास गृहांत येणार होतें. मी आमच्या गृहाजवळ आलो तर तेथें एक विक्टोरिया उभी होती. विक्टोरियांत बसून आमच्याकडे येणारे गृहस्थ माझ्या पहाण्यांत आले नव्हते. मालकांनीं उशीर होण्याचें कारण विचारलें तर काय सांगावें याचा मी माझ्या मनाशीं विचार ठरवित होतो. कोणी तरी बडा पाहुणा आला असेल

व त्याची बडदास्त ठेवावयास गृहांत कोणी नाहीं. मालकांचा पाय पोळल्यामुळें त्यांना जागचें हालवत नव्हतें, व मीहि गृहांत नाहीं, म्हणून मालक फार रागावले असतील असें मला वाटूं लागलें. गृहांत येण्यापूर्वी सुपरिन्टेंडन्टसाहेबांच्या सल्लयानें मालकाकरितां औषध घेऊन येण्याला मी विसरलों नव्हतोच. डॉक्टरकडे लोकांची फार गर्दी असल्यामुळें परत यावयाला मला इतका वेळ लागला असें मालकांना सांगण्याचें मी निश्चित केलें.

मी आंत प्रवेश करतांच माझी दृष्टी कोणावर गेली? पुंडोबा समोरच उभे होते. विक्टोरियांतून येणारी व्यक्ति दुसरी तिसरी कोणी नसून पुंडोबांचीच होती! माझें बाहेर जाणें व अद्यापपर्यंत परत न येणे, हें वर्तमान बहुतकरून त्याला विठोबाकडून कळलं असावें. तो पिसाळलेल्या एखाद्या हिंस्र पशुसारखा दिसत होता. माझ्यावर दृष्टी जातांच आपल्या भक्ष्यावर लांडग्याप्रमाणें उडी मारून त्यानें माझ्या हृदयांत एक जोराचा टोला लगावून व माझे दोन्ही हात घट्ट धरून जोरानें हालविले. भयंकर हिसक्यानें माझें हात खांद्यापासून गळून निकामी होतील कीं काय असें मला वाटूं लागलें. तो मला उद्देशून कर्कश स्वरांत म्हणाला.

" हरामखोरा, तूं इतका वेळ कोठें होतास? सांग. सांग. नाहींतर तुझी शंभर वर्षे भरलीच म्हणून समज." माझ्यासमोर प्रत्यक्ष मृत्यूच उभा आहे. व तो आतां आपला प्राण घेतल्याखेरीज कधींहि रहाणार नाहीं, असें मला वाटलें. माझ्या तोंडून शब्दोच्चार होईना! पुनः जोराने मला हालवून तो म्हणाला " बोल, तूं कोठें गेला होतास? कां तुझें नरडें दाबून प्राण घेऊं." पुढचें शब्द पुरे होण्यापूर्वीच त्यानें माझ्या गळ्यावर हात ठेविला. माझी त्यावेळीं काय स्थिति झाली तें सांगणें फार कठीण काम आहे. या जगावरचें आपलें अस्तित्व संपलें अशी माझी खात्री झाली. पुंडोबानें माझ्या गळ्यावर हात ठेविला होता व विठोबा त्याच्या खोलीच्या दारांत बसला होता, विठोबा त्याला असें करूं नको म्हणून सांगत होता. शांतिगृहांत आम्हा तिघाखेरीज गिऱ्हाईकापैकीं कोणीच नव्हतें. माझें भान नष्ट होण्यापूर्वी मला बाहेर शिटी वाजल्याचा अवाज ऐकूं आला. त्याबरोबर पुंडोबाचा माझ्या गळ्यावरचा हात ढीला पडला. हा आवाज कसला आहे हें तो चांगल्याप्रकारें जाणत असावा. कारण त्यानें चटकन मला एकीकडे लोटून तो विठोबाला म्हणाला. " घे विठ्या ! या हरामखोरामुळें आपल्यावर काय प्रसंग आल आहे? त्याला नोकरीस ठेविलास त्याचें फळ भोग आतां." असे म्हणून तोच स्वयंपाकघरांत शिरला व दार आंतून बंद करून घेतलें. माझ्या गळ्यावरचा त्याचा त वज्रासारखा हात निघतांच मी पूर्वस्थितीवर आलों होतों. स्वयंपाकघरांत आपणास कोंडून घेऊन पुंडोबानीं काय शहाणपणा केला? तो इतक्या त्वरेनें मला सोडून कां गेला याचा विठोबास मुळींच अर्थ कळेना! तो वेड्यासारखा त्या बंद दाराकडे पाहूं लागला.

इतक्यांत माझ्या बरोबर असलेले पोलिस अमलदार व त्यांचें हस्तक पुढच्या दरवाज्यांतून आंत आले. पुंडोबा कोठें आहेत म्हणून त्यांनीं मला प्रश्न केला, तेव्हां तो स्वयंपाकाच्या खोलींत जाऊन आंतून कडी लावून बसला आहे असें मी सांगितलें " आंत दुसरें दार, खिडकी आहे कां, " म्हणून त्यांनीं घाई घाईनें मला विचारिलें. आंत गजाच्या दोन खिडक्या आहेत असें माझ्याकडून कळतांच त्यांनी आपल्या दोघां इसमांला जलदीनें मागच्या बाजूला जाण्यास सांगितलें. तसेंच एकाला दार फोडण्याकरिता कोणाला तरी बोलवावयास सांगितलें. दार फोडणार येऊन दाखल झाले. व तें दार उघडण्याचा प्रयत्न करूं लागले. साहेब एकसारखें पुंडोबाला व विठोबाला तोंडानें शिव्या हांसडींत होते व बंद दारावर आपल्या बुटांच्या पायांनीं प्रहार करीत होते. हा काय प्रकार आहे याची आतां विठोबाला चांगलीच कल्पना झाली असावी ! भयानें तो थरथर कांपत होता. त्याच्या सर्वांगांतून घामाच्या धारा वाहूं लागल्या होत्या. पाय भाजल्यामुळें चटकन उठून धावण्याची त्याच्यात ताकद नव्हती. त्यावेळीं त्याची ती दीन मुद्रा पाहून माझ्या धन्याला दगा दिल्याबद्दल मला वाईट वाटल्या वांचून राहिलें नाहीं. घटकाभरानें दार फोडण्याकरिता मनुष्य आल्यानंतर दार फोडण्यांत आलें. परंतु आंत कोण होतें ? एका खिडकीचे दोन गज वांकवून पुंडोबांनीं पोलिस अमलदाराच्या हातावर केव्हाच तुरी देऊन 'यः पलायते ' केलें होतें. पुंडोबा हातांत न सांपडल्यामुळें साहेब विलक्षण चिडले होते. प्रथम त्यांनीं आपल्या हाताखालच्या लोकांना यथेच्छ वाक्‌प्रहार करून नंतर आपला मोर्चा असहाय अशा बिचाऱ्या विठोबावर फिरविला. विठोबाला एक दोन गाली प्रदान देऊन व एक बुटाचा तडाखा लगावून ते म्हणाले "बदमाष, कोठें गेला तुझा साथीदार सांग. नाहीं तर तुला जबर शिक्षा होईल. समजून ऐस." बुटाची लाथ कमरेंत बसल्यामुळें त्या वेदनेनें "आय ! आय !" करीत भयभित व दीन मुद्रेनें तो साहेबाला हात जोडून म्हणालाः—

" म–म–मला का–का–काय माहीत साहेब ? " स्फुंदून स्फुंदून रडूं लागला.

" हरामखोर, तुला माहीत नाहीं तर कोणाला माहीत ? " साहेब अधिक संतापून म्हणाले.

" साहेब–साहेब. मला क्षमा क–" त्याच्याने स्पष्ट उच्चार करतां येईना, त्याच्याकडे पाहून माझ्या अंतःकरणात दया उपजली. शांतिगृहाच्या मागें गेलेले दोघे गृहस्थ निराश होऊन परत आले. पुंडोबा सारखा अट्टल चोर असा सहजासहजीं पोलिसांच्या हातीं लागणें शक्य नव्हतें. जो तुरुंगांतूनही पसार होऊन पोबारा करीत असे, त्याला विठोबाच्या गृहांतून पसार होण्याला कितीसा उशीर लागणार ? कोल्ह्याप्रमाणें त्याला शिकाऱ्याचा वास पुढच्या दाराकडून येतांच त्यानें मागच्या बाजूनें लोखंडी गज सहज वांकवून पोबारा केला. तो हातीं लागणें शक्य नाहीं व त्याच्यामागें विनाकारण माणसें पिटाळण्यांत आतां अर्थ नाहीं हें जाणून साहेबांनीं

विठोबाला गिरफदार केलें. व चोरीस गेलेला माल कोठें आहे म्हणून त्याला धमकी देऊन विचारलें.

" साहेब, साहेब मला माहीत नाहीं. तो त्या पुंड्याजवळच आहे. " असें अगदीं काकुळतीस येऊन विठोबा सांगू लागला. तो अशी दाद देणार नाहीं हें जाणून साहेबांनी पूर्वीपेक्षांहि आतां उग्ररूप धारण केलें. ते त्याच्यावर ओरडून म्हणाले.

" बेवकूब खोटें बोलतोस काय ? पुंड्यानें चोरून तो माल तुझ्याच घरीं ठेविला आहे. सांग कोठें आहे, नाहीं तर तुला आतां चाबकाखालीं चांगला फोडून काढला पाहिजे. " व त्यांनीं आपल्या एका मनुष्यास ओरडून सांगितलें " उमरावखां ! हंटर लाव, ये सालेकु बेदम मारो, हरामजादा झूट बोलता हय ! "

" साहेब, साहेब खरोखरीं मला माहित नाहीं, साहेब. मी गरीब माणूस आहे माझ्यावर दया करा साहेब ! "

" चूप. हरामखोर. असा तूं नाहींच कबूल होणार. आण तो हंटर उमराव, या पाजी माणसाला बडवून काढ आर्धी. " साहेबांचा कोप परमावधीला गेला होता. विठोबाला सर्व कांहीं माहित असतां तो किती खोटें बोलत आहे याचें मला आश्चर्य वाटत होतें. मनुष्याचा लोभ किती अनावर असतो पहा ? पोलिसांच्या हातून आतां आपली सुटका होणे शक्य नाहीं हें माहीत असूनहि विठोबासारख्या भित्र्या माणसाला लोभ सोडीत नव्हता ! खरोखरींच जेव्हां साहेबांनीं चाबूक हातात घेतला तेव्हा भीतीनें गर्भगळीत होऊन विठोबानें आपल्या कमरेच्या शामवर्णी पंचाला खोचून ठेवलेल्या किल्या बोहर काढल्या व साहेबापुढें करीत तो म्हणालाः—

" साहेब. माझा खरोखरींच यांत बिलकूल दोष नाहीं. त्या गाढवीच्या पुंड्याचेंच हें काम आहे. तरी मी त्याला सांगत होतो कीं, मला गरिबाला तुमच्या या भानगडींत घेऊं नका. त्यानें आणि शेटसाहेबांकडे असलेल्या मगनलाल नांवाच्या तरुणानें मला जबरदस्तीनें त्यांच्या कटांत घेतलें. माझी मुळींच खुषी नव्हती असलें काम करायची. मी अद्यापपर्यंत असला वाईट धंदा केला नाहीं मी गरीब माणूस ठार बुडालो. देवा ! देवा ! ! तूंच मला वांचीव आतां ! " त्याच्या हातून किल्या हिसकावून साहेब दरडावून म्हणाले,

" ए, सच्च्या माणसा तुझी बडबड आतां बंद कर आणि चोरलेला माल कोठें आहे तो दाखव पाहूं. तुझी बडबड ऐकण्याला आम्ही आलो नाहीं. " दुःखी चेहरा करून व क्षणोक्षणीं दीर्घ निःश्वास सोडून जवाहीर व नोटांचें पुडकें कोठें होतें तें नाइलाजास्तव विठोबांनीं दाखविलें. त्या समयीं त्याच्या कृष्णमुखावर निराशेची पूर्ण छटा उमटली होती. आयतें येवढें थोरले घबाड प्राप्त झालें असतां त्यात असें अनपेक्षित विघ्न उत्पन्न झाल्यावर कोणाला वाईट वाटणार नाहीं ? मी गरीब आहे, माझा यांत मुळींच दोष नाहीं, पुंडोबा व मगनलाल यांचेंच हें कृत्य आहे, चोरीसारखें निंद्य

कर्म आपण साऱ्या हयातींत कधींच केलें नाहीं, याच वेळीं त्यांना मदत करण्याची कशी दुर्बुद्धि झाली; माझ्यावर दया करा मी पुनः असलें काम कधींच करणार नाहीं." असें तो हात जोडून व दर शब्दाला पुढें मागें साहेब, साहेब, हें पालुपद लावून साहेबाची विनवणी करीत होता. साहेबांनीं त्याला आपल्या लोकांच्या स्वाधीन करून त्यानें सांगितलेल्या जागचा चोरीचा माल काढण्यास दुसऱ्या एकास आज्ञा केली.त्या जुन्या कपाटांत त्या मालाशिवाय आणखीहि बराच माल निघाला. आपल्याला अशा रीतीनें दगा देण्याकरितां हें सर्व पुंडोबांनीं आपल्या मनाविरुद्ध ठेवलें आहे.त्यांत माझा मुळींच भाग नाहीं असें तो म्हणतच होता.सर्व माल पहातां एक लाख चौतीस हजारांच्या नोटांऐवजीं एक लाख तेहतीस हजाराच्याच नोटा होत्या. एक हजाराच्या नोटा गहाळ झाल्या होत्या त्याविषयीं चौकशी करतां विठोबा अगदीं घाबरून म्हणाला कीं मी त्याला हात लावला नाहीं.'त्या पुंडोबानेंच ठेविल्या आहेत,'त्याच्याजवळून अधिक कांहीं निष्पन्न होण्याची आशा नाहीं हें जाणून साहेब विठोबासह तो सर्व माल घेऊन पोलिसठाण्यावर गेले. चोरीच्या कामांत मुख्यत्वेकरून मगनलालचें अंग आहे हें जाणून त्याला धरण्याचें वारंट घेण्याकरिता ते कमिशनरसाहेबाच्या बंगल्यावर गेले. मीहि त्यांची रजा घेऊन शेटसाहेबांच्या बंगल्यावर गेलों. इतके सर्व होण्याला रात्रीचे साडे दहा वाजून गेले होते. शेटसाहेबाना घडलेली सर्व हकीकत मी सांगितली. चोरी सांपडल्याबद्दल त्याना विलक्षण हर्ष झाला होता! त्यानीं प्रेमानें माझा हात धरून गद्गद वाणीनें म्हटलें. "चिंतामणी, तुझ्या या कामगिरीबद्दल मी तुझे किती व कसें आभार मानूं? माझ्या कुटुंबाचेंच नव्हे तर माझ्या प्राणापेक्षांहि प्रिय अशा अब्रूचें आज रक्षण केलें आहेस." हर्षातिरेकानें त्यांचा कंठ भरून आला व त्यांना पुढें बोलवेना. माझी त्यांनीं केलेली स्तुति ऐकून मला लज्जेनें खालीं मान घालावी लागली.माझ्या हातून शेटसाहेबाची अल्प सेवा झाली त्याचा मला मनांतून आनंद वाटत होता. शेटसाहेबाविषयीं मला नेहमीं पूज्यभाव वाटत असे. त्यांच्या या वेळच्या निरभिमानी भाषणानें माझी त्यांच्याविषयींची पूज्यता द्विगुणित झाली.

---

### स्मृति विसावी.

## विठोबाची जबानी.



चोरीचा माल सांपडून आपल्या अब्रूचें रक्षण झालें, त्यामुळें शेटसाहेबांना जेवढा आनंद झाला, तेवढेंच मगनलालला पोलिसाकडून पकडसमन्स येणार आहे हें ऐकून त्यांनी आपल्या मनाशीं कांहीं तरी निश्चय केला. एका नोकरास बोलावून मगनलालला तेथें बोलावून आणलें. मला तेथें पाहून मगनलालला काय वाटलें असेल? शेटसाहेब

एका खुर्चीवर बसून बाहेर शून्यपणें पहात होते. मगनलाल आला तरी त्यांचें लक्ष त्याचेकडे गेलें नाहीं. मगनलालचा चेहरा काळवंडलेला दिसत होता. कांहीं दिवसांपूर्वी मी त्याला विठोबाच्या येथें दाराच्या फटींतून पाहिलें होतें, त्यापेक्षांहि आज त्याच्यांत बराच फरक पडलेला माझ्या दृष्टोत्पत्तीस आला.त्याच्या नेत्रांतली विलक्षण चमक आज निस्तेज दिसत होती. बाहेरून थंडगार वारा अंगाला झोंबून जात होता, तरी त्याच्या कपाळावर धर्मबिंदू चमकत होते. आपल्या कंप पावणाऱ्या हातानें एका खुर्चीला टेंकून त्यानें आपला तोल सांभाळला होता.घोगऱ्या स्वरांत तो शेटसाहेबांना म्हणाला " मला कां बोलावलें ? "

विचारतंद्रींतून अकस्मात् जागृत झाल्यामुळें शेटसाहेब जरा चमकले व त्यांनीं मागें पाहिलें ! मगनलालवर दृष्टी जातांच पुनः पूर्ववत् ते पाहूं लागले व मगनलालला उद्देशून म्हणालेः—

" तुला जर स्वतःचा बचाव करावयाचा असला तर तूं शक्य तितक्या लवकर मुंबई सोडून चालता हो. प्रामाणिकपणानें स्वतःचा निर्वाह करतां यावा म्हणून तुला मी जी ही रक्कम देत आहे, ती तुला दोन वर्षेपर्यंत पुरण्यासारखी आहे. पुढें तरी आपले वर्तन सुधारून प्रामाणिकपणानें वागत जाशील तर तुझें त्यात कल्याण आहे !" इतकें बोलून त्यांनीं दोन हजारांच्या नोटा मगनलालपुढें टाकल्या. त्याचा कंठ सद्गदित झाला होता. ते पुढें म्हणाले, " जा. तुझ्यावर मी तुझ्या बाळपणापासून पुत्रवत् प्रेम करीत आलो, त्यामुळे तुझ्यावरसंकट येऊं नये अशी माशी इच्छा आहे. जा.तूं लवकर निघून जा.आतां पोलिसचें धरणें तुला येईल.तूं मुंबई सोडून जा." शेटसाहेबांच्यानें अधिक बोलतां येईना. त्यांनीं आपलें तोंड फिरावलें होतें; तरी पण त्यांच्या अंतःकरणाला किती पीळ पडत होता हें समजत होतें.पोलिसचें नांव ऐकतांच मगनलालच्या मुखावर कृष्णवर्णाची छटा पसरली व त्याचें शरीर झंजावातांत हालणाऱ्या केळीप्रमाणें कंप पावूं लागलें. शेटसाहेबांना मुळींच उत्तर न करतां त्यानें खालीं पडलेल्या नोटा उचलल्या व माझ्याकडे एक तीव्र दृष्टिपात करून तो खोलींतून बाहेर पडला. चालतांना त्याचें पाय अडखळत होते. तो गेल्यावर किती तरी वेळपर्यंत शेटसाहेब निःस्तब्धपणें दीर्घश्वासोच्छ्वास सोडीत बसले होते. मीहि एकाग्रतेनें त्यांच्याकडे पहात निश्चल असा एका कोपऱ्यांत खुर्चीवर बसून राहिलो होतो ! मगनलालने जो नीच दुष्टपणा करून शेटसाहेबाशीं प्रतारणा केली होती;त्याबद्दल त्यास जबर शिक्षा होईल तर बरें. असें मला वाटत होतें. परंतु शेटसाहेबांचे हृदय माझ्या एवढें क्षुद्र नव्हतें. मगनलालवर ते अद्यापपर्यंत पुत्रवत् प्रेम करीत आले होते, त्याच्यावर विपरीत प्रसंग येऊं नये अशी त्यांची इच्छा होती.

अशा स्थितींत कांहीं काल गेल्यावर पोलिसचे शिपाई मगनलालला धरण्याकरितां आले. पोलिस अमलदारानें मगनलालला पकडण्याचें वारंट आणलें होतें; ते शेटसाहे-

बांना दाखवून मगनलालला आपल्या स्वाधीन करण्याविषयीं सांगितलें. पोलिसांना त्यांना अटकाव करतां येईना, त्यांच्याकडून परवानगी घेऊन पोलिस मगनलालच्या खोलींत त्याला पकडण्याला गेले, परंतु तो तेथें नव्हता, त्याचें सर्व सामान जागच्या जागींच असून मगनलाल मात्र तेथें सांपडला नाहीं. तेव्हां सर्व बंगला तपासण्याची परवानगी त्यांना शेटसाहेबांजवळून घ्यावी लागली व शेटसाहेबांस ती देणें भाग पडलें.

ज्या बंगल्यांत पूर्वी आनंदाचें साम्राज्य नांदत होते, तो बंगला आज अगदीं शून्याकार भासत होता, सर्वांचे चेहरे काळजीनें आणि भयानें व्यापले होते. पोलिस बंगल्याचा कोपरा न् कोपरा धुंडाळीत होते; खालीं कोठेंच पत्ता लागला नाहीं तेव्हां पोलिसचे लोक वर जाऊं लागले, त्यांच्यामागे शेटसाहेब व त्यांच्या मागें मी अशारीतीने आम्ही माडीवर गेलो. प्रथम मणीबेनच्या खोलींत त्यांनी तपास केला व नंतर ते मोटीबेनच्या खोलींत गेले. आम्हीहि बरोबर होतोच. मोटीबेन अजारी असून आपल्या पलंगावर निजली होती; व मणीबेन तिची शुश्रूषा करीत होती. मोटीबेनचें अस्थिचर्म शिल्लक राहिलें होतें. ती अगदीं कृश झाली होती. मोटीबेन म्हणून मला ओळखण्यास कठीण गेले. घटकोघटकी तिला खोकल्याची उभळ येऊन ती अगदीं कासावीस होत असे. आम्ही आंत गेलो, त्यावेळीं दरवाजाकडे तिची पाठ होती व मणीबेन तिच्याजवळ एका खुर्चीवर बसली होती. आम्हाला पहातांच मणीबेन पुढें आली व हें काय प्रकरण आहे म्हणून हालक्या अवाजांत आपल्या पित्याला विचारूं लागली. शेटसाहेबानीं थोडक्यात तिला सर्वहकीकत सांगितली. शेटसाहेब अगदीं हळुहळु बोलत होते तरी ते मोटीबेनला कसें कळलें कोणास ठाऊक? तिनें आपलें तोंड फिरवून खोल स्वरांत मणीबेनला हांक मारली. मणीबेन तिच्याजवळ जातांच ती घाबऱ्याघाबऱ्या म्हणाली. " मणी, कोण आलं आहे ? मगनलाल कुठं आहे ? " मणीबेननें तिला उत्तर देण्यापूर्वीच तिची नजर दाराबाहेर अडलेल्या पोलिस अमलदारावर गेली व तिने एकदम किंकाळी फोडली. शेटसाहेब व मी धांवत पलंगा - जवळ गेलो, ती बेशुद्ध पडली होती ! डॉक्टरला बोलावून आणण्यास शेटसाहेबांनीं मला सांगितलें. मगनलालचा कोठेंच पत्ता न लागल्यामुळें पोलिस अमलदार आले तसेंच परत गेले.

अलीकडे सहा सात महिन्यांत मोटीबेनची प्रकृति अस्वस्थ होती. दोन महिन्यापासून तर तिला जागचें हालतांहि येईना, तिला क्षय झाला होता व चांगल्या हवेवर डॉक्टरने तिला ठेवण्यास सांगितलें होतें. परंतु घर सोडून आपण दुसऱ्या कोठेंहि जाणार नाहीं असें तिनें निक्षून सांगितल्यावर तिच्या मर्जीविरुद्ध तिला दुसऱ्या स्थळीं नेण्यांत आलें नाहीं. मुंबईतल्या नामांकित डॉक्टरांचे औषधोपचार चालू होते, पण तिला कशानेंहि गुण न येतां दिवसोंदिवस तिची प्रकृति अधिकाधिक खगत चालली. शेटसाहेबांचें आपल्या या कन्येवर अतिशय प्रेम होतें. मोटीबेन

आजारी पडल्यापासून मणीबेनच तिची सेवाशुश्रुषा करीत होती. त्यावरून आपल्या भगिनीवर तिचेंहि किती प्रेम होतें हें कळत होतें. पोलिसांच्या हातीं मगनलाल न सांपडल्यामुळें शेटसाहेबांना एकप्रकारचें समाधान वाटलें. विठोबाला पकडून पोलिस-ठाण्यावर नेल्यानंतर मला पुनः कोठें जावें हा विचार पडला. कारण शेटसाहेब त्यांच्याच धादलींत असतां त्या संबंधानें त्यांनीं मला कांहींच विचारलें नाहीं, व त्यांनीं होऊन गोष्ट काढल्याखेरीज मला विचारावयाला शरम वाटूं लागली. मोटीबेन आज विशेष आजारी असल्यामुळें शेटसाहेबांचें लक्ष ठिकाणावर नव्हतें; तेव्हां आपण आपली कांहीं तरी व्यवस्था करावी असा विचार करून मी तेथून जाण्याच्या विचारांत होतो. मला दुसरे कोठेंहि स्थळ नव्हतें व तेथें राहणेंहि योग्य वाटेना अशा पेचांत मी पडलो! माझी चलबिचल ओळखून शेटसाहेब माझ्याजवळ येऊन व माझा हात आपल्या हातांत घेऊन म्हणाले. "चिंतामणी, तुझ्या मनांत काय विचार चालला आहे हे मी ओळखलें आहे. तूं आजपासून पुनः माझ्याच येथें रहात जा. तुला मीं माझ्या मोहनसारखा समजतो, मगनलाहि मी माझाच समजत होतो, परंतु त्याला अशी का बुद्धि झाली ईश्वर जाणे?" येथें त्यांनीं एक दुःखपूर्ण निःश्वास सोडला. "त्याला मीं लहानाचा मोठा केला असता त्यानें मला असा दगा दिला! आणि तूं आमचें येथें अगदीं थोडे दिवस राहिला असून मला मोठ्या संकटातून वाचाविलेस, यापुढें तुला मी दुसऱ्या कोठेंहि जाऊं देणार नाहीं. तूं माझ्यावर जे उपकार केले आहेस, त्याबद्दल मी तुझ्यासाठीं काय करूं साग? चिंतामणी! तूं राहिल्यानें माझ्या मोहनलाहि फार आनंद होईल. तुझी इच्छा असेल ती मला सांग." मी काहींच उत्तर केले नाहीं. शेटसाहेब माझी प्रशंसा करीत असता मी खालीं मान घालून निःस्तब्ध उभा होतो, त्याना काय उत्तर द्यावे हेंच मला कळेना! मी कांहीं बोलत नाहीं हें जाणून शेटसाहेब पुनः बोलूं लागले,

"चिंतामणी, ज्या नोटीच्या भानगडीमुळें तूं आमचें घर सोडून गेला होतास त्याचे तर आता काहींच कारण उरलें नाहीं. मला प्रथम तुझी शंका आली होती खरी; परंतु जें दिवशीं तूं निघून गेलास तेंच दिवशीं संध्याकाळीं मी घरीं आल्यावर तुझें पत्र वाचलें व क्षणभरानें मला नोटहि सांपडली. तुझ्याबद्दल विनाकारण शंका घेतल्याबद्दल मला फार वाईट वाटलें व मी तुझा पुष्कळ तपास केला पण कोठेंच पत्ता लागला नाहीं. तुझ्या हातून आमचा माल सांपडावयाचा होता म्हणूनच तुला आमचें घर सोडण्याची बुद्धि झाली, असेंच म्हटलें पाहिजे!" इतकें बोलून ते स्तब्ध राहिले. मला पडल्या फळाची आज्ञा पाहिजेच होती; मी त्या दिवसापासून पुनः शेट साहेबांच्याकडे राहूं लागलो. ते माझ्याशीं पूर्वीपेक्षांहि प्रेमानें वागूं लागले व मला सलगीच्या एकेरी नावानें संबोधूं लागले. मलाहि आतां त्यांच्या बंगल्यांत पूर्वीपेक्षां विशेष मोकळेपणा वाटूं लागला. मोटबिनेची तब्बेत जास्त बिघडल्यावरून अमदाबादेस मोहनलाल व त्याची आई यांना लवकर निघून येण्यास शेटसाहेबानीं तार

केली. या दुखण्यांतून मोटीबेन जगणार नाहीं असें डॉक्टरनें भविष्य केलें होतें; व तें त्याचें भविष्य अखेरीस खरें ठरलें! मोहनलाल व त्याची आई येण्या पूर्वीच मोटीबेननें आपल्या प्रेमळ पित्याला व भगिनीला दुःखसमुद्रांत् लोटून स्वर्गलोकाचा रस्ता धरला! तिच्याबरोबर तिच्या चरित्राचाहि अंत झाला. कन्येच्या मृत्युमुळें शेटसाहेबांस फार दुःख झालें! त्यानंतर कित्येक दिवस त्यांचे मन अगदीं अस्वस्थ होतें!

पुंडोबा व मगनलाल फरारी झाल्यामुळें एकट्या विठोबावर चोरीचा खटला चालला होता. पुंडोबा व मगनलाल या दोघांनीं एकविचार करून ही चोरी केली, आपण फक्त आपल्या घरांत चोरीचा माल ठेविला, एवढांच गुन्हा केला, या गुन्ह्याबद्दल दयाळू सरकारनें आपल्यावर कृपा करावी, या पुढें आपण असला गुन्हा पुनः करणार नाहीं. म्हणून तो शपथपूर्वक सांगत होता. चोरी कशी केली व पुंड्यासारख्या महाठगाने इतका मोठा माल स्वतः जवळ न ठेवितां तुझ्या जवळ कसा दिला, हें जर खरेंखरें तूं सागशील, तर तुला आम्ही सोडून देऊं, असें साहेबांनीं त्याला मधाचें बोट लावताच त्यानें ती हकीकत पुढीलप्रमाणें सांगितली.

पुंडोबाची व मगनलालची जुगारीच्या अड्यांत गांठ पडून मैत्री जमली. पुंडोबा अट्टल जुगारी असल्यामुळें दर खेपेला मगनलाललाच हार खावी लागे. पुंडोबाची बरीच रक्कम कर्ज म्हणून मगनलालकडे झाली व त्याबद्दल तो मगनलालला तगादा लाऊं लागला. मगनलालजवळ तेवढी रक्कम नसल्यामुळें तो त्याला नेहमीं वायदे करूं लागे. त्याच्या जवळ पैसे नाहींत तें पुंड्याला कळून चुकलें. मगनलाल ज्या शेटकडे आहे त्याची एक मोठी बँक आहे व बँकेच्या तिजोरीच्या किल्या शेटसाहेबाजवळ असतात, असें मगनलालच्या सांगण्यावरून पुंडोबाला कळताच ती तिजोरी फोडून त्यातली बरींच मोठी रक्कम लांबविण्याची सल्ला त्यानें मगनलालला दिली. प्रथम एवढीं मोठी चोरी करण्याचें मगनलालला धारिष्ट होईना. परंतु पुंड्यानें त्याचें मन तयार केलें व व तुला असें करण्याला धीर होत नसला तर मी तें काम सहज करीन. मला तिजोरीची किल्ली मिळाली पाहिजे, निदान ती कशाप्रकारची आहे हे जरी कळलें तरी आपण दुसरी व्यवस्था करूं. तसेंच चोरीचा आळ परस्परें 'कॅशरवर' जाईल. शेटसाहेबावर कांहीं किटाळ येणार नाहीं, व तो पैसा त्यांचाहि नाहीं. अशारीतीनें त्यानीं प्रथम बेत केला होता; व तो त्यांचा बेत मला पुंड्यानें सांगितला होता. असें साहस न करण्याविषयीं मी पुंड्याला पुष्कळ सांगून पाहिलें, पण त्यानें माझें बिलकुल ऐकलें नाहीं. त्यानंतर एके दिवशीं रात्रीं पुंड्या व मगनलाल आपल्या बिऱ्हाडीं आले व बँकेच्या चोरीचा बेत त्यांनीं रहीत करून, शेटसाहेबांच्या बंगल्यावरच त्यांच्या तिजोरींत असलेल्या जवाहीराची चोरी करण्याचा बेत केला. अडीच तीन लाखाचें जवाहीर आज शेटसाहेबांच्या तिजोरींत आहे असें मगनलालनें सांगताच त्यावरच हात मारण्याचा पुंड्यानें

बेत केला. शिवाय एकलाख चौत्तीस हजारांच्या नोटा बँकेंत भरावयाच्या होत्या त्या बँक बंद झाल्यामुळें व दुसरें दिवशीं रविवार असल्यामुळें शेठसाहेबांच्या तिजोरींतच असल्याचें मगनलालनें सांगितलें. हा एवढा मोठा लाट सोडून बँकेंत जाण्याचें काहीं कारण नाहीं असें पुंडोबाचें म्हणणें पडलें. परंतु ज्या खोलींत ती तिजोरी होती त्याच खोलींत शेटसाहेब स्वतः निजत असून तिजोरीच्या किल्ल्या त्यांच्याजवळ असतात असें मगनलालकडून त्याला कळलें. शेटसाहेबांच्या बंगल्यांत कोणकोण माणसें आहेत, त्याचा बंगला कशा प्रकारचा आहे, कोणत्या खोलींत कोण निजते वगैरे सर्व बारीकसारीक माहिती पुंड्यानें विचारून घेतली. शेटसाहेबांची पत्नी व मुलगा अमदाबादेस गेल्याचें व एक मुलगी अजारी असून दुसरी तिच्या शुश्रूषेंत गुंतली आहे अशी एकंदर स्थिति असल्यामुळें त्यांच्या कामाला ती फायदेशीरच होती. अमुक दिवशीं कारभारीसाहेब ते जवाहीर घेऊन जाणार आहेत हें मगनलालला माहीत असल्यामुळें शनिवारच्या रात्रीं आपला कार्यभाग उरकून घेण्याचें त्यांनीं नक्की केलें. मगनलाल आजारी असल्याचें त्याने ढोंग करावें ही युक्ति पुंड्याचीच होती. शनिवारीं रात्रीं बंगल्यात चोहींकडे सामसुम झाल्यावर मगनलालनें त्याच्या खोलीच्या दक्षिणबाजूच्या खिडकींत एक दिवा ठेऊन सामसुम झाल्याची खूण करावी. नंतर त्याच खिडकींतून मगनलालनें एक दोरी सोडावी व दिवा मालवून टाकावा. दोरीच्या साह्याने पुंडोबानें मगनलालच्या खोलींत प्रवेश करून घ्यावा. मगनलालची खोली बंगल्याच्या दक्षिणभागाला शेंवटीं असल्यामुळें पुढच्या बाजूच्या पहाऱ्यावरच्या भय्याच्या नकळत त्याला मगनलालच्या खोलींत सहज जातां आलें. बंगल्यांत प्रवेश झाल्याबर मगनलालच्या साह्यानें शेटसाहेबांच्या धाकट्या मुलीच्या खोलींतून शेटसाहेबाच्या खोलींत त्यानें प्रवेश केला. शेटसाहेबाची वडील मुलगी अजारी असल्यामुळें त्यांची धाकटी मुलगी आपल्या बहिणीच्या खोलींत निजत असें व तिची खोली रीकामी असून ती शेटसाहेबाच्या खोलीजवळ होती. शेटसाहेब आपल्या आजारीं मुलीची रात्रींतून विचारपूस करावयाला एकदोन वेळ येत व खोलीचें दार उघडेंच ठेवित असत हें मगनलालला माहित होतें. त्याचा फायदा घेऊन पुंड्या निर्विघ्नपणें खोलींत शिरला. त्यानंतर शेटसाहेबांना बिलकुल चाहूल न लागूं देतां त्यानें मोठ्या चातुर्यानें त्यांच्या उशाखालच्या तिजोरीच्या किल्ल्या काढून त्यानें तिजोरी उघडून आंतला माल काढून घेतला व खोलीच्या दाराजवळ उभा असलेल्या मगनलालच्या हातीं दिला. नंतर त्यानें तिजोरी लावली, पण त्याच वेळीं शेटसाहेब जागे झालेसें त्याला वाटलें म्हणून घाईघाईनें तिजोरी बंद न करतां ती उघडी राहून गेली तें त्याच्या लक्षांत त्यावेळीं आलें नाहीं. नंतर तिजोरीच्या किल्ल्या पूर्ववत जागेवर ठेऊन दिल्या. पुंड्या मगनलालच्या खोलींत आल्यावर त्यानें मगनलालला असें सांगितलें कीं हा माल सध्यां मी माझ्याजवळ ठेवितो, कारण वेळप्रसंगीं बंगल्यावर जर पोलिसांनीं तपास केला तर तेथें असल्यास

आयतांच त्यांच्या हाती लागेल. ती गोष्ट मगनलालला पसंत पडली. मगनलाल आजाऱ्याचें ढोंग करून पडला असल्यामुळें लागलेंच दुसऱ्या दिवशीं त्याला बंगल्याबाहेर पडता येणार नाहीं. या गोष्टीचा फायदा घेऊन दुसऱ्या दिवशीं पुंड्या तो सर्व माल घेऊन पसार होणार होता व तो तेवढ्यासाठीं रोजच्यापेक्षां शांतीगृहांत लवकर आला होता. चोरीची बातमी इतक्या लवकर फुटेल असें त्याला वाटलें नाहीं. तिजोरी उघडी राहिल्यामुळें ती गोष्ट शेटसाहेबांच्या लागलीच लक्षांत येऊन ती हां-हां म्हणता चोहींकडे पसरली होती. आपल्या हातून तिजोरी उघडी राहिली हा फार मूर्खपणा झाला असें पुंड्याला वाटूं लागलें. ती गोष्ट त्याच्या पूर्वीच लक्षांत येती तर तो चोरी केल्यानंतर एक क्षणभर देखील मुंबईंत राहिला नसता. एवढी मोठी चोरी करून त्याला पोलिसच्या डोळ्यांत चांगली धुळ उडवावयाची होती; परंतु त्याचा असा शेंवट झाला ! आपल्याजवळ तो माल पुंड्यानें ठेवावयास दिला, त्याचें कारण त्याला नेहमी पोलिसांचें भय वाटत असल्यामुळें, तो एके जागीं स्थीरपणें कधींच राहात नसे. यत्किंचित संकट दिसतांच तो तेथून पलायन करीत असे. म्हणूनच त्यानें तो माल माझ्या येथें ठेविला होता". इतकी हकीकत विठोबानें सांगितली. आपल्यावर दया करण्याविषयी त्यानें डोळ्यांत आसवे आणून कोर्टाची विनंती केली. परंतु त्याच्या विनंतीचा कांहीच परिणाम न होऊन चोराला मदत केल्यावरून त्यांना तुरुंगवासाची शिक्षा झालीच. आपल्या साथीदाराचा आपल्या सुटकेच्या आशेनें त्याने अशारीतीने विश्वासघात केल्याबद्दल त्याला जी शिक्षा झाली ती योग्यच होय! विठोबा किती भितरा व आपमतलबी होता हें वरील त्याच्या जबानीवरून कळण्यासारखें आहे. चोरी सांपडल्याबद्दल पोलिस बहाद्दरांची सर्वत्र वाहवा झाली! पुंडोबासारख्या बिलंदराच्या हातून मोठ्या चातुर्यानें पोलिस अमलदारानें माल पकडला, याबद्दल सरकारांतून त्यांना बढती मिळण्याची वदंता होती. माझ्या नांवासंबंधानें कोठेंच कांहीं ऐकूं आलें नाहीं व माझे नाव प्रसिद्ध व्हावे अशी माझी मुळींच इच्छा नव्हती. शेटसाहेब एका मोठ्या काळजींतून मुक्त झाले, त्यामुळें मला जितका आनंद वाटला, तितका सरकारच्या कोरड्या शाबासकीनें झाला नसता !



## स्मृति एकविसावी.

# पुनः शाळेंत.

---:o:---

मोटीबेनच्या मृत्युनंतर दुसऱ्याच दिवशीं मोहनलाल व त्याची आई अमदाबादेहून आले. मोटीबेनच्या मरणाचें त्यांनाहि फार दुःख झालें. मोहनलालचें आपल्या बहिणीवर फार प्रेम होतें. ती मरण पावली याचें त्याला जेवढें दुःख झालें; तेवढाच मला

परत आलेला पाहून आनंद झाला.तो आल्यापासून क्षणभरहि माझ्यापासून दूर होईना. तो म्हणे, "तुम्ही पुनः एखादे वेळेस असेंच पळून जाल."मोटीबेन निवर्तल्यामुळें घरांत बरीच अस्वस्थता माजून राहिली होती. मोहनलालच्या आईला किंवा मणीबेनला तिच्यासारखी टापटीप ठेवितां येत नव्हती. सुंदरलालशीं मणिबेनच्या लग्नाचें नक्की झालें होतें; व त्याचा विवाह यापूर्वीच होणार होता; परंतु मध्यंतरी चोरीची भानगड उपस्थित झाली व पुढें मोटीबेन निवर्तली, तेव्हां विवाह होण्याचें जरा लांबणीवर पडलें. मगनलाल गेला त्याचा पत्ता लागला नाहीं. घरांतली एकंदर कारणें मनाला अस्वस्थता उत्पन्न करण्यासारखी असल्यामुळें प्रथम कांहीं दिवस शेटसाहेबांचें मन ठिकाणावर नव्हतें. ते बहुतेक वेळ कांहीं तरी विचारांत असत. त्याच्या स्वभावांतील पूर्वीचा तो आनंदीपणा पार नाहींसा झाला होता!

पूर्वीप्रमाणेच मी शेटसाहेबांच्या येथें राहूं लागलो. ती मंडळी पूर्वीपेक्षाहि माझ्यावर अधिक प्रेम करूं लागली. हल्ली मला काहींच काम नसल्यामुळें माझ्या मनाला हुशारी वाटत नव्हती. खाण्यापिण्याची अगर कपड्यालत्त्याची मला कसलीच काळजी नव्हती; तरी रिकामपणांत दिवस निरर्थक व्यय करणें मला पसंत नव्हतें; कोठें तरी नोकरीधंदा करावा असें मला फार वाटत होतें, परंतु आतां नोकरीसंबधानें शेटसाहेबाजवळ गोष्ट काढण्यास माझें मन तयार नव्हतें. एक वेळ त्यांनीं लावून दिलेल्या नोकरीचा काय परिणाम झाला हें ते जाणत होते. दिवसाचा बहुतेक भाग मोहनलालच्या संगतींत कसा तरी काढावा; पण रात्रीं मला बिलकूल चैन पडत नसे. शेटसाहेबांच्या उदारपणाचा फायदा घेऊन आपण अशाच स्थितींत जन्मभर रहावें काय? कांही तरी उद्योग केल्यावाचून दुसऱ्याच्या जिवावर स्वस्थ बसून राहणे मला आवडत नव्हतें. कांहीं तरी करावें अशी रात्रंदिवच मनाला तळमळ लागून राहिली होती. कोणत्याच गोष्टींत मनाला आनंद वाटत नव्हता. मी लहानपणापासून एकंदर अशा वातावरणांत वाढलो होतो कीं, ज्या वयांत मुलें निष्काळजीपणानें हंसून खेळून आपला काळ आनंदांत घालवितात, त्या वयांत मला अकालीं गंभीरपणा प्राप्त झाला होता; व भविष्यकाळचे दिवसहि गंभीरपणाला पोषक असेंच येत गेले होते. आपण आपला स्वतःचा चरितार्थ चालवावा असें मला वाटत असें.

एके प्रसंगीं मी अशाच विवंचनेंत चूर होतो. मोहनलालच्या खोलींत मी माझें कधींहि विश्रांती न पावणारें जड मस्तक माझ्या हातावर ठेवून भविष्यकाळाविषयीं विचार करीत बसलो होतो. शेटसाहेब तेथें केव्हां आले हें मला कळलें नाहीं. अगदीं माझ्याजवळ येऊन माझ्या खांद्यावर हात ठेऊन ते म्हणाले,

" चिंतामणी, कसला विचार करीत आहेस ? " त्यांच्या त्या प्रेमळपणाच्या वर्तनानें माझें हलकें झालेलें हृदय भरून आलें, माझ्या नेत्रांत चटकन् अश्रुबिंदु उभे राहिले. माझी झालेली चमत्कारिक स्थिति त्यांच्या नजरेस येऊं न देण्याचा मी प्रयत्न

करीत होतो. मी उठून उभा राहिलो व त्यांना कांहींच उत्तर न देतां खालीं पाहूं लागलो, शेटसाहेबच पुढें म्हणाले,

"आमच्या घरीं तुला अद्यापिहि परकेपणा वाटतो कां? तुझी कांहीं तरी व्यवस्था करावी असें माझ्या मनांत आहे! इतके दिवस माझें चित्त ठिकाणावर नसल्यामुळें मला कशांतच लक्ष लागत नव्हतें, परंतु अशी स्थिति किती दिवस चालणार? ज्या गोष्टी घडल्या त्यासंबंधीं आपण कितीहि विचार अगर दुःख करीत बसलो तरी होणार भविष्य टळत नाहीं. हं! असो. झालें तें झालें!" दीर्घ निःश्वास सोडून क्षणभर ते स्तब्ध राहिले. नंतर म्हणाले, "चिंतामणी! काय केलें असतां तुला बरें वाटेल सांग, तुला जें सांगायचें असेल तें स्पष्ट सांग.असा घुटमळूं नकोस? तूं माझ्या मोहनसारखा आहेस असें मी एकदा म्हणून दाखविलें आहे अधिक सांगण्याची जरूर नाहीं "आतां किंचित मला धीर आला.अगदीं हळूच मी म्हणालो,

"असें रिकामपणात बसण्याचा मला कंटाळा आला आहे, कांहीं तरी उद्योग करावा असें मला मनापासून वाटते, जर मला कोठें एखादी पूर्वीसारखी लहानशी नोकरी मिळाली तर बरें होईल."

"अद्यापिहि तुला नोकरी करायची हौस आहेच काय? विठोबासारख्या ठगाच्या येथें नोकरीस राहिल्यानें तुझ्यावर काय प्रसंग आला होता याचें विस्मरण झालें वाटतें?" थट्टेच्या स्वरात ते म्हणाले. इतक्या दिवसात अशी थट्टा करून हंसतांना मी आजच त्यांना पाहिलें. "इतक्या वयापासून स्वतःचें पोट आपणच भरावें अशी तुला घमेंड आहे. होय ना? पण छे! तुला कोठेंहि नोकरी न लावून देण्याचा मी निश्चय केला आहे. एकदा मी तुला माझ्या बँकेंत ठेविला असता एका नोटीला घाबरून तूं पळून गेलास! तेव्हा यापुढें तुला कोठेंहि नोकरीस न ठेवणेंच चांगलें." ते माझ्याकडे पाहून हंसत होते. मी मात्र लाजेनें तोंड खालीं केलें तें वर करण्यास मला धीर होईना, माझी झालेली स्थिति त्यांच्या लक्षांत येऊनच कीं काय ते म्हणाले,

"काय? चिंतामणी? तुला कांहीं विद्याभ्यास शिकण्याची इच्छा आहे कां या वयापासून नोकरींत जखडून घ्यायचें आहे?" त्यांच्या याप्रश्नानें मी अगदीं चकित होऊन गेलो! माझी आणि विद्येची यापुढें जन्मांत कधीं तरी गांठ पडणें शक्य होतें काय? ज्यावेळीं मी माझ्या पित्याच्या गृहाचा त्याग केला, त्यावेळेपासून मी शिक्षणाला आंचवलोच होतो? यापुढें विद्यादेवीच्या साम्राज्यांत आपला कधींहि शिरकाव होणार नाहीं अशी माझी पक्की खात्री होती! शेटसाहेबांच्या वरील सवालानें मी मूढासारखा निश्चलपणें त्यांच्या मुखाकडे पहात राहिलो! मला पुनः त्यांनीं तोच प्रश्न केला तेव्हा कोठें मी भानावर आलो व अडखळत म्हणालो,

"विद्या शिकण्याची तर माझी फार फार इच्छा आहे. परंतु-"

"परंतु काय! माझीहि इच्छा तीच आहे कीं यापुढें तूं नोकरी धंद्याच्या मागें न



शेः—काय ? चिंतामणी ? तुला कांहीं विद्याभ्यास शिकण्याची इच्छा आहे कां—
प्र० २१ वें. (पृ० १२६ )

लागतां विद्याभ्यास करावास, अद्याप तूं कांहीं फार मोठा झाला नाहीस ! स्वतःच्या कुटुंबच्या पोषणाची तुला काळजी नाहीं. तुला स्वतःची एकट्याचीच काळजी आहेना ? आपणास शिकण्याच्या कामी कोण मदत करील अशी तुला चिंता वाटते काय ? ती सर्व व्यवस्था करण्याला मी तयार आहे; मग तुला कसली काळजी आहे ? उद्यांपासून तुझी व्यवस्था लावून देतो, पण तुझी मर्जी आहे कां ? ''

अहाहा ! त्या वेळीं मला केवढा आनंद झाला म्हणून सांगूं ! हर्षातीरेकानें माझ्या मुखांतून शब्दोच्चार होईना ! माझें हृदय कृतज्ञतेनें भरून आलें, नेत्रांत आनंदाश्रु गर्दी करूं लागले ! शेटसाहेबांना काय उत्तर द्यावें व आपला आनंद कसा व्यक्त करावा हें मला सुचेना ! मी क्षणभर स्तब्ध उभा होतो. माझ्या चेहऱ्यावरचें झालेलें परिवर्तन पाहून शेटसाहेबांसहि फार समाधान वाटलेसें दिसलें. त्यांनी आपल्या प्रेमळ हातांत माझा थरथरणारा हात धरून म्हटलें,

" हें पहा ! चिंतामणी, मी तुला इंग्रजी शाळेंत दाखल करणार आहे पण ते एका अटीवर बरें कां ? माझी अट तुला कबूल असली पाहिजे ? '' त्यांची अट कोणती हें मला न कळून माझ्या अंतकरणांत किंचित भय उत्पन्न झालें, मी त्यांच्याकडे पाहूं लागलो व अस्पष्ट वाणीनें म्हणालो, " मी काय केलें पाहिजे ? '' शेटसाहेब सहास्य मुद्रेने म्हणाले,''यापुढें तूं आमच्या येथें परक्यासारखे वागता कामा नये.तुझ्या मनाला आतां तसें कांहीं वाटण्याचें कारण नाहीं.कारण तूं माझ्या कुटुंबाला जें सहाय्य केले आहेस, त्यापुढे आम्ही तुला आणखी कितीहि मदत केली तरी ती कांहींच नव्हें. त्यांतूनहि तुझ्या मनाला जर तसें काहीं वाटलें, तर तूं माझ्या मोहनला सकाळसंध्याकाळ थोडेथोडे शिकवित जा व शाळेंत जाण्याला त्याचें मन तयार कर. '' इतकें सांगून ते तेथून निघून गेले. पुनः आपल्याला विद्या शिकावयास मिळणार आणि आपल्या दग्ध झालेल्या आशेला पुनः पालवी फुटणार या सुखमय कल्पनेनें मला पराकाष्टेचा आनंद झाला. हें सर्व स्वप्न तर नाहीं, कां मला भ्रम तर झाला नाहीं असें मला कितीतरी वेळपर्यंत वाटत होतें. आपलें दुर्दैवी भाग्य नेहमीं उलट दिशेनेच आजपर्यंत चालत आलें आहे, तें आपली गती बदलून असें सुलटपणें केव्हां तरी चालेल याची मला कधींच आशा नव्हती. मी मनांतल्या मनांत शेटसाहेबांच्या या उदारपणाच्या वर्तनाला किती तरी धन्यवाद दिले असतील, तसेंच ज्या सर्वसाक्षी परमेश्वरानें शेटसाहेबांनी अशी प्रेरणा केली त्याचेंहि मनापासून आभार मानिल्याशिवाय राहिलो नाहीं.

ठरल्याप्रमाणें मला शाळेंत दाखल करण्याची सर्व खटपट शेटसाहेबांनी कबूल केल्याप्रमाणे दुसऱ्याच दिवशीं केली. शाळा सोडल्याला मला जवळ जवळ दोन वर्षें झाली होती, परंतु परमेश्वराच्या कृपाप्रसादानें माझी स्मरणशक्ती चांगली असल्यामुळें मला फारसें विस्मरण झालेलें नव्हतें. थोड्या दिवसाच्या परिश्रमानें मी जेवढें विसरलो

होतो, तेवढें पूर्ववत ताजें केलें. मला इंग्रजी पांचव्या वर्गात दाखल करण्यांत आलें. जे दिवशीं मी शाळेंत दाखल झालो, तो दिवस माझ्या आयुष्यांतला भाग्याचा दिवस होय, असें मला वाटूं लागलें. माझ्या पुढील भविष्यकाळाचें पुनर्जीवन होऊन, पुनः हवेंत राजवाडे बांधण्याची आम्ही सुरवात केली !

मध्यंतरीं कांहीं अनपेक्षित भानगडी उत्पन्न न होऊन आमचें गाडें सुरळीतपणें मार्गक्रमण करीत होतें. मी शाळेंत दाखल होऊन आतां दोन वर्षें झालीं होती. दर वर्षी यशस्वी रीतीनें पास होऊन मी वरच्या वर्गांत चढत गेलो. पहिल्या नंबरी पास होऊन आपली सर्वांकडून प्रसंसा व्हावी अशी माझी फार महत्वाकांक्षा होती, तसेंच आपल्या मदतीचा योग्य उपयोग होत आहे, हे शेटसाहेबांच्या निदर्शनास यावें म्हणून मी अगदीं काळजीपूर्वक अभ्यास करीत असे. त्यामुळे जरी पहिल्या नंबरीं नाहीं तरी बऱ्याच वरच्या नंबरीं मी दोन्ही खेपेस पास होऊन मॅट्रिकमध्यें होतो. हीं दोन वर्षे जर अशा रीतीनें फुकट गेली नसती तर ! असें केव्हा केव्हां मला वाटल्यावाचून रहात नसे. या दोन वर्षांच्या अवधींत मोहनलालमध्यें बराच फेर झाला होता, तो आतां शाळेंत जाऊं लागला असून आपला अभ्यास लक्ष लावून करूं लागला होता. माझ्या-वर त्याचें प्रेम पराकाष्ठेचें होतें, कोणतीहि गोष्ट मी सांगितली असता तो कधींहि ना म्हणत नसे. एखाद वेळेस दांडगाई करीत असतांना त्यानें कोणाचे न ऐकलें तर त्याची आई म्हणत असे कीं "पहा. तूं जर ऐकणार नाहींस तर चिंतामणी येथून निघून जाणार आहेत." त्याबरोबर त्यानें दांडगाई करण्याचे सोडून मी जेथें असेन तेथें धांवत येऊन "तुम्हाला मी कधींहि जाऊं देणार नाहीं." असें म्हणून माझा हात घट्ट पकडून ठेवावा. मी जेव्हां त्याची गोड शब्दानें समजूत करी व मी कोठेंहि जाणार नाहीं अशी त्याला कबूली देई तेव्हांच त्याचें समाधान होत असे. कधींकधीं शेटसाहेब थट्टेंत म्हणत कीं, "चिंतामणीनें आमच्या मोहनवर जादू केली आहे, त्याची आमच्यावरची ममता कमी करून टाकली." मीहि आतां पूर्वीपेक्षां बऱ्याच मोकळेपणाने घरात वागूं लागलो होतो.

मणीबेनचें लग्न होऊन वर्षदीडवर्ष झालें होते. ती आपल्या घरीं आनंदांत होती. सुंदरलालसारखा विद्वान व श्रीमान जावई मिळून आपली कन्या सुखात आहे हें पाहून शेटसाहेबांना समाधान वाटत होते. सुंदरलाल बॅरिस्टरच्या परिक्षेला विलायतेस जाणार होता, त्याचें जाणें आतां अगदीं समीप आले होते. मगनलाल अद्यापपर्यंत कोठें आहे याचा मुळींच पत्ता लागला नव्हता. त्याच्या संबंधानें शेटसाहेबासमोर कधीं कोणी बोलत नसत. मोटीबेनचें दुःख अद्यापि त्यांना होत असावे, असें त्यांच्या उदासीन मुद्रेवरून दिसत असे. अशी एकंदर शेटसाहेबाकडे स्थिति होती.

ज्या दिवशीं आमचा मॅट्रिकचा क्लास सुरू झाला; तो दिवस मी कधींहि विस-रणार नाहीं. कारण मी दरवाज्यांतून आंत पाय ठेवितांच माझ्या दृष्टीस कोण पडेल ? तो माझा अपरिचीत मित्र ? त्याचे प्रफुल्लीत नेत्र व सदा हंसरें मुख असें अचानक

माझ्या दृष्टीस पडतांच मला परमावधीचा हर्ष झाला. त्याच्या स्वरूपांत यत्किंचितहि बदल झालेला नव्हता. तो माझ्याच वर्गांत आहे हें पाहून तर मला विशेषच आनंद वाटला. त्यानें मला ओळखलें नसावें; परंतु मी त्याला कोठेंहि आणि केव्हांहि चटकन् ओळखूं शकलो असतो. एकदम जाऊन त्याची ओळख करून घ्यावी असें मला फार वाटूं लागलें, पण असें एखाद्या अनोळखी माणसास बळेंच जाऊन त्रास देणें मूर्खपणाचें लक्षण समजून मी स्वस्थ राहिलों. न जाणों आपल्याला त्याच्या ओळखीची जेवढी जरूर आहे तेवढी त्याला नसेल कदाचित्? कोणत्या प्रकारें त्याची ओळख करून घ्यावी हा एकच विचार शाळा सुटेपर्यंत माझ्या मनांत घोळत होता. त्याचें नांवहि मला अद्याप कळलें न हतें. आमच्या मास्तरनें त्याला एकदां देशमुख म्हणून हांक मारली होती. त्याचें आडनाव तर माहित होतेंच परंतु त्याचें नांव मला कळावें असें वाटत होतें. शाळा सुटल्यावर मी दरवाज्याबाहेर त्याच्या येण्याची वाट पहात होतो. जातां जातां त्याला पाहून जावें असें मला वाटलें. इतक्यांत आपल्या चेहऱ्यावरील हास्य कायम ठेवून तो बाहेर आला. मी समोरच उभा असल्यामुळें त्याची दृष्टी सहज माझ्यावर गेली. त्यानें माझ्याकडे पाहून हास्य केलें व माझ्याजवळ येऊन तो म्हणाला.

"मला वाटतें मी तुम्हाला कोठें तरी पाहिलें आहे. कोठें तें मात्र आठवत नाहीं."

त्याच्या तोंडून शब्द निघताच मला तेवढें कारण पुरें झालें. मला पाहिल्याचें त्याला स्मरण आहे याचा मला विलक्षण आनंद झाला, मी चटकन् म्हणालोः—

"आपण प्रथम कोठें भेटलों याची मला चांगलीच आठवण आहे. भगवानदासाच्या बॅंकेत मी होतो, तेव्हां मी पहिल्यानें तुम्हाला पाहिलें. तुम्हाला आठवण नाहीं का? तुमच्याबरोबर दुसरे एक गृहस्थ होते ते तुमचे वडिल असावे."

तो मोठमोठ्यानें हंसत म्हणाला. "अरे वः! तुम्हाला इतकी सारी आठवण आहे अं? मला वाटलें मी तुम्हाला कोठें तरी पाहिलें. त्या गोष्टीला किती तरी दिवस झाले, तुम्हाला कशी बोवा आठवण राहिली? माझी स्मरणशक्ति फारच दगेखोर आहे बुवा? आपल्याला कोणत्याच गोष्टीची एवढी काहीं आठवण रहात नाहीं. अहो? पण मला वाटतें तुम्ही तर त्यावेळीं तेथें कारकून होता नाहीं का? त्या बड्या बड्या मिशाळ कारकून मंडळींत तुमच्यासारख्या टिल्लूला पाहून मला तर फारच चमत्कारिक वाटत होतें व हंसूंहि येत होतें." यावर तो मोठ्यानें हंसूं लागला.

"काय करावें? माझी त्यावेळीं तशीच स्थिति होती." दीर्घ निःश्वास सोडून मी म्हणालों.

आपल्या बोलण्यानें माझ्या मनाला दुःख झालें हें जाणून तो एकदम पुढें आला व माझा हात धरून मृदु शब्दानें म्हणाला. "चला, आपण दोघे एका क्लासांत आहोंत हें बरें झालें हं. आजपासून आपण दोघे मित्र झालो. मी क्लासात आल्यापासून पहातों आहे कीं कोणाला मित्र करावा? कारण माझ्या जुन्या दोस्तापैकीं या शाळेंत

कोणीच नाहीं. हं. आतां सांगा पाहूं तुमचें नांव, पत्ता वगैरे वगैरे. माझें नांव चंद्रशेखर पण टोपण नांव बाळासाहेब, आडनांव देशमुख, पत्ता महालक्ष्मी ' तारा निवास. ' आतां तुमचें सांगून टाका."

एका क्षणांत त्याचें माझ्याशीं तें सलगीचें वर्तन पाहून मला फार आश्चर्य वाटलें. त्याचे मुख जेवढें निर्मळ व आनंददायी होतें, तेवढेंच त्याचें अंतःकरणहि निर्मळ असून आनंददायी असलें पाहिजे असे मी ठरविलें. त्या प्रथम भेटीपासूनच आमची दृढमैत्री जमली. त्याच्या भेटीची मला फार दिवसापासून तृष्णा लागून राहिली होती; ती अशारीतीनें पूर्ण झाली त्यामुळें मला फार समाधान वाटलें. त्याची भेट होऊन आम्ही दोघे असे मित्र बनूं असें मला स्वप्नांतहि वाटलें नव्हतें. त्याची व माझी बरोबरी होणें किती अशक्य होतें! परंतु अखेरीस मी त्याचा मित्र बनलो. ईश्वरी नेमानेम किती विलक्षण असतो पहा! ते दिवशीं त्या आनंददायी कल्पनेंत मी अगदीं तल्लीन झालो होतो. माझी फार दिवसांची वांच्छा तृप्त झाली होती!

---

## स्मृति बाविसावी.

# बाळासाहेबाच्या घरीं!

:o:

थोड्याच दिवसांत मी व बाळासाहेब अगदीं जिवश्चकंठश्च मित्र बनलो. आम्हाला एकमेकांवाचून अगदीं जराहि चैन पडत नसे. बाळासाहेबाचा स्वभाव उतावळा होता, तरी तो अगदीं सरळ व मोकळया अंतःकरणाचा होता. अभ्यासांतहि तो फार हुशार होता, शिवाय क्रिकेट, टेनिस, फुटबॉल, बॅडमिंटन वगैरे खेळांतहि तो फार प्रवीण होता. त्याला गायनाचा नाद असून त्याचा कंठ फार मधूर होता. तो गाऊं लागला म्हणजे ऐकणारा अगदीं तल्लीन होऊन जात असें. त्याला गाण्याची लहर कोठें व केव्हा लागेल याचा नेम नसे. एखादे वेळेस त्याला वर्गांतच गायनाची लहर लागे. इतकें असून तो हेडमास्तरापासून इतर कोणाहि मास्तरला भीत नसे, व सर्व मास्तरांचा तो आवडताच होता. कारण आमच्या मास्तर-मंडळींत सर्वांना त्याचा स्वभाव माहीत झाला होता. तो गाऊं लागला म्हणजे मास्तर ऐकत असत. केव्हां केव्हां त्याच्या असभ्यावर्तनाबद्दल त्याला बोलून घ्यावें लागे, पण त्याचें त्याला विशेषसें कांहींच वाटत नसे. क्रिकेटवगैरे खेळांचें ज्ञान मला त्याच्याच आग्रहावरून झालें होतें. कारण मला लहानपणापासून खेळणें फारसें माहित नव्हतें म्हटलें तरी चालेल. तो मला बळेंच खेचून खेळावयास घेऊन जाई. त्याच्यापासून कोणतीच गोष्ट छपवून ठेवण्याची मला अवश्यकता वाटत नव्हती. एके दिवशीं त्यानें विचारलें असतां मी माझी सर्व हकीकत त्याला सांगितली. माझ्या गांवाचें नांव वगैरे सांगितलें नाहीं. घर सोडल्यापासून

माझी खरी खरी हकीकत मी फक्त बाळासाहेबालाच सांगितली होती. माझी हकीकत ऐकत असतां तो मध्यें हंसत हंसत म्हणाला—

" तुमची स्वारी घराला वैतागून पळून आलेली आहे एकूण! परंतु तूं एका बाबतींत चूक केलीस?"

" ती कोणती," मी म्हणालो.

" अरे, अशा रीतीनें गृहत्याग केल्यावर तूं संन्यास घेणेंच उत्तम होतें नाहीं कां? चांगलें बालब्रह्मचारी होतां आले असतें, छे! छे,! तूं आपल्या आयुष्यांतली एक अमूल्य संधी दवडलीस?" तो हंसतच होता. त्यावर मीहि हंसून म्हणालो,

" हो, बोलायची गोष्ट सोपी असते, पण ज्याच्यावर तो प्रसंग येतो त्यालाच कळतें."

" हो, पण तो प्रसंग आपण स्वतःच आपल्या अंगावर ओढून घेतला होतास. घर सोडायला कांहीं कोणी तुम्हांला सांगितलें नव्हतें. दम धर. मी तुझ्या वडिलांना कळवितों कीं तुमचें पळपुटे चिरंजीव. जीव घेऊन पळालें, तें येथें जीव धरून आहेत, यांना गिरफदार करून न्या."

" बरें आहे तुला जर थट्टाच करायची असली तर मी तुला कांहींच सांगत नाहीं." मी जरा रागानेंच म्हणालो.

" फार उत्तम. मी जातो. हं." म्हणून तो खरोखरीच जाऊं लागला. त्याच्यावर फार वेळ रागावणे मला शक्य नव्हतें. मी त्याला बळेंच बसवून माझी पुढची हकीकत सांगूं लागलो. जेव्हा मी माझ्या मुंबईतला प्रथम दिवसाचा अनुभव सांगूं लागलो, तेव्हा तो मुंबईच्या सर्व लोकांना व मला पकडून नेणाऱ्या पोलिसलोकाना शिव्या देऊं लागला; जगात सर्वत्र असे बेमुर्वतखोर लोक आहेत म्हणून सर्व जगाची निंदा करूं लागला; शेटसाहेबाच्या येथली हकीकत सागत असता त्यानें त्याची फार प्रशंसा केली. नाटकात माझी उडालेली त्रेधा ऐकून तर त्याला हंसता हंसता पुरें झालें; त्यानंतर गोपाळरावने माझे पैसे कसे बुडाविलें हें ऐकून तो गोपाळरावावर फार चिडला; शेटसाहेबाच्या येथे झालेली चोरी व माझें परत शेटसाहेबाकडे येणें ऐकल्यानंतर पोलिसांनीं यशाचा वांटा सरस्वी आपणच पटकाविल्याबद्दल त्याच्यावर यथेच्छ वाक्प्रहार केलें व माझें दोन्ही हात आपल्या हातात धरून तो गद्गद वाणीनें म्हणाला,

"चिंतामणी, तुझी ही सर्व हकीकत ऐकून बालपणापासून तूं एवढें दुःख कसें सहन केलेस याचेंच मला आश्चर्य वाटतें! माझी आईहि मी अगदीं लहान असताच मरण पावली, तिला मी पाहिलीच नाहीं, परंतु दुःख म्हणजे काय हें अद्याप मला माहीत नाहीं. माझ्या बाबासारखे बाप जर सर्वत्र असते तर प्रथम पत्नीच्यामागें तिच्या अपत्यांना भोगावें लागणारें दुःख खात्रीनें टळले असतें. माझ्या प्रेमळ पित्यानें स्वतःच्या सुखाला तिलांजली देऊन माझ्याच सुखाची विशेष करून काळजी बाळगली आहे.

हो. पण, तूं आज माझ्या घरीं यायचें कबूल केलें आहेस ना? तूं येणार म्हणून मी माझ्या बाबाना सांगितलें आहे. चल येतोस ना?"

अद्याप बाळासाहेबांच्या घरीं मी गेलोच नव्हतो. त्यानें आज मला त्याच्या घरीं जेवावयास बोलाविलें होतें, व मी आज त्यांच्या घरीं जाण्याचें कबूल केलें होतें. आम्ही दोघे बाळासाहेबाच्या 'डॉगकार्ट' मध्यें बसून त्याच्या बंगल्याबर गेलो. दररोज संध्याकाळीं तो आपल्या गाडींत बसून चौपाटीवर मला भेटण्याकरितां येत असे. माझ्या बरोबर कधीं मोहनलाल असे व कधीं मी एकटाच येत असे. माझ्या मित्राच्या घरीं मला जेवावयास जावयाचें आहे हे जाणून आज तो आला नव्हता.

बाळासाहेबाचें वडील बापुसाहेब देशमुख बाहेर बागेंत आमची वाट पहातच होते. आम्ही गेल्यावर बाळासाहेबानीं माझी ओळख करून दिली. बापुसाहेब फार साधे व मनमिळाऊ होते. आम्ही बागेंत घटकाभर इकडच्या तिकडच्या गप्पा मारीत बसलो होतो. गार वारा सुटून अंगाला झोंबूं लागल्यामुळे आम्हाला बापुसाहेब आंत घेऊन गेले. बाळासाहेबाच्या आईचें नांव ताराबाई असें होतें, म्हणून बापुसाहेबानी तिच्या स्मरणार्थ आपल्या बंगल्याचें नांव 'तारा निवास' ठेविलें होतें. बंगला लहानसाच पण हवाशीर असून फार सुरेख होता. बाळासाहेबांना बागेचा शौक असल्यामुळे त्याच्या वडिलांनीं त्याच्याच करितां मुद्दाम लहानशीच पण उत्कृष्ट पुष्पवाटिकांनीं सुशोभित अशी बाग करविली होती. बापुसाहेब मूळचे निजाम हैद्राबादकडचे एक धनाढ्य गृहस्थ होते. त्याचें तेथें बरेच मोठें वतन होतें. त्याची पत्नी वारल्यावर आपल्या मोठ्या वाड्यांत त्यांना बिलकूल चैन पडेना; म्हणून ते आपल्या लहान अर्भकाला घेऊन मुंबईतच राहूं लागले. वर्षांतून एक वेळ ते आपल्या वतनगांवीं जाऊन येत. मुंबईत ते व्यापारांत भाग ठेऊन धंदा करीत. त्याना घोड्यावर बसण्याचा फार नाद असल्यामुळें हैदराबादेस असतां एके प्रसंगीं ते घोड्यावर बसून जात असतां घोड्याला ठोकर लागून पडले व त्यामुळें त्याचा पाय दुखवून तें जन्माचे अधू झाले. तेव्हापासून ते जरा लंगडत चालूं लागले. त्यांचें आपल्या एकुलत्या एक मुलावर निस्सीम प्रेम होतें. ते बाळासाहेबाला क्षणभर ही दूर करीत नसत. मी तेथें असेंपर्यंत त्यांच्या तोंडून बाळासाहेबच्या स्तुतिखेरीज दुसरी गोष्ट ऐकली नाहीं. बाळासाहेबही त्यांच्या प्रेमाला योग्य असाच होता. आम्ही माडीवर दिवाणखान्यांत जाऊन बसलो; मी व बाळासाहेब एकं तांबड्या रंगाच्या रेशमी कोचावर बसलो व बापूसाहेब आमच्यासमोर एका ईझीचेअरवर धूम्रपान करीत पडले होते; इतक्यांत एक चौदापंधरा वर्षांची सुंदर मुलगी आंत आली. दिवाणखान्यात तिसरा कोणी तरी परकी मनुष्य आहे हें पाहून ती तशींच परत जाऊं लागली. तिला जातांना पाहून बापुसाहेब म्हणाले,

"सगुणे, कां जातेस, ये अशी इकडे ये. तुझ्या एवढ्या मुलीला चिंतामणी एवढ्या मुलाला लाजण्याची जरूर नाहीं" माझ्याकडे वळून ते म्हणाले. "चिंतामणी, ही आमची सगुणा, नांवाप्रमाणें खरोखरीच सगुण आहे बरें कां!" बापुसाहेबांनीं

बोलाविल्यावरून सगुणा लाजतच बापुसाहेबांजवळ खुर्चीवर खालीं मान घालून बसली. ती अगदीं समोर बसल्यावरून ती किती स्वरूपवान आहे हें मला चांगलें दिसलें. बापुसाहेबांना बाळासाहेब हा एकच मुलगा असतां ही सगुणा कोण असावी, याचें मला गूढ पडलें होतें. परंतु तसें विचारणें गैर आहे हें जाणून मी कांहींच बोललों नाहीं.

बापुसाहेब सगुणेचा हात आपल्या हातांत धरून म्हणाले, "चिंतामणि, मी जरी हैद्राबादसारख्या मुसलमानी पडदानशीन अमदानींतला आहे, तरी स्त्रियांना आंतल्या आंत कोंडून ठेवण्याची चाल मला बिलकूल पसंत नाहीं. सगुणा माझ्याजवळ राहूं लागल्यापासून मी तिला अगदीं मोकळेपणानें वागण्यास सांगितलें आहे. लहानपणापासून आपल्या मुलींना आपण अगदीं बंदीवासांत ठेवित गेलों तर त्यांना तशाच प्रकारें राहणें भाग पडतें."

बापुसाहेब स्त्रियांच्या मोकळेपणाविषयीं बोलत होते; पण बिचारी सगुणा खालीं मान घालून बसली होती. तिच्याकडे पाहून बाळासाहेब हंसत हंसत म्हणाला,

"सगुणे, तुला जर पुरुषांत बसायचें असलें तर नीट ताठपणें पुरुषासारखी बस पाहूं; नाहीं तर बायकासारखी घरांतल्या एका कोंपऱ्यांत पळकाढ कशी! बाबा, जाऊं द्या तिला तिची मान दुखूं लागली असेल. बाबा, हिला पुष्कळ शिक्षण देऊन तुम्ही अगदीं विदुषी करणार आहांत ना? अहाहा! विदुषीबाई! आमच्या चिंतोबापुढें तुम्ही एवढी खाली मुंडी घातलीत, मग कॉलेजमध्यें असंख्य मुलांत तुमची काय स्थिति होईल?" बाळासाहेबानें आणखीहि तिची थट्टा चालविली असती, पण जेवण तयार आहे अशी वर्दी येतांच आम्ही सर्व जेवावयास गेलों. बापुसाहेबांनीं सगुणेलाहि आमच्या पंक्तीला बसविलें होतें. जेवतांना बापुसाहेब बाळासाहेबाच्या लहानपणाच्या गोष्टी सांगत होते. मला त्या ऐकाव्याशा वाटतच होत्या, कारण बाळासाहेबावर माझें इतकें अलोट प्रेम जडलें होते कीं त्याच्या संबंधानें कोणताहि विषय निघाला तरी त्यात मला आनंदच वाटत असें.

"बाबा, माझ्याविषयींचें तुमचें हे पुराण कधीं तरी संपणार?" थट्टेच्या स्वरांत बाळासाहेब म्हणाला. "मला अगदीं कंटाळा आला, पण आमच्या बाबांना कधींहि कंटाळा येणार नाहीं." त्यांच्या बोलण्याकडे बापुसाहेबांचें लक्षच नव्हतें, त्यांचें आपलें चऱ्हाट चाललेच होतें. जेवण झाल्यावर आम्ही पुनः दिवाणखान्यांत जाऊन बसलों. सगुणा दुसरीकडे गेली होती. सगुणा ही बापुसाहेबांच्या एका मित्राची मुलगी होय. ती दोनतीन वर्षांची असताच तिचें मातापिता प्लेगला बळी पडले होते, तिला जवळचें आप्त कोणीच नसल्यामुळे त्यावेळेपासून बापुसाहेबांनींच तिला आश्रय दिला होता. बापुसाहेब तिला आपल्या स्वतःच्या मुलीसारखें वागवित असत. तीहि स्वभावानें फारच सुशील असून बुद्धिमान होती. बापुसाहेबांच्या घरांतली सर्व गृहव्यवस्था तीच पहात असे. इतक्या लहान वयांत तिला गृहव्यवस्थेचें उत्कृष्ट ज्ञान होतें, त्याबद्दल बापुसाहेब तिची प्रशंसा करीत, पण त्याचा तिला यत्किंचित् गर्व नव्हता. बाळासाहेब

मूळचाच आनंदीवृत्तीचा असल्यामुळें त्या दोघांचें फार चांगलें जमत असे. बापुसाहेबांनीं पुनः बाळासाहेबासंबंधीं गोष्ट काढली. तेव्हां बाळासाहेब म्हणाला,

" हं, बाबा, आतां माझ्याविषयींचें भारूड पुरें झालें. माझ्यापेक्षां या चिंतामणीची एकंदर हकीकत तर तुम्ही ऐका! त्याला लहानपणापासून कोणत्या स्थितींत दिवस काढावे लागलेत तें ? "

बापुसाहेबांच्या सांगण्यावरून मी नको नको म्हणून खूण करीत असतां, बाळासाहेबानें माझ्याविषयींची तांत्रिक हकीकत सांगितलीच. सर्व हकीकत ऐकून घेतल्यावर बापुसाहेब म्हणाले,

" हें पहा, चिंतामणि, तुमची हकीकत ऐकून मी किती शहाणपणा केला, असें मला वाटूं लागलें आहे. बाळासाहेबाची आई वारली, तेव्हां तो अवघा दीड वर्षांचा होता, त्यानें आपल्या आईचें सुख मुळींच पाहिलें नाहीं. सापत्न मातेपासून सापत्न मुलांना सुख लाभत नाहीं याचे मला बऱ्याच ठिकाणीं दाखले अनुभवास आले आहेत. माझ्या बाळासाहेबाला यत्किंचितही दुःख होऊं नये म्हणून मी फिरून लग्न करण्याच्या भानगडींत पडलोंच नाहीं. अहो! पित्याचें प्रेम आपल्या अपत्यावर कितीहि असलें, तरी स्त्रियांच्यासारखे त्यांना नेहमीं घरांत कां रहायचें असतें ? बायका घरांत असल्या म्हणजे घरांतल्या बाबतींविषयीं पुरुष तेवढे निष्काळजी असतात! माझ्या बाळासाहेबाच्या सुखापुढें माझ्या सुखाची मी मुळींच परवा करीत नाहीं. " मी इकडे तिकडे पाहिलें, पण यावेळीं बाळासाहेब बाहेर गच्चीवर ताऱ्याकडे पहात उभा होता. त्याच्याविषयीं स्तुतिस्तोत्र सुरूं होतांच तो बाहेर गेला असावा. त्याच्याकडे स्वाभिमानानें पहात बापुसाहेब हंसून म्हणाले,

" पहा, त्याची गोष्ट काढतांच तो गच्चीवर गेला! खरोखरी; माझ्या बाळासाहेबासारखा सर्वगुणसंपन्न पुत्र मला लाभला, म्हणून मी धन्य होय! परमेश्वरानें त्याला दीर्घायु करावें एवढींच माझी इच्छा आहे. " त्यांच्या स्वरांत पूर्वीपेक्षांहि मार्दव होतें. " लहानपणापासून आईच्यामागें त्यानें मला कधींच कोणत्या गोष्टीसंबंधानें त्रास दिला नाहीं. एक एक त्याचें गुण आठवले कीं त्याला आपल्या आईचें बिलकुल सुख लाभलें नाहीं, त्याबद्दल माझें हृदय भरून येतें, " यावेळीं त्यांचा कंठ भरून आल्यामुळें ते क्षणभर निःस्तब्ध राहिले. बापुसाहेबांचें आपल्या पुत्रावरचें तें विलक्षण प्रेम पाहून मला फार कौतुक व आनंद वाटला.

रात्रीचे नऊं वाजून गेले होते, आतां जावें हा विचार येऊन मी उठलो. बापुसाहेब मला म्हणाले. "कां इतक्या लवकर उठलांत! थांबा, माझा बाळासाहेब एखादी उत्तम चीज म्हणेल नंतर तुम्ही जा. फार रात्र झाली नाहीं. रोज रात्रीं बाळासाहेबाच्या तोंडून एखादें गाणें ऐकल्याशिवाय मला झोंपच येत नाहीं. " आम्ही दोघे उभे होतों; मी जाण्याकरितां व ते बाळासाहेबाला बोलावण्याकरितां; बाळासाहेबाच्या

तोंडचें मधूर गायन ऐकावयास मिळणार, हें ऐकून माझे पाय जागच्याजागीं खिळून गेले.

" चिंतामणि, जरा इकडे या पाहूं ? " बापुसाहेब म्हणाले. ते कशाला बोलावतात हें न कळून मी त्यांच्यामागें दिवाणखान्याला लागून असलेल्या एका खोलींत गेलो. ती खोली निजण्याची असावी असें तेथल्या एकंदर सरसामानावरून दिसत होतें. मध्यभागीं पांढरा स्वच्छ बिछाना घातलेला पलंग होता. पलंगाच्या पायथ्याशीं समोरच टांगलेल्या एका तैलचित्राकडे बोट दाखवून ते म्हणाले, " ही पहा, आतां नुक्तीच बाळासाहेबाची तैलरंगाची तसबीर मी चांगल्या कारागिराजवळून तयार करविली आहे. सकाळीं उठल्याबरोबर त्याचें सदा हंसणारें तोंड माझ्या दृष्टीस पडावें, म्हणून मी ही मुद्दाम येथें टांगली आहे. " ती तसबीर नीट दिसावी म्हणून आम्ही दोघे अगदीं तिच्याजवळ गेलो. " असा भास होतो कीं बाळासाहेबच येथें बसला आहे, नाहीं कां ? " त्यांना आपल्या पुत्राच्या त्या निर्जीव प्रतिमेकडे पाहूनहि किती आनंद वाटत असावा, हें त्यांच्या आनंदानें प्रफुल्लित झालेल्या मुखावरून दिसत होतें. आम्ही दिवाणखान्यांत नाहीं हें पाहून बाळासाहेबहि आम्हीं होतो तेथें आला.आम्हाला दोघांना वेड्यासारखें त्या तसबिरीसमोर उभे राहिलेले पाहून तो मोठमोठ्यानें हंसत सुटला.

" बाबा, माझे लहानपणींचें सर्व फोटो, माझे लहान लहान कपडे, खेळणीं सर्व कांहीं या चिंतामणीला दाखवायचें आहे कां आजच तुम्हाला ? तो पुनः सुद्धां येईल आणखी. चिंतामणि, या कपाटांत आमची सारी बालपणचीं आयुधें, शिरस्त्राणें, चिलखतें बाबांनीं अगदीं जपून ठेविलीं आहेत बरें कां ? तूं रजेंत एखादे दिवशीं ये म्हणजे तुला सर्व प्रदर्शन पहायला मिळेल. " तो आपल्या पित्याची थट्टा करून हंसतच होता.

" बरें, तें सारें पुनः केव्हां तरीं दाखवूं, बाळासाहेब, चल. कांहीं तरी गा पाहूं ? तुझें गाणें ऐकल्याखेरीज मला झोंप येणार नाहीं. हं, चल बाहेर ? " त्यानंतर आम्ही तिघे दिवाणखान्यांत आलो. बाळासाहेबानें सतारीवर एक उत्कृष्ट हिंदुस्थानी चीज म्हटली. त्याचें गायन चालू असतां आम्ही दोघेहि घटकाभर देहभान विसरून तल्लीन होऊन गेलो !

" चिंतामणि, तुला झोंप आली वाटतें ? " बाळासाहेबानें सतार ठेऊन हंसत हंसत म्हटलें. तेव्हां मी भानावर आलो. रात्र बरीच झाली, आतां फार वेळ बसणें बरोबर नाहीं म्हणून मी उठलोच. मला बापुसाहेब म्हणाले,

" येत जा नेहमीं असेंच. " त्यांना "होय" म्हणून मी खालीं उतरलो. बाळासाहेब माझ्याबरोबर खालीं आला होता. रात्र झाली म्हणून त्यानें आपली मोटार मला पोंचविण्याकरितां तयार ठेवावयास सांगितली होती. बंगल्याच्या फाटकाजवळ त्यावेळीं मोटार उभी आहे हें मला माहित नव्हतें.

" चिंतामणि, बस मोटारींत, " बाळासाहेब म्हणाला.

" अरे ! मोटार कशाला ? मी जाईन पायीं. " आश्चर्यानें मी म्हणालो.

" वा:, मग ही मोटार कशाला येथें तयार आहे ? तुला दाखविण्यासाठीं वाटतें ? बस, बस—आंत. कां येऊं मी पोंचवायला ? "

" नको, नको. तुझी कांहीं जरूर नाहीं. " माझा हात धरून बाळासाहेब म्हणाला,

" चिंतामणि, माझ्या बाबांना तूं वेडगळ तर नाहींना म्हणणार ? त्यांचें माझ्यावरचें प्रेम विलक्षण आहे. मला वाटतें कीं कोणीहि पिता आपल्या पुत्रावर एवढें प्रेम करीत नसेल. "

सदा हंसणाऱ्या बाळासाहेबाच्या चेहऱ्यावर गंभीरपणा दिसत होता, त्याच्या नेत्रांत अश्रु चमकल्याचा मला भास झाला. आपल्या प्रेमळ पित्याचें आपल्यावर किती अलोट प्रेम आहे याची त्याला जाणीव होती.

" बाळासाहेब, खचित तुझ्या पित्याचें तुझ्यावर विलक्षण प्रेम आहे, आणि तुझ्यावर कोणाचें नाहीं, तें सांग ? ज्याचा ज्याचा तुझ्याशीं संबंध येतो, तो तुझ्यावर अतिशय प्रेम करूं लागतो, खरोखरी, तुझ्याजवळ प्रेमरसाचा सागर आहे म्हणून जो तो त्यांतला एखादा बिंदू मिळावा या आशेनें तुझ्याकडे धांव घेतो. "

" अरे वा ? तूं तर मोठा जाडा कवि बनलास आज ! अरे बाबा, माझ्याजवळ प्रेमरसाचा सागर असून तो अगदीं कोरडा ठणठणीत पडला आहे, म्हणून दुसऱ्या जवळून मी एकएक बिंदू सांठवून तो भरण्याचा प्रयत्न करीत आहे असें म्हण पाहिजे तर. " त्याच्या या भाषणानें मला हंसूं आलें व तोहि हंसत होता. त्याचा सप्रेम निरोप घेऊन मी मोटारींत बसलो व घरच्या मार्गाला लागलो. घरीं जातां जातां त्या प्रेमळ पितापुत्राच्या सहवासांत वेळ किती लवकर निघून गेला हें मला समजलें सुद्धां नाहीं. बापुसाहेबांच्या पुत्रप्रेमाची बरोबरी करणें शक्यच नाहीं असें मला वाटूं लागलें. बाळासाहेबाचेंहि आपल्या प्रेमळ पित्याचें ठायीं फार प्रेम होतें. बापुसाहेबाच्या पुत्रस्नेहाबद्दल मला यत्किंचित् मत्सर वाटला नाहीं. परंतु त्यांतला एक शतांश जरी माझ्या वांट्याला येतां तर ? असें मला वाटूं लागलें होतें.

---

## स्मृति तेविसावी.

# कॉलेजांत प्रवेश.



आमची वार्षिक परिक्षा तीनचार महिन्यावर आल्यापासून आम्हांला बिलकुल वेळ मिळत नव्हता. माझ्याकडून मी परिक्षेची चांगली तयारी करीत होतो. या परिक्षेच्या परिणामावर माझें पुढील आयुष्य अवलंबून होतें. कंसाला ज्याप्रमाणें निजतां, बसतां, जेवतां, जळीं, काष्टीं सर्व ठिकाणीं आठवा मुलगा दिसून त्याचा निदिध्यास लागला.

होता, त्याप्रमाणें विश्वविद्यालयाच्या या प्रवेशपरिक्षेसंबंधीं विद्यार्थ्यांना निदिध्यास लागलेला असतो. बाळासाहेबहि अगदीं झटून अभ्यास करीत होता. अभ्यासाचा कंटाळा आल्यामुळें बाळासाहेबाकडे जावें असा विचार मनांत येऊन अगदीं भर दुपारीं त्याचें घर जरी बरेंच लांब होतें, तरी मी तेथें गेलो. बाळासाहेब घरांत एकटाच होता. अलीकडे मीं बाळासाहेबाच्या येथें नेहमीं येत असे त्यामुळें सगुणा माझ्याशीं मोकळे-पणानें वागत असे. बापुसाहेबांचें व माझें तर चांगलेंच सख्य जडलें होतें. मी दोनचार दिवसांत गेलों नाहीं तर ते त्याबद्दल बाळासाहेबाजवळ चौकशी करीत असत. मीं बाळासाहेबाच्या खोलींत प्रवेश करण्यापूर्वी बाळासाहेबाच्या मधुर कंठांतून निघालेल्या ताना माझ्या कानावर आल्या, क्षणभर मी दाराबाहेरच उभा राहिलो. त्याचें गायन लवकर संपणार नाहीं हें जाणून मी हलकेंच दार उघडून दारांतच उभा राहिलो. दारा-कडे पाठ असून तो एका आरामखुर्चीवर पडल्या पडल्या खुर्चीच्या हातावर ताल देऊन गाण्याच्या रंगांत आला होता. मीं हळुहळू जाऊन बाळासाहेबाच्या मागें उभा राहिलो. तरी मी आल्याचें त्याला कळलें नाहीं. खुर्चीच्या हाताचा तबल्यासारखा उप-योग करून व जमिनीवर पायाची सांथ धरून तो गातच होता. त्याच्या रंगाचा भंग न करतां मीहि स्तब्धपणें तो बसला होता त्या खुर्चीवर त्याला समजणार नाहीं अशा रीतीनें हात ठेऊन उभा होतो. त्यानें आपलें गायन पुरें करून खुर्चीच्या मागें रेलून मागच्या मागें माझें दोन्ही हात धरून ठेविलें व मागे माझ्याकडे वळून पहात तो एक सारखा हंसूं लागला. त्याच्या वर्तनावरून माझें खोलींत येणें व नंतर त्याच्यामागें उभें रहाणें, त्याला कळलें असावें असें दिसलें. त्याला हंसतांना पाहून मीहि हंसूं लागलो. किती तरी वेळ आम्ही एकमेकांकडे पाहून संभाषण न करतां एकसारखें हंसत होतो. बाळासाहेबाच्या हंसण्याला कडावर कड येत होते, मलाहि माझें हंसूं आवरता येईना. हंसून हंसून जेव्हां आम्ही थकलो, तेव्हां कोठें आमचें हंसणें कमी कमी प्रमाणावर येऊन अगदीं थंड पडलें. मी माझे डोळे पुसून म्हणालो.

" मी आलो हें तुला कसें रे कळले, बाळासाहेब ? "

" हें बघ, माझ्या पाठीला सुद्धां डोळे आहेत बरें कां ? " तो हंसत हंसत म्हणाला.

" माझी खात्री आहे कीं मी येथें असेंपर्यंत तूं एकदां सुद्धां मागें पाहिलेस नाहीं, मग तुला कसें कळलें सांग, सांग पाहूं. "

" अरे ! तूं रस्त्यावर होतास तेव्हांच मी तुला त्या खिडकींतून पाहिलें व नंतर मी या खुर्चीवर बसलो. येथें बसल्या बसल्या या आरशांतून तूं दारांत आलास तेव्हांच मला दिसलास; परंतु तुझ्या चोरट्या वर्तनावरून तुझा उद्देश ओळखून तूं माझ्यामागें उभा राहिलास तरी मी मला कळल्याचें दर्शविलें नाहीं. " बाळासाहेबाच्या समोर कांहीं अंतरावर एका टेबलावर एक लंबगोल आरसा असून मी आंत आलो हें त्याला

कसें कळलें, हें आतां माझ्या लक्षांत आलें. खोलींत जी ही अव्यवस्था माजून राहिली आहे त्याचें कारण मी त्याला विचारतां तो हंसून म्हणाला,

" अरे, मॅथेमेटीकस्च्या नोट्स मी कोठें ठेविल्या आहेत, त्या कांहीं केल्या सांपडतच नाहींत. सारी पुस्तकें वगैरे धुंडाळून पाहिलीं; पण त्यांचा पत्ता नाहीं. शोधून शोधून कंटाळून गेलो, शेवटीं बसलो गात झालें, मग काय करूं ? मला वाटतें त्या तुझ्या पुंड्यानें माझ्या खोलींत गुप्तपणें प्रवेश करून खात्रीनें कोठें तरी लांबविल्या असल्या पाहिजेत. चल, आपण त्या सुपरिंटेन्डन्टसाहेबांना वर्दी देऊन तपास करायला सांगू." पुंड्याचें नांव ऐकतांच माझ्या काळजाला भीतीनें किंचित् धक्का बसल्याखेरीज राहिला नाहीं. माझ्या चेहऱ्यावरचें हास्य मावळलेले पाहून तो हंसून म्हणाला, " पुंड्याचें नांव ऐकतांच घाबरलास वाटतें ! बरें चल. आतां आपण आधीं थोडा चहा घेऊं; मग दोघे मिळून त्या हरामखोर चोपड्यांचा कसून शोध करूं." आमचें चहापिणें झाल्यानंतर आम्हीं दोघांनीं मिळून तीं सर्व पुस्तकें जागच्याजागीं ठेऊन दिलीं. बाळासाहेबांच्या नोट्स् त्यांत कोठेंच सांपडल्या नाहींत. मी संध्याकाळपर्यंत तेथेंच होतो. बापुसाहेब आल्यानंतर त्याच्याजवळ कांहीं वेळ बसून मी घरीं जाण्यास निघालो. माझ्याबरोबर बाळासाहेबहि निघाला. आम्ही दोघे बंगल्याबाहेर पडण्यापूर्वी बाळासाहेब एकदम ओरडून म्हणाला,

" अरे, सांपडल्या ! "

" काय ? " मी व बापुसाहेब एकदम आश्चर्यचकित होऊन म्हणालो.

" हरवलेल्या नोट्स." मोठ्यानें हंसून बाळासाहेब म्हणाला व धावतच बंगल्यांत गेला. त्याच्या या विचित्र वर्तनाचें मलाहि हंसू येऊं लागलें. बापुसाहेबांना त्यांतला कांहींच अर्थ कळला नाहीं. बाळासाहेबच्या धांवत जाण्याचें कारण त्यांनीं मला विचारलें व त्याची अभ्यासाचीं पुस्तकें कोठें सांपडत नव्हती ती सांपडली म्हणून तो घ्यावयास गेल्याचे मी सांगितले. त्यावर बापुसाहेब म्हणाले,

" अहो, त्याचा स्वभाव फार विसराळू आहे, एखादी वस्तू ठेविल एका जागीं आणि शोधील दुसऱ्या जागीं. मीं आणि सगुणा त्याला लागणाऱ्या जिनसा नेहमीं जागच्या जागीं ठेवित असतो. नोकरचाकरांवर देखील विसंबत नाहीं. त्याला स्वतःला कोणत्याच बाबतींत काळजी घेण्याची आम्ही जरूर पडून देत नाहीं." बाळासाहेब आल्यावर आम्ही दोघे बाहेर पडलो. तुझ्या नोट्स कोठें सांपडल्या म्हणून विचारतां तो हंसून म्हणाला,

" अरे, काल रात्रीं मी त्या जेवणाच्या खोलींतच विसरलो होतो, त्याची आतां मला आठवण झाली. त्या सगुणेनें ठेविल्या असतील म्हणून मी तिला विचारतां त्या तिनेंच मला काढून दिल्या."

" जेवतांनासुद्धां तूं अभ्यास करीत असतोस वाटतें ? " मी म्हणालो.

" छे रे ! जेवायला जाण्यापूर्वी त्या माझ्या हातांत होत्या; त्या तशाचे हातांत घेऊन मी जेवायला गेलो. परंतु पुनः परत आणावयाच्या विसरलो, त्या तेथें पाटावरच राहिल्या होत्या. " आज बाळासाहेब व मी पायीपायींच जात होतो. चालतां चालतां आमच्या गप्पा चालल्याच होत्या.मॅट्रिकच्या परिक्षेंत आपण खात्रीने पास होऊं अशी त्याला दृढ आशा होती. प्रिव्हियस झाल्यानंतर बॅरिस्टर होण्याकरिता इंग्लंडांत जाण्याचा त्याचा विचार होता. इंग्लंडची गोष्ट काढतांच मी म्हणालो.

" तुझे वडील तुला इतक्या दूर जाऊं देतील काय ? "

" हीच तर मोठी अडचण आहे. पण मी आतांपासूनच त्यांना माझा विचार सांगून ठेविला आहे. प्रथम तर ते नाच म्हणाले परंतु हळुहळु त्याचें मन वळविण्याचा मी यत्न करणार आहे. तूंहि मला या कामांत मदत कर. खरोखरी; माझ्यावर बाबांचा स्नेह बाजवीपेक्षां फारच आहे, असें नाहीं कां तुला वाटत ? इंग्लंडला जाण्याची तर माझी मनापासूनची इच्छा आहे. बाबाच काय करतात कोण जाणें ! परदेशांत जाऊन विद्या शिकून यावें असें नाहीं का तुला वाटत ? बॅरिस्टर होऊन आलो म्हणजे आपला स्वतंत्र धंदा करून, आपल्या हातून होईल ती थोडी तरी देशसेवा करावी, अशी माझी मनापासूनची इच्छा आहे. " मीं कांहींच बोलत नाहीं हें पाहून तो पुनः म्हणाला, " काय रे ? चिंतामणि, तूं काहींच बोलत नाहींस तो; कसल्या एवढ्या चिंतेत पडला आहेस ? "

"हं. चालूं द्या, चालूं द्या तुमचें देशसेवेचें पुराण ! मी लक्षपूर्वक ऐकतो आहे !"

" बरें आहे, महाराज. आम्ही आतां बिलकुल बोलणारच नाहीं. " असें म्हणून खरोखरींच त्यानें आपलें तोंड बंद केलें. मी कितीहि प्रयत्न केला पण तो कांहीं केल्या बोलेना. दोघानाहि संभाषण करण्याची मनांतून इच्छा असून व बोलण्याकरितां ओठ स्फुरण पावत असून आम्ही एक अक्षरहि न बोलतां कांहीं काल मूकवृत्तीनें चालत होतो. चौपाटीवर गेल्यावर आम्ही एका रिकाम्या बांकावर बसलो व कळसूत्री निर्जीव पुतळ्यांप्रमाणें एकमेकांकडे पाहून येणारे हंसूं गालांतल्या गालांत दाबण्याचा प्रयत्न करीत होतो. अखेर कांहीं वेळानें आम्ही एकमेकांचा निरोप घेऊन घरी जाण्यास निघालों.

कधींपासून आम्हाला ज्या परिक्षेचा वेध लागून राहिला होता, ती एकदांची पार पडली. एकवेळां मला चांगलीच अद्दल घडली असल्यामुळें, परिक्षा सुरूं झाल्यावर माझ्या दोन्ही बाजूच्या विद्यार्थ्यांसंबंधीं मी आतां विशेष खबरदारी घेत असें. परिक्षेंत मी व बाळासाहेब उत्तम गुण मिळवून पास झालो. पास झाल्याचें कळल्यानंतर आम्हांला दोघांनाहि पुनः एकाच क्लासमध्यें रहावयास मिळेल म्हणून फारच आनंद झाला. आम्ही दोघांनीं एकाच कॉलेजमध्यें दाखल होण्याचा बेत केला. कारण जेथें मी तेथें बाळासाहेब व जेथें बाळासाहेब तेथें मी असणारच ! चालेपर्यंत एकमेकांपासून वेगळे न पडण्याचा आम्ही निश्चय केला होता. ज्या दिवशीं आमच्या परिक्षेचा निकाल

लागून मी पास झाल्याचें वर्तमान शेटसाहेबांना समजलें त्या दिवशीं त्यांचें माझ्याशीं बराच वेळ संभाषण झालें व त्यांनीं मला चार उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या. असेंच उत्तरोत्तर मी पुढें पुढें चढत जावें, म्हणून त्यांनीं मला उत्तेजन दिलें. त्यांच्या मुखावर समाधान दिसत होतें. शेटसाहेबांच्या मदतीचें आपल्या हातून योग्य चीज होत आहे म्हणून मलाहि एकप्रकारचा आनंद वाटत होता. मला माझ्या बालमित्र बाबूची आठवण झाली, तो कोठें आहे वगैरे मला कांहींच कळत नव्हतें. लहानपणीं त्याच्याबरोबर आपण भावी सुखकल्पनेंत कसें दंग होत होतों, याचें स्मृतिचित्र माझ्या अंतःपटलावर दिसूं लागलें. मी मॅट्रीक होऊन कॉलेजात दाखल झाल्याचा भाऊंनाहि आनंद वाटला नसतां काय ? कित्येक प्रसंगीं माझें मन एवढें व्यग्र होत असें कीं एकदम घरीं जावें असा माझ्या मनांत विचाराचा प्रबळ जोर होत असे. परंतु आपला जेथें असा अपमान झाला त्या घरांत पुनः न जाण्याविषयीं माझें अभिमानी मन मला सांगत असे. माझ्या मानीपणाचाच जय होत असे. असो.

कॉलेज सुरू झाल्यानंतर शंकरराव वैद्य नावाच्या एका तरुण मित्राचा माझ्याशीं आणि बाळासाहेबाशीं स्नेह जुळला. इतर सर्वांशीं आमचा स्नेह होता, परंतु त्यांतल्या त्यांत आमची त्रिमुर्तींची विशेषकरून कधींच फाटाफूट होत नसे. शंकरराव नुक्ताच मुंबईस शिकण्यासाठीं राहिला होता. त्याच्या घरची मंडळी × × × गावीं होती. तेथें मॅट्रिक-पर्यंत शिक्षण असल्यामुळें पुढच्या अभ्यासाकरिता त्याला मुंबईस राहणें भाग होतें. शंकररावचा स्वभाव आम्हाला पसंत पडून आम्ही तिघे जिवलग दोस्त बनलों होतों. परंतु बाळासाहेबावर माझा स्नेह कांहीं विलक्षणच होता, हें मला नाकबूल करतां येत नाहीं.

---

## स्मृति चोविसावी.

# कॉलेजांतला एक प्रसंग.



माझी आजी निवर्तल्यानंतर माझे जे दिवस सुखांत गेले, तें कॉलेजमधलेंच होत. कॉलेजचा आयुष्यक्रम माझ्या आयुष्यांतला अगदीं आनंदाचा काल होय, असें मला त्यावेळीं वाटत होतें. दुःखाचा काल लवकर जात नाहीं व सुखाचा काल केव्हांच निघून जातो हें आपणांस कळतसुद्धां नाहीं, याचा अनुभव मला होता. घर सोडल्यानंतरची दोन वर्षे किती तरी लांबच लांब मला वाटलीं. शाळेंत दाखल होऊन कॉलेजमध्यें प्रवेश करेपर्यंतचा काल किती जलदीनें जात होता याची मला स्मृति रहात नव्हती. दिवसानुदिवस बाळासाहेबावर माझें प्रेम वाढतच होतें व तोहि माझ्यावर फार प्रेम करीत होता. पूर्वऋणानुबंधामुळें आम्ही या जन्मीं मित्र झालों आहोंत, असें मला वाटत असें. आमच्या मित्रप्रेमाला कशाचीच उपमा देणें शक्य नव्हतें. आमच्या दोघांच्या आयु-

त्याच्या अखेरीपर्यंत आम्ही दोघे एकमेकांपासून वेगळे होणार नाहीं तर किती चांगलें होईल असें आम्हाला दोघांनाहि वाटत होतें. वास्तविक पहातां त्याचा व माझा स्नेह जडल्याला अवघें वर्षदीडवर्षच झालें होतें, परंतु आम्ही अगदीं आमच्या बालपणापासून एकमेकांना ओळखीत आहोंत असें आम्हाला वाटूं लागलें. कॉलेजमध्यें बाळासाहेबाच्या सहवासांत घालविलेल्या दिवसांचें स्मरण झालें म्हणजे माझें हृदय भरून येतें! ते दिवस कधींच संपले नसते तर बरें झालें असतें असें मला अद्यापिहि वाटत आहे. माझी ही कुलकथा लिहितां लिहितां पुढील हकीकत लिहिण्याला मी टांक हातांत घेतला, परंतु पुढचें लिहूंच नये असें मला वाटूं लागलें. मागच्या सर्व गोष्टींचें स्मरण होऊन लिहावयास घेतलेल्या कागदावर माझें हात थरथर कंप पावूं लागले. गतकालचें स्मृतिचित्र डोळ्यासमोर खडे राहून डोळ्यांना अंधत्व आल्यासारखें वाटूं लागलें. असो! ज्या गोष्टी घडून गेल्या त्या परत येणें शक्य नाहीं हें जाणून मनाचें कसें तरी समाधान करून मी पुढील हकीकत लिहावयास घेतली!

एके दिवशीं मी बाळासाहेबाकडे गेलों असतां, तो व सगुणा बुद्धिबळाचा डाव खेळत बसले होतें. मला त्यांत विशेष गोडी वाटत नसल्यामुळें मी आपला बापुसाहेबांजवळ गप्पा मारीत बसलों. आमच्या संभाषणाचा विषय बाळासाहेबासंबंधींचाच होता. बापुसाहेब म्हणाले,

" काय करावें बुवा? इंग्लन्डला जाण्याकरितां बाळासाहेबानें माझा आतांशा पाठपुरावा घेतला आहे. त्यानें जाऊं नये असें माझ्या मनांत आहे, पण त्याच्या डोक्यांत हें वेड शिरलें आहे तें कधींहि जाणार नाहीं. इंग्लन्डांत जाऊनच अधिक तें काय मिळावयाचें आहे? येथें राहून कांहींच करतां येण्यासारखें नाहीं कां? चिंतामणि, त्यानें जाऊं नये म्हणून तुम्ही तरी सांगून पहा! तुमचें तरी ऐकेल कदाचित्. "

बाळासाहेबाचें म्हणणें त्यांच्या उलट होतें. बाळासाहेबानें परदेशांत जाऊन विद्याभ्यास शिकून यावा हें उत्तम आहे. दूर दूर देशांचें परिशीलन करणें कांहीं वाईट नाहीं, असें मला पुष्कळ वाटे. परंतु बाळासाहेबांच्या पित्याप्रमाणें त्याचा वियोग व्हावा, असें मलाहि मनापासून वाटत नव्हतें. बापुसाहेबांना काहीं तरी उत्तर दिलें पाहिजे म्हणून मी म्हणालों,

" बाळासाहेबानें निदान इतक्यांतच जाऊं नये असें माझें मत आहे. बी. ए. झाल्यावर जावें पाहिजे तर. "

" पण मी म्हणतो, तेथेंच काय अधिक आहे? आतांचीं हीं तरुण पोरें तुम्ही, जरा शिकला नाहीं तर परदेशांत जाण्याचें भरलें वेड डोक्यांत! सर्वांनाच जाऊन काय एवढे दिवे लावायचे आहेत! म्हणे आम्ही परदेशांत जाऊन पुष्कळ विद्या शिकून आल्यावर देशसेवा करूं! देशसेवा करायला कांहीं परदेशांत नको जायला! तेथें जाऊनच देशसेवा कशी करायची हें कां तुम्ही शिकून येणार?" बापुसाहेब जरा चिडून म्हणाले.

" छे! परदेशांत देशसेवा कोण शिकायचें म्हणतें? परदेश फिरल्यानें ज्ञान वाढतें, आपल्या देशाची व दुसऱ्या देशांची तुलना करतां येते, त्यांचे व आपलें चांगलें वाईट काय आहे, आपण त्यापैकीं कोणतें ग्रहण करावें, आपल्या हातून आपल्या देशाची कोणती सेवा करतां येईल, याचा विचार करितां येतो, कदाचित् एखादा मार्गहि सांपडतो. "

"इंग्लन्डला जाऊन विद्या शिकून ज्ञान मिळविण्याऐवजीं कित्येक असलेलें ज्ञान गमावूनसुद्धां येतात, त्याची काय वाट? माझें तर असें ठाम मत आहे कीं सर्वांनाच कांहीं इंग्लन्डांत जाण्याची जरूर नाहीं." खेळ पुरा झाल्यामुळें बाळासाहेबहि आमच्याजवळ येऊन पोंचला.

"माझ्याविरुद्ध तुमचे बेत चालले आहेत वाटतें! मी इंग्लंडला जाऊं नये म्हणूनच कांहींतरी बाबा तुला सांगत असतील, होय ना चिंतामणि?" बाळासाहेब माझे दोन्ही खांदे गदगद हलवून म्हणाला. मी फक्त हंसलो, कांहींच बोललो नाहीं; त्यावर तो पुनः म्हणाला,

" पहा मी कसें अगदीं बरोबर ताडलें!"

" आमचें बोलणें तुला ऐकूं आलें असेलच, त्यांत काय मोठेंसे!" मी म्हणालो.

" मुळींच नाहीं. काय ग सगुणे? यांचें संभाषण आपल्याला ऐकूं आलें कां?" तो सगुणेकडे पाहून म्हणाला. " आज सगुणेला हार द्यायची होती, तिकडे माझें लक्ष होतें. मी तुमच्या संभाषणाकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं" तो सगुणेकडे पाहून हंसत होता. हार खाल्ल्यामुळें सगुणेचा चेहरा जरा उतरला होता. तो तेथेंच एका टेबलावर चढून बसला व आपल्या पित्याकडे पाहत हंसत हंसत म्हणाला,

" हं. मग काय तुमचा बेत ठरला बाबा? प्रिव्हियस झाल्यावर मला तुम्ही पाठविणार ना इंग्लन्डला?"

" छे! बाळासाहेब, मी कधींच तुला पाठविणार नाहीं." बापुसाहेब म्हणाले. त्यांच्या मुखावर किंचित उदासीनतेची झांक दिसत होती. आम्ही दोघे एका कोचावर बसलो होतो. पित्याच्या तोंडचें वाक्य पुरें होतांच टेबलावरून टणकन उडी मारून बाळासाहेब आमच्या दोघांच्या मध्यें येऊन बसला; व आपल्या पित्याकडे पहात हंसून म्हणाला,

" पण; बाबा, मला खात्री आहे तुमची! तुम्ही माझ्या कोणत्याच हट्टाला कधींहि ना म्हणणार नाहीं. तेव्हां हाहि माझा एक हट्ट आहे असें म्हणा क्षणभर!"

" तुझा हा हट्ट मी पुरविणार नाहीं." बापुसाहेब म्हणाले.

" हें पहा. बाबा, तुमच्या मुलानें मोठा बॅरिस्टर होऊन यावें असें तुम्हाला वाटत नाहीं कां? मी जर बॅरिस्टर झालो तर तुम्हाला आनंद वाटणार नाहीं का? हं! सांगा पाहूं?"

बिचारे बापुसाहेब काय बोलणार? बाळासाहेबानें त्यांच्याशीं इतका कांहीं युक्तिवाद केला कीं त्यांना जास्त बोलतां येईना. मला वाटलें कीं बाळासाहेब आजच बॅरिस्टरी लढावित आहे व तो खात्रीनें बडा दक्ष होईल. आमचा तिघांचा बराच वेळ त्याच विषयावर संवाद चालला होता. बाळासाहेब आपला हट्ट सोडीना, बापूसाहेब त्याला जाऊं देतील असें दिसेना. बाळासाहेब मला म्हणे "बाबांचें मन वळविण्याचा तूं प्रयत्न कर, बापुसाहेब म्हणत इंग्लंडांत न जावें म्हणून तुम्ही त्याचें मन वळवा. मला मात्र कोणीकडेच बोलता येईना. अखेरीस बी. ए. होईपर्यंत तरी इंग्लंडांत. बाळासाहेबानें जाऊं नये, बी. ए. झाल्यावर जावें ही गोष्ट बापुसाहेबांनीं कबूल केली. त्यावर बाळासाहेब म्हणाला,

"थांबा जरा. अखेरचा निकाल करूं नका. बहुमत कोणच्या बाजूला पडतें तें आपण पाहूं या. तुमच्या दोघांच्या मतें मी बी. ए. झाल्यावर जावें असें आहे; तेव्हां तुमच्याकडे दोन मतें आहेत. माझ्याकडे माझ्या एकट्याचेंच मत आहे, तेव्हां मलाहि माझ्या मताला दुजोरा पाहिजे. सगुणे, इकडे ये पाहूं अशी!" इतका वेळ स्वस्थ बसून सगुणा आमचा वादविवाद ऐकत होती. बाळासाहेबानें बोलावतांच हंसत हंसत ती कांहीं अंतरावर येऊन उभी राहिली.

"हं. तुझें काय मत आहे? मी केव्हां जावें इंग्लन्डला?" गंभीरपणें बाळासाहब म्हणाला.

"बाबांचें जें मत तेंच माझें." सगुणा स्मित करून म्हणाली.

"गुप्त कट! गुप्त कट! माझ्याविरुद्ध तुम्ही सर्वांनीं भयंकर कट केलेला आहे!! चिंतामणि! माझ्याशीं तूं दगा केलास हं! याद राखून ठेव याचें तुला चांगलेच प्रायश्चित्त मिळेल बरें कां. सगुणे! तुलाहि चांगलेंच प्रायश्चित भोगावें लागेल अं! बाबा! आतां तरी तुम्ही रागावणार नाहीं ना?" असें म्हणून त्यानें आपल्या पित्याकडे पाहून असा कांहीं विलक्षण चेहरा केला कीं, आम्हाला तिघांनाहि हंसू आलें. बाळासाहेबहि हंसून म्हणाला,

"चला. आतां आपला तह झाला, तुमच्या अटी आम्हाला कबूल आहेत, आमच्या अटी तुम्हाला कबूल आहेत ना बाबा! काय करणार? तुम्ही तिघे मी बिचारा एकटा." बाळासाहेब आणखी दोन तीन वर्षे तरी विलायतेस जाणार नाहीं, या विचारानें बापुसाहेबांना जेवढा आनंद झाला, तेवढा मला पण झाला! त्यानंतर बराच वेळ मी तेथें होतो. कॉलेजमध्यें दाखल झाल्याबरोबर विलायतेला जाण्याचा बाळासाहेबानें आपल्या वडिलामागें एकसारखा लकडा लाविला. परिक्षा पास होऊन जाण्याला अद्याप अवकाश होता, परंतु आजपासून एकसारखें मागें लागूं तेव्हां बापाची परवानगी मिळेल, असें वाटत असल्यामुळेंच बाळासाहेबनें विलायतेस जाण्याचा एकसारखा नाद घेतला होता. अखेरीस बी. ए. झाल्याखेरीज तरी आपले वडिल आप-

त्याला पाठविणार नाहीं ही त्याची पक्की खात्री झाल्यामुळें, आपल्या प्रेमळ पित्याच्या मर्जीविरुद्ध न वागण्याचें त्यानें ठरविलें व त्याप्रमाणें त्याचें जाणें दोन तीन वर्षें लांबणीवर पडलें.

एके दिवशीं नेहमींप्रमाणें, बाळासाहेब, शंकरराव, व मी चौपाटीवर फिरावयास गेलों होतों, आज मोहनलाल माझ्या बरोबर होता. शंकररावाशीं आणि बाळासाहेबाशीं मोहनलालाचें सख्य जुळलें होतें. बाळासाहेबाची माझ्याजवळ तो फार स्तुति करीत असे. मी जर तुमच्याएवढा असतो तर बाळासाहेब माझाहि मित्र झाला असता नाहीं कां? असें तो जेव्हां तेव्हां म्हणत असे व ती गोष्ट मी बाळासाहेबाला सांगतां तो हंसत हंसत मोहनलालला म्हणाला,

" मोहनलाल, मी तुझ्या एवढाच आहे, तेव्हां आपण दोघेहि मित्रच आहोत, बरें कां? मला या चिंतामणीसारखा पळपुब्या मित्र मुळींच आवडत नाहीं. हा जेथें जाईल, तेथें कांहीं तरी विघ्न उपस्थित करील. नाहींतर स्वतः कोठें तरी पळून जाईल." मोहनलालहि हंसत होता. त्यानंतर आमचें बऱ्याच विषयांवर संभाषण झालें. संभाषणाचा विषय अमुकच होता असें नाहीं. घटकेंत आम्ही समाजरचनेचा कीस काढीत होतों, तर घटकेंत पुरतेंपणीं माहित नसतांहि राजकारणाचे तुकडे तुकडे करीत होतों, तर घटकेंत देशसेवेचीं सुसंघटीत रचना कशी करावी याबद्दल गहन विचार–सागराच्या बुडाचा तळ शोधावयास बुडी मारीत होतों. त्यानंतर आमच्या कॉलेजाविषयीं व प्रोफेसराविषयीं बाळासाहेबानें बोलणें काढलें. तो मला म्हणाला,—

" चिंतामणि, आपल्या त्या प्रोफेसरांनीं तुला उद्यां नऊ वाजतां त्यांच्या घरीं बोलाविलें आहे."

" मला! मला कशाला?" मी आश्चर्यानें म्हणालों. कारण त्या प्रोफेसरांकडे मला जाण्याचें कांहींच कारण नव्हतें व कॉलेज सुटेपर्यंत त्यांनीं मला तसें काहींच सांगितलें नव्हतें. हे आमचे इंग्लीशचें प्रोफेसरसाहेब भोरकर होत. ( बाळासाहेबाला ज्यांनीं गातांना हटकलें होतें ते ).

" हो." बाळासाहेब गंभीरपणें म्हणाला.

" पण, मला तसें त्यांनीं सांगितलें नाहीं तें?" गोंधळांत पडून मी म्हणालों.

" हें बघ. कॉलिजांतून मी घरीं जात असतां ते मला वाटेंत भेटले व 'तुझें कांहीं काम आहे म्हणून मला उद्यां ९ वाजतां भेट.' असा निरोप तूं भेटल्यास तुला सांगावयास सांगितला तो मी तुला सांगतो. मग तुला जायचें असलें तर जा नाहीं तर नको जाऊं." आपल्या चेहऱ्यावर पूर्वीप्रमाणें गंभीरपणा ठेऊन बाळासाहेब म्हणाला. प्रोफेसर साहेबांनीं उद्यांच मला कशाला बोलाविलें याचें कारण न समजून मी बराच घोंटाळयांत पडलो. परंतु कांहीं कारण असेल म्हणून बोलाविलें असेल जाऊन येऊं असा मी विचार करून त्या संबंधानें कांहीं बोललो नाहीं.

" मग जाशील ना तूं ? " बाळासाहेबानें विचारलें.

" हो, जाईन. कशाला बोलाविलें आहे तें पाहून येऊं. " मी म्हणालों. त्यावर शंकरराव हंसून म्हणाला,

" चिंतामणि, आपल्या भोरकरांचें बिऱ्हाड कसें आहे हें तुला पाह्यला मिळेल चांगलें ! छे बुवा ! त्यांच्यासारखा कृपण मनुष्य साऱ्या दुनियेंत—नव्हें त्रिभुवनांत सुद्धां नसेल, त्यांचा तो विचित्र पोषाक पाहून मला तर अगदीं हंसूं येतें बुवा. एवढा पगार मिळून त्याशिवाय शिकवण्या आहेत गृहस्थाला, तरी पैसे त्याला पुरत नाहींत !"

" अरे, कुटुंब मोठें असेल त्याचें म्हणून पैसे पुरत नसतील त्यांना. " मी म्हणालों.

"हो हो" हंसून शंकरराव म्हणाला " त्यांच्या घरीं फक्त तीन माणसें, त्याची एकुलतीएक मुलगी आणि—"

" एकुलती एक बायको, होय ना ? " मध्येंच बाळासाहेब म्हणाला. आम्ही तिघेही मोठमोठ्यानें हंसत सुटलों. आमच्या प्रोफेसरसाहेबांच्या लहानशा कुटुंबावरून त्याची घरची स्थिति एवढी गरिबीची नसावी असें आम्हाला वाटलें. त्याच्या पायांत जे बूट असत त्याला ठिकाठिकाणीं नव्या चामड्याच्या पट्या लावलेल्या असत. त्यानंतर मोजे, ते मळकट दिसूं नयेत म्हणून नेहमी काळ्या रंगाचेच असत व ते दिसावे म्हणून पाटलून आठ आगळें वर उड्डाण करून जात असे; ते नेहमीं 'हाफकोट' घालीत व त्याची गळपट्टी बहुतकरून नव्या कापडाची असे; ते नेहमींच खाकी शर्ट वापरीत असत. त्याचा डोक्याला बांधण्याचा रुमाल किरमिजी रंगाचा असे. त्याचे फाटके काठ दिसूं नयेत म्हणून ते काळजी घेत असत, तरी कोठें कोठें त्याचे धागे आपलें अस्तित्व प्रगट करीत असलेले दृग्गोचर होत असत. एकंदर त्यांचें वर्णन असें होतें. त्यांच्या पोषाखाबद्दल त्यांच्या अपरोक्ष सर्व विद्यार्थीवर्ग टीका करीत असे.

---

## स्मृति पंचविसावी.

# बाळासाहेबाचा विक्षिप्तपणा



बाळासाहेबानें सांगितल्यावरून मी दुसऱ्या दिवशीं बरोबर नऊ वाजतां प्रोफेसर भोरकराकडे गेलों. परंतु आंत जाण्यापूर्वी माझ्या मनांत असा विचार आला कीं, मला बनविण्याकरितां तर बाळासाहेबानें येथें येण्याला सांगितलें नाहीं ना ? बरें कधीं नाहीं मग आजच तो कशाला फसविणार आहे ? पण कांहीं असो, त्यांच्या बिऱ्हाडांत शिरून आपण कशाला बोलाविलें ? असें विचारण्याचें मला कांहीं केल्या धैर्य होईना. त्यांतून त्यांचें दुसऱ्या कोणाशीं तरी भांडण होत असावें असें त्यांच्या आरडाओरडीवरून स्पष्ट कळत असतां, आंत जाऊं नये असेंच मला वाटूं लागलें. परंतु येथपर्यंत आल्यासारखें त्यांचें

कोणाशीं एवढ्या मोठमोठ्यानें संभाषण चाललें आहे हें जाणण्याची मला प्रबळ इच्छा झाली व मी त्यांच्या दारापर्यंत गेलोहि. आंतल्या बाजूला दारासमोरच एक गृहस्थ उभा राहून त्यांना म्हणत होता,

" आपल्यासारखे सभ्य गृहस्थ जर असें करूं लागले तर काय म्हणावें ? आपण एक वेळ आम्हाला 'आर्डर' देऊन आतां नाहीं म्हणतां म्हणजे विलक्षणच नाहीं कां ? त्याच वेळीं आपण किंमतीविषयीं चौकशी करायची नव्हती कां ? "

" मी मुळीं तुम्हांला 'आर्डर' दिली नाहीं तर चौकशी कायन् कमलें काय ? हा एवढा भारी ड्रेस मला काय करायचा आहे ? तुम्ही आपला माझ्याच गळ्यात अड-कावयाला पहाता तो ! मी साफ तो ठेवणार नाहीं, आणला तसा घेऊन जा. " रागानें प्रोफेसरसाहेब म्हणत होते.

" नाहीं ठेवणार म्हणजे ? मी कांहीं तो आता परत नेणार नाहीं, मला पैसे द्यायचें असलें तर द्या, नाहीं तर कंपनी जाणो आणि तुम्हीं जाणा; केव्हापासून मी तुमची येथे वाट पाहिली आणि आता तुम्ही म्हणतां कीं मी हा ड्रेस ठेवणार नाहीं, म्हणजे याला सभ्यपणा म्हणावा कां काय म्हणावें!" तोहि जरा गरम होऊन म्हणाला.

" तो तुमचा ड्रेस पाहिजे तर फेकून द्या सडकेवर, मला काय त्याचें, मी कांहीं तो मागविला नाहीं ! " प्रोफेसरसाहेबहि क्रोधानें म्हणाले.

" कायहो ? तुम्ही असे गृहस्थ असाल हे मला नव्हते माहित. मी पण तुम्हाला सागतो पैसे घेतल्याखेरीज मी साफ जाणार नाहीं. आज तुमच्याजवळ नसतील तर तसे सागा मी उद्यां येईन घ्यायला ! " तो बाहेर पाय ठेवणार तर प्रोफेसरसाहेब ओरडून म्हणाले.

" थांबा. किती पैसे द्यायचे तुम्हाला ? "

" पन्नास रुपये. " त्याच्या मुखावर समाधानाचें हास्य दिसत होतें. प्रोफेसर साहेबाचा चेहरा माझ्या दृष्टीस पडला नाहीं व तो पडावा अशी माझी मुळींच इच्छा नसल्यामुळें त्यांनीं त्या गृहस्थाला पैसे दिले कां नाहीं हे पहाण्यापूर्वीच मी मागें पाय घेऊन सपाट्यानें सडकेवर निघून आलो. मला त्यांनीं पाहिलें नाहीं एवढें बरें झालें. नाहीं तर त्या गृहस्थावरचा राग मी त्यांचा विद्यार्थी म्हणून माझ्यावरच निघावयाचा! घरीं जातां जातां या सर्व प्रकरणाचा माझ्या डोक्यांत लख्ख उजेड पडला. आज एप्रिलची पहिली तारीख असल्यामुळें मला बाळासाहेबानें चांगलाच बनविण्याचा बेत केला होता. प्रोफेसरसाहेबांनाहि कोणी तरी बनविलें असले पाहिजे कारण त्यांच्यासारखा कृपण मनुष्य पन्नास रुपयाचा ड्रेस कधींहि विकत घेणार नाहीं व त्यांनीं तो मागविला नव्हता असें त्यांच्या भाषणावरून दिसत होतें. त्यांना आज केवढा चट्टा बसणार आहे याचें मला राहून राहून हंसू येत होतें.

कॉलेजांत गेल्यानंतर मला बाळासाहेब भेटला, परंतु कॉलेजांत आम्हाला

एकांतांत बोलावयाला वेळ मिळाला नाहीं. आम्ही दोघे एकटेंच आहोंत हें जाणून मी बाळासाहेबाला म्हणालो,

" वा रे बाळासाहेब तूं तरी मोठा विक्षिप्त प्राणी आहेस अगदीं ? "

हंसें आवरून तो म्हणाला " काय केले मी ? "

" आणखी काय करायचें बाकी होतें ? मला प्रोफेसरसाहेबाकडे कशाला पाठविलेंस आज ? त्यांनीं मला बोलविलें नसतांही मला तेथें जायला सांगितलेंस ! बरें, तरी मी त्यांना भेटून तसें कांहीं विचारलें नाहीं. तुझा उद्देश मला वेळींच कळून आला म्हणून बरें झालें ! "

" म्हणजे ? तूं त्याच्या येथें गेला नाहींसच वाटतें ? " आश्चर्यानें बाळासाहेब म्हणाला.

" नाहीं कसा, गेलों होतों; परंतु त्यांचें एका एजंटाशीं भांडण होत होतें म्हणून मी त्यांना न भेटतां गुपचुप पळ काढला. "

मोठ्यानें हंसून तो म्हणाला. " अरे, तेवढ्याचसाठीं मी तुला तेथें जायला सांगितलें, त्यांनीं त्या एजंटाला काय सांगितलें मग ? "

" त्या एजंटाला त्यांच्याकडे पाठविण्याचें तुझेंच कारस्थान एकूण ! " तो हंसतच होता. " त्यांना बिचाऱ्यांना एवढ्या खर्चांत कशाला तूं घातलेंस ? " माझें हंसूं दाबून मी म्हणालों.

" काय करणार, म्हटलें असें ते कधींच नवा सूट घेणार नाहींत, म्हणून ही युक्ति केली, पण कोणाला सांगूं नको हो. तुलाच म्हणून मी सांगतो, आणखीहि तुला एक मौज पाहायला मिळेल. " हंसत हंसत तो म्हणाला.

आणखी कोणावर तुझी वक्रदृष्टी फिरली आहे बुवा ? " मी जरा आश्चर्यानें म्हणालों.

" तें आज नाहीं सांगणार ! "

" काय रे ! पण तूं त्यांच्या नावानें कंपनीला असें कळविलेंस; तुला ओळखणार नाहीं कां कंपनीचा एखादा मनुष्य ? " मी म्हटलें.

" त्याची नको काळजी ! मी टेलिफोनमधूनच कंपनीला कळविलें आहे. " बाळासाहेबांचें शेवटलें वाक्य पुरें होण्यापूर्वी आमच्या ओळखीचें दुसरें दोघे जण तेथें आलें म्हणून आमचें बोलणें तितकेंच राहिलें.आम्ही सर्वजण बाहेर पडलों. बोलत बोलत बाहेर चाललों होतों, इतक्यांत केशवरावावर माझी नजर गेली. तो बाळासाहेबाकडे पाहून गालांतल्या गालांत हंसत असावा असें मला वाटलें. परंतु तो कां हंसत आहे याचें कारण मला कळलें नाहीं.

त्यानंतर मध्यंतरीं तीनचार दिवस गेले. पांचव्या दिवशीं आम्ही क्लासमध्यें बसलों होतों, आमचें प्रोफेसर भोरकर आम्हांला शिकविण्याकरितां नुक्तेच क्लासमध्यें दाखल झाले होतें. इतक्यांत एक पट्टेवाला शिपाई दरवाज्यांत येऊन म्हणाला, "मि.

देशमुख आणि सी. देशपांडे यांना साहेब बोलावीत आहेत." माझें नांव घेतांच मला चमत्कारिक वाटलें. आमचे प्रोफेसरसाहेब माझ्याकडे व नंतर बाळासाहेबकडे वक्रदृष्टिपात करून म्हणाले,

"जा. तुम्हाला दोघांना प्रिन्सीपालसाहेब बोलावीत आहेत" त्या नंतर ते कांहींच बोलले नाहींत. मी व बाळासाहेब प्रिन्सपालकडे जावयास निघालों. क्लासातून बाहेर पडल्यावर मी बाळासाहेबला हलकेंच म्हणालों

"कशाला रे आपल्या दोघानांच बोलाविलें आहे?"

माझ्या मनांत एक कल्पना आली आहे." बाळासाहेब माझ्याकडे पाहून हंसून म्हणाला.

"छे बुवा! माझ्या कांहींच लक्षात येत नाहीं." प्रिन्सिपालसाहेबापुढें जाईपर्यंत आम्ही कांहींच बोललो नाहीं. प्रिन्सिपाल आपल्या खासगी खोलींत बसले होते. त्यांची परवानगी घेऊन आम्ही दोघे आत त्यांच्यासमोर जाऊन उभे राहिलों. आमच्याकडे पाहून ते गंभीरपणानें म्हणाले,

"मि. देशमुख, तुम्ही गैरवर्तन केल्याबद्दल तुमच्या संबंधानें तकरारी माझ्याकडे आल्या आहेत."

"माझ्या हातून कांहीं गैरवर्तन घडलें असेल असें मला वाटत नाहीं." न डगमगतां बाळासाहेब म्हणाला. "तरी पण माझ्यावरचे आरोप मला कळतील तर बरें होईल."

"पहिला आरोप तुम्ही एके प्रसंगीं वर्गात शिस्तीविरुद्ध गायन केलेंत हा होय."

"होय, त्याबद्दल मी प्रोफेसरसाहेब भोरकर यांची क्षमा मागितली होती व पुढें असें न करण्याबद्दल त्यांनीं मला बजावलें होतें व मी त्यानंतर वर्गांत कधींहि गाणें म्हटलें नाहीं." निर्भीडपणानें तो म्हणा. माझा जीव मात्र खालीवर होत होता. प्रिन्सिपाल पुढें म्हणाले,

"प्रोफेसर भोरकर यांना माहित नसतां त्यांच्यासाठीं सूट पाठविण्याची 'आर्डर' कोणी दिली?"

आपले बेंड बाहेर पडलें असें वाटून मला मनांतून भीति वाटली, परंतु बाळासाहेब जसा ताठ उभा होतां तसाच होतां. तो किंचित हास्य करून म्हणाला,

"सर, आपणास ही गोष्ट कशी कळली तें कळत नाहीं; आणि ती गोष्ट मी नाकबूल करीत नाहीं. प्रोफेसरसाहेबांचा नेहमीचा ड्रेस अगदीं जुना झाला असल्यामुळें, त्यांना नव्या ड्रेसची जरूर आहे हें जाणून मी तसें केलें खरें," यावेळीं प्रिन्सिपालसाहेबांना हसूं आल्याखेरीज राहिलें नाहीं. ते म्हणाले,

"मि. देशमुख, अशा रीतीनें बिचाऱ्या प्रोफेसरला एवढा किंमतीचा ड्रेस घ्यायला लावणें गैर होय, तेवढा खर्च करण्याची त्यांची स्थिति नसेल कदाचित् किंवा इच्छा नसेल. खरोखरीच तुमचें हें वर्तन अगदीं गैर आहे."

" वास्तविक पाहतां प्रोफेसरसाहेबांची तशी कांहीं स्थिति नाहीं, परंतु माझ्या वर्तनाचा आतां मला पश्चात्ताप होत आहे. प्रोफेसरसाहेब जर कबूल असले, तर त्या सूटची किंमत द्यायला मी तयार आहे. " येणारे हंसू दाबण्याचा प्रयत्न करून व मुद्रेवर गंभीरपणाचा आव आणून बाळासाहेब म्हणाला. प्रिन्सिपाल साहेबांनींहि हंसें दाबून शक्य तितकें चेहऱ्यावर गांभीर्य आणलें होतें. बाळासाहेबानें जो हा वात्रटपणा केला होता त्याला मींहि साह्य केलें असावें, असें जाणून आम्हाला दोघांना साहेबांनीं बोलाविलें असावे असें आतां मला वाटूं लागलें. परंतु बाळासाहेबानें मला त्यासंबंधानें बिलकूल कळविलें नव्हतें व मला त्यानें स्वतः सांगेपर्यंत कांहींच माहित नव्हतें. ही गोष्ट प्रिन्सिपालच्या कानावर जाण्यास मुख्यत्वेंकरून केशवरावच कारण असावा असा माझा दृढ ग्रह होऊं लागला. आमचें भाषण त्यानेंच चोरून ऐकलें असावें व त्याचें आणि बाळासाहेबाचें वाकडें आल्यामुळे बाळासाहेबाला शिक्षा व्हावी या हेतूनें त्यानें प्रोफेसरसाहेबाना सूट कोणी धाडला हें प्रोफेसरसाहेबांना तिखटमिठ लावून सांगितले असावे. प्रोफेसरसाहेबाचा प्रथमपासूनच बाळासाहेबाबद्दल चांगला ग्रह झालेला नसल्यामुळें बाळासाहेबानेच त्याना तो सूट धाडवयास लाविल्यामुळें ते त्याच्यावर जास्तच चिडण्याचा संभव होता. असें हलकटपणाचें कृत्य केल्याबद्दल केशवरावांविषयीं माझा तिरस्कार अधिकच वाढला. प्रिन्सिपालसाहेब रागावून अखेरीस आम्हां दोघांना कॉलेजमधून गच्छंती करावी लागते कीं काय अशी भीति माझ्या हृदयांत उत्पन्न झाल्याविना राहिली नाहीं. परंतु प्रिन्सिपालसाहेबांच्या मुद्रेवर तसें कांहीं चिन्ह दिसत नव्हतें. बाळासाहेबांचें वाक्य पुरें झाल्यावर ते क्षणभर स्तब्ध बसले होते. त्यानंतर टेबलावरील कांहीं कागद बाजूला सारून त्यांनीं एक टाईप केलेला लखोटा उचलून बाळासाहेबापुढें धरला व त्याला म्हणाले. " देशमुख, हें पत्र तुम्ही टाईप केलें काय ? "

बाळासाहेबाचा चेहरा पूर्वीप्रमाणेंच होता. हें आणखी नवीन प्रकरण काय आहे, हें न कळून मी आश्चर्यानें बाळासाहेबाच्या मुखाकडे पाहूं लागलो. प्रिन्सिपालसाहेबाच्या हातातून तें पत्र घेऊन त्यानें एकदां वाचून पाहिलें व नंतर टेबलावर ठेऊन तो म्हणाला,

" सर, हें पत्र मींच टाईप केलें आहे व आणखी दुसरीहि केलीं आहेत. जी गोष्ट मी केली ती मी कधींच नाकबूल करणार नाहीं. "

" अशा रीतीनें प्रोफेसर्सना फसविण्यांत तुमचा काय उद्देश होता ? " प्रिन्सिपालसाहेबांच्या भाषेंत जरा कठोरपणा होता. शांतपणें बाळासाहेब म्हणाला,

" सर, जे दिवशीं प्रोफेसर्स आपल्या घरीं आले होते, तो दिवस एप्रिलच्या पहिल्या तारखेचा असल्यामुळें आपणांस त्यांनीं भेटावें असें मला वाटलें. " आपलें ओठ जोरानें दाबून प्रिन्सिपालसाहेब म्हणाले:-

" तुम्ही तुमच्या शिक्षकांची थट्टा केल्याबद्दल तुम्हाला जबर शिक्षा होईल याची तुम्हांला आठवण झाली नाहीं कां ? "

" मी जे हे गुन्हे केले आहेत त्याबद्दल आपण जी शिक्षा कराल ती भोगायला मी तयार आहे. परंतु या देशपांडेचें त्यांत मुळींच अंग नाहीं. त्याला यांतलें कांहींच माहित नाहीं. आपण मला एकट्यालाच शिक्षा करावी." निर्धास्तपणानें बाळासाहेब म्हणाला. इतका वेळपर्यंत प्रिन्सिपाल्साहेब आपल्या मुखावर गंभीरपणा आणून बसले होते. पण आतां फार वेळ त्यांना तसें बसणें अशक्य वाटूं लागलें. बाळासाहेबाला काय शिक्षा करावी याचा निर्णय न होऊनच कीं काय ते मोठमोठ्यानें हंसत सुटले. त्यांना हंसतांना पाहून बाळासाहेबहि हंसूं लागला व मलाहि माझा गंभीरपणा कायम ठेवितां येईना. आमचे प्रिन्सिपाल स्वतःहि फार गमती असल्यामुळें बाळासाहेबाच्या या थट्टेखोरपणाबद्दल त्याला कांहीं एक शिक्षा न करता, उलट त्यांनाहि गम्मतच वाटली. परंतु पुढें असला वात्रटपणा न करण्याबद्दल त्यांनीं आम्हा दोघांना सांगून ठेविलें. बाळासाहेबाला मी मदत केली असावी अशी अद्यापहि त्यांची समजूत असावी असें वाटलें. असो; आम्हांला त्यांनीं क्लासमध्यें परत जाण्याला सांगितलें. त्या दिवसापासून प्रिन्सिपालसाहेबांची बाळासाहेबांवर विशेषच मर्जी बसली. बाळासाहेबांसारखा निष्कपटी, मोकळ्या मनाचा व विनोदी विद्यार्थी आपल्याला आवडतो असें एकप्रसंगीं त्यांनीं बोलूनहि दाखविलें होतें.

प्रिन्सिपालसाहेबांच्या खोलींतून आम्ही बाहेर पडतांच, बाळासाहेब आपल्या पोटावर होन्ही हात ठेऊन मोठमोठ्यानें हंसत सुटला. कांहीं केल्या त्याचें हंसूं आवरेना; मलाहि विलक्षण हंसूं येत होतें. हंसण्याचा पहिला ओघ संपल्यावर बाळासाहेबानें हंसूं नये म्हणून मी त्याला म्हणालों, " बाळासाहेब, पुरें झालें, किती हंसतोस रे, तुझ्या हंसण्याला कांहीं तरी सीमा !"

"अरे; काय करूं ? प्रिन्सिपालच्या खोलींत असताना मी माझें हंसूं मोठ्या जुलमानें आवरत होतों; परंतु त्यांच्यापासून दूर होतांच इतका वेळ दाबून ठेविलेलें हंसें माझें हृदय फोडून बाहेरच येत आहे. त्याला काय करावें ?" दर शब्दाला तो हंसतच होता.

" बाळासाहेब, अति हंसणेंहि चांगलें नाहीं. चल क्लासमध्यें, त्वकर " मी म्हणालों.

" चिंतामणि, थांब जरा, माझें हसणें एकदां पुरें होऊं दे; क्लासात गेल्यावर प्रोफेसरसाहेबांच्या त्या निराशपूर्ण चेहऱ्याकडे पाहून मला पुनः हंसण्याचा उमाळा आल्याशिवाय रहाणार नाहीं." मलाहि पुनःपुनः हंसूं येतच होतें.

" आपल्याला शिक्षा न झाल्यामुळें बिचाऱ्याची फार फार निराशा होईल. याचेंच मला फार वाईट वाटतें," हंसून हंसून दमल्यावर बाळासाहेब म्हणाला. आणि खरोखरींच आम्ही क्लासांत गेल्यावर आमच्या तोंडावरून शिक्षा झालीसें न दिसल्यामुळें प्रोफेसरसाहेबांची निराशा झाली असली पाहिजे, असें दिसत होतें. केश-

चरावहि जरा खिन्न झाल्यासारखा दिसत होता. आम्हाला दोघांना प्रिन्सिपालनें कां बोलाविलें व आम्ही दोघे इतका वेळपर्यंत त्यांच्याजवळ काय करीत होतों याचें कारण इतरांना न कळून ते आमच्याकडे कुतूहलानें पहात होते. क्लास केव्हां पुरा होतो व आपल्याला या दोघांचें गौप्य केव्हां कळेल असें विचाऱ्या शंकररावाला झालें असावें असें त्याच्या चळवळीवरून दिसत होतें. क्लास पुरा होतांच रीसेसमध्यें सर्व-जण टोळधाडीसारखे आमच्या भोंवती जमा झाले व प्रिन्सिपालसाहेबांकडे कां गेला होतात म्हणून विचारूं लागले. आतां त्यांतले कांहींच छपवून ठेवण्याची जरूर नाहीं हें जाणून मी घडलेली सर्व हकीकत सांगितली. सर्वांनांच विलक्षण हंसूं येऊं लागलें जो तो आपला हास्यध्वनी उंच स्वरांतच काढूं लागला. आमच्या प्रचंड हास्याचे मजले इतक्या उंच चढले कीं इतर विद्यार्थीहि आमच्यांत येऊन मिळाले व तेही आपल्या हास्याचें मजले आणखी उंचाऊं लागले. बिचारा केशवराव पूर्वीच ओळखून आमच्यात आला नाहीं. ही गोष्ट हळुंहळुं सर्व कॉलेजभर सर्वांना कळली. सर्व प्रोफेसर्सनां बाळासाहेबाचें हे कृत्य कळले, परंतु भोरकर प्रोफेसर-शिवाय बाळासाहेबावर कोणीच रागावले नाहींत. उलट त्याच्या विनोदीपणाची सर्वांना मौजच वाटली. त्या दिवसापासून सर्वजण बाळासाहेबाला चांगल्या रीतीनें ओळखूं लागले. बाळासाहेबानें हा सर्व उद्योग केव्हां केला हें मलासुद्धां कळलें नाहीं. अशारीतीनें तें पी. ई. मधले दिवस किती लवकर निघून गेले हें कळलें सुद्धां नाहीं. बाळासाहेब नेहमीं कोणाची ना कोणाची तरी थट्टा करून सर्वांना हंसवीत असे; कधींकधीं प्रोफे-सर्स व कधीं खुद्द प्रिन्सिपालसाहेबांचीहि थट्टा करावयास तो चुकत नसे. परंतु त्याच्या थट्टेत हलकटपणाचा भाग मुळींच नसे. बाळासाहेबाच्या सहवासांत तें वर्ष किती लव-कर गेलें असें मला वाटूं लागले. मॅट्रिकच्या परिक्षेंतून मोकळा झालों नाहीं तोंच पी. ई. ची परिक्षा दोन दिवसावर येऊन ठेपली असें मला वाटूं लागलें.

पी. ई. ची परिक्षाहि आम्ही देऊन चुकलो. परिणाम कळावयास अद्याप उशीर होता. कॉलेजच्या वार्षिक संमेलनाच्यावेळीं एकाद्या चांगल्या नाटकाचा प्रयोग कर-ण्याचे आम्हीं सर्वांनीं ठरविलें. विशेषेंकरून बाळासाहेबानेंच त्यांत जास्त पुढारीपणा घेतला होता. तो जे म्हणेल तें आम्हाला सर्वांना पसंत पडत असे. तेव्हां आम्हांला सर्वांना ती गोष्ट अर्थातच पसंत पडली व नाटकाच्या तालमीला सुरवात झाली. ज्या-वेळीं प्रथम मी नाटक मंडळींत राहून प्रथमच रंगभूमीवर आलो होतो त्यावेळीं माझी कोण तिरपीट, त्रेधा उडून गेली होती ? पण तोच मी आज रंगभूमीवर कसें करावें याची प्रमुखपणें दुसऱ्याना समजूत करून देत होतो. रंगभूमीवर कसें काम करावें याची साधारणपणें मला माहिती असल्यामुळें नाटकांत भाग घेणाऱ्या विद्यार्थ्यांना तालीम देण्याचें काम माझ्याकडेच बाळासाहेबानें दिलें होतें. ज्या दिवशीं आमचें संमेलन होतें तें दिवशीं सर्व प्रोफेसर्स व स्वतः प्रिन्सिपालसाहेब आपल्या मेमसाहेबासह हजर राहणार होते व इतरहि बरीच बडीबडी पाहुणेमंडळी येणार होती. त्यामुळें

आम्ही विशेषच हुरूपानें आपआपलीं कामें करीत होतो. यशाचा सर्वच वाटा बाळासाहेबाला मिळूं नये म्हणून केशवरावहि आमच्यांत होतांच. संमेलनाचे दिवशीं तो मारे उगाच इकडून तिकडे व तिकडून इकडे घाईघाईनें हेलपाटे घालीत होता; त्याच्या कामाची कोणी चौकशीहि करीत नव्हते, कोणी त्याला कांहीं कामहि सांगत नव्हतें. आमच्या नाटकाचा प्रयोग सर्वांत फार चांगला वठला असें जे ते म्हणूं लागले. आम्ही मराठीनाटकाचा एक प्रयोग व इंग्लिशनाटकाचा एक प्रयोग केला होता. मराठींतले प्रिन्सिपालला फारसें कळले नाहीं, तरी इंग्लिशप्रयोगाबद्दल त्यांनीं प्रशंसोद्गार काढले. बाळासाहेबाला मला व इतरांनाहि त्यांनी शाबासकी दिली. आमचे प्रोफेसर भोरकर म्हणालेः—

" यांत केशवरावनेंहि फार चांगली मदत केली. बाहेर सर्व काम तोच करीत होता."

" छे, छे, सर! याचे वास्तविक खरें श्रेय चिंतामणिकडेच आहे." बाळासाहेब प्रिन्सिपालच्या समक्ष एकदम म्हणाला. " यांत केशवरावनें कांहींच केले नाहीं. जर चिंतामणीनें आम्हांला चांगली तालीम दिली नसती. तर नाटकांतला भाग आम्हाला चागल्या रीतीनें वठवितां आला नसता."

" केशवरावनें कांहींच केलें नाहीं असे तुमचे म्हणणें आहे वाटते देशमुख?" प्रोफेसर जरा चिडून म्हणाले.

" कांहींच केले नाहीं असें नव्हे; नाटकात कांहींच केले नाहीं असे कोण म्हणतो. खुर्च्याटेबले इकडच्या तिकडे व तिकडच्या इकडे उचलण्याचें काम केलें आहे. तें तर शिपायानेंहि केलें असतें!" बाळासाहेबहि जरा रागानेच म्हणाला. बाळासाहेब विनाकारण आपल्यावर त्यांचा राग ओढून घेत आहे असें मला वाटूं लागले. त्यावेळीं प्रिन्सिपाल मध्यें पडलें नसतें तर तें भांडण विकोपास गेलें असतें. बाळासाहेब जेवढा उतावळा तेवढाच रागीट, जेवढा रागीट तेवढाच भडभड्या व निष्कपटी स्वभावाचा होता. हें त्याच्या इतक्या दिवसांच्या सहवासावरून मला चांगलेंच समजलें होतें. प्रोफेसरसाहेबापासून आम्ही दूर गेल्यावर मी बाळासाहेबाला म्हणालो. " बाळासाहेब तूं विनाकारण त्यांना जेव्हां तेव्हां चीड येण्याला कां कारण होतोस? केशवरावानें चांगले काम केले असें तें म्हणाले तर त्यांत 'हो' म्हणायला तुझें काय बिघडलें असतें?"

" काय म्हणून? केशवरावानें काय केले तें मला सांग. केशवरावाने जर कांहीं केलें नाहीं; जें केलें, ते आपल्याला मध्येंमध्ये व्यत्यय आणण्याचें होय. खरोखरींच जर त्यानें कांहीं केलें असतें तर तसें सांगण्याला मला कांहींच हरकत नव्हती. परंतु कोणी खोटे बोललें कीं मला फार चीड येते. खरें पाहिलें असतां प्रयोग उत्तम वठण्याला मेहनत सारी तुझी; आणि हा केशवराव मध्येंच चांगुलपणा उपटणारा कोण? प्रोफेसरसाहेबांना राग आला तरी त्याची मला परवा नाहीं. माझ्यासमक्ष कोणी खोटें

बोललें की मला तें कधींच सहन व्हायचें नाहीं. मग त्यापासून माझ्यावर कोणताहि प्रसंग आला तरी त्याची चिंता नाहीं. " बाळासाहेब भुवया वर चढवून म्हणाला. त्याच्याजवळ अधिक वाद करण्यांत कांहीं हंशील नाहीं, हें जाणून मी गप्प बसलो.

---

## स्मृति सव्विसावी.

# जुन्या मित्राची भेट.



आम्ही हल्लीं सीनियर बी, ए. त होतो, हा मध्यंतरीचा काल किती लवकर गेला हें कळलेंसुद्धा नाही. तसेंच महत्त्वाचें प्रसंगहि विशेष आले नाहींत. शंकरराव बाळासाहेब व मी दरवर्षी पास होत गेल्यामुळें आमचा अद्याप वियोग झाला नव्हता. परंतु बी. ए. झाल्यावर बाळासाहेब विलायतेस जाणार हा विचार मनांत येऊन मला कसेंसेंच वाटे ! बी. ए. च्या वर्गांत येतांच बाळासाहेबांनीं पुनः आपल्या वडिलांच्या मागें टुमचण लाविली. विलायतेस जाण्याची जेव्हां बाळासाहेब गोष्ट काढी, तेव्हा बापुसाहेबांच्या चेहऱ्यावर औदासीन्य पसरून ते खिन्नपणें दीर्घ श्वास सोडीत असत. आपल्या पित्याच्या मर्जीविरुद्ध त्यानें जाऊं नये असें मला फार वाटे, परंतु आतां बाळासाहेबास तसे सागण्यांत अर्थ नव्हता. जाण्याची त्यानें अगदीं उचल केली होती, त्याला सर्वांना सोडून जाण्यास आनंद वाटत होता असे नाहीं. परंतु कठीण मन करून जावे व दोन वर्षांनंतर आपण परत यावें असें त्याला वाटत होतें. बरे त्याला पैशाचीहि पूर्ण अनुकूलता होती, तो मला येण्याविषयीं आग्रह करीत असें, पण त्याची व माझी गोष्ट फार वेगळी होती. तो मला पैसे पुरविण्यालाहि कबूल झाला होता, पण पुढे कांहीं कारणाने मला जातां आलें नाहीं !

केशवरावहि आमच्या बरोबर आमच्याच क्लासात होता. त्याचे व बाळासाहेबाचे पूर्वीसारखेंच होतें ! मला माझ्या घरची व माझ्या पित्याची स्मृति होत नव्हती असें नाहीं; परंतु आता तशी पूर्वीसारखी तीव्र भासत नव्हती एवढी गोष्ट खरी. आपल्या पित्याला आपली जरूर नाहींच, असा माझा कायमचा ग्रह बनून गेला. आपल्या मातेच्या मागें पित्याचाहि संबंध तुटला कीं काय असें माझ्या मनात अनेक प्रसंगीं येत असे. मोहनलालचा अभ्यास चांगला चालला होता.मणीबेनचा नवरा सुंदरलाल विलायतेस जाऊन बॅरिस्टर होऊन आला होता व त्यानें मुंबईंतच प्रॅक्टिस सुरू केली होती. मगनलालचा अद्याप पत्ता नव्हता. उत्तरोत्तर मी पास होऊन लवकरच बी. ए. होईन म्हणून शेटसाहेब आनंद व्यक्त करीत. अद्याप मी त्यांच्याच घरीं होतो हें सांगण्याची जरूर नाहीं.

बाळासाहेबाच्या आग्रहावरून मी व शंकरराव गेल्यावर्षी मे महिन्यांत त्यांच्या-

बरोबर हैद्राबादेस त्यांच्या वतनगांवीं जाऊन आलों होतों. महिना दीड महिना एकत्र राहील्यावरून सगुणेच्या सुस्वभावाची आम्हांला परीक्षा करतां आली. बाळासाहेबाला सुख व्हावें म्हणून सगुणा किती तरी काळजी घेत असे; स्वतःच्या श्रमाकडे ती बिलकूल पहात नसे. स्वतःच्या कोणत्याही बाबतींत बाळासाहेबाला काळजी घेण्याची जरूर नसे व तो ती मुळींच घेत नसे. घरांत सर्व व्यवस्था ठेवण्याचें काम सगुणेकडेच असे व ती तें उत्तमप्रकारें पार पाडीत असे. एखाद्या अनुभवशीर वृद्ध आजीबाईप्रमाणें ती गृहव्यवस्थेंत सदोदीत दक्ष असे. ती हल्लीं मॅट्रिकच्या क्लासमध्यें होती. मॅट्रिकपर्यंतच तिला शिकावयाचें होतें. आपला अभ्यास करून तिला इतक्या उत्तमपणें गृहव्यवस्था कशी ठेविता येते, याचें मला आश्चर्य वाटत असे. त्या शिवाय गायन, वादन, शिवणकाम वीणकामांतहि ती कुशल होती. आमच्याशीं मोकळेपणानें ती जरी वागत होती, तरी तिचें वर्तन अगदीं मर्यादशील होतें व तिच्या मुद्रेवर एकप्रकारचा गंभीरपणा नेहमीं असे. जेव्हां जेव्हां बाळासाहेब तिच्या दृष्टीस पडे तेव्हां तेव्हा तिचें मुख आधिकच प्रफुल्लित होत असे. बापुसाहेबाहि तिला आपल्या कन्येसारखी लेखून कोणत्याच बाबतीत तिला न्यूनता वाटेल असें दर्शवित नसत. आम्ही तिघां मित्रांनी तो काल मोठ्या मजेंत घालविला. तेथें बाळासाहेबाच्या पुष्कळ स्नेह्यांच्या व आमच्या ओळखी झाल्या. जेथे तेथें बाळासाहेब लोकप्रियता मिळवीत असे.

यंदा मी व बाळासाहेबांनीं आपल्या घरीं यावें म्हणून शंकररावांनीं फार आग्रह केला व आम्ही दोघांनी ती गोष्ट कबूल केली. आमच्या जाण्याच्या आदल्या दिवशीं मला नोकरानें एक चिठ्ठी आणून दिली; वरचें अक्षर मी तात्काळ ओळखलें; तें बाळासाहेबांचें होतें. चिठ्ठींत एवढें बाळासाहेबांनीं काय लिहिलें आहे म्हणून मी घाईघाईनें वरचा लखोटा फाडून वाचूं लागलो, त्यांत पुढील मजकूर होता.

"आज आमच्या गावाहून तार आली आहे तेथे कांहीं वतनासंबंधीं भानगड उपस्थित झाल्यामुळें आम्हाला तावडतोब तेथें जावें लागत आहे. जाण्यापूर्वी तुला भेटावयास मिळालें नाहीं याचें मला वाईट वाटतें. शंकररावला कबूल केल्याप्रमाणें त्याच्याबरोबर मला येतां आले नाहीं, त्याचेंहि वाईट वाटलें. तूं त्याला माझ्या जाण्याचें कारण सांग. मी जर लवकर आलों व तुम्ही दोघे शंकररावकडेच असलात तर मी जरूर तेथें येईन. जाण्याची वेळ झाली आहे. फार लिहिण्यास वेळ नाहीं."

तेवढ्याच ओळी; परंतु त्या अगदी घाईघाईनें लिहीलेल्या होत्या. त्यावरून त्याला जाण्याला तसेंच कांहीं जरूरीचें कारण असावें असें मला वाटूं लागलें. बाळासाहेब आमच्याबरोबर येता तर आम्हांला किती आनंद झाला असता हें सांगण्याची अवश्यकता नाहीं. तो येणार नाहीं म्हणून माझी अगदीं निराशा झाली! जाण्यापूर्वी त्याला भेटावयासहि मिळालें नाहीं म्हणून मला वाईट वाटलें.

बाळासाहेबाची व माझी ओळख झाल्याला चार वर्षे होत आलीं होतीं. इतक्या कालांत आमचा वियोग अद्याप झाला नव्हता. गेल्या वर्षी आम्ही सर्वच हैद्राबादेस गेलों होतों व त्यापूर्वी बापुसाहेब दोन वर्षांत हैद्राबादेस गेलेच नाहींत व त्यामुळें आमचा वियोग होण्याचा प्रसंग अद्यापपर्यंत आला नव्हता. बाळासाहेब असा अकस्मात् हैद्राबादेस गेल्यावर मी एकटाच शंकररावबरोबर त्याच्या घरीं गेलों. परंतु बाळासाहेबाचें विस्मरण मला एक क्षणभराहि झालें नाहीं. शंकररावाला दोन बहिणी होत्या. पैकीं वडील शंकररावपेक्षां बरीच मोठी होती व धाकटी शंकररावपेक्षां दहा वर्षांनीं तरी लहान होती, त्यांचे वडील स्वभावानें फार सज्जन गृहस्थ होते. मी तेथें असेपर्यंत दादासाहेब '–शंकररावचे वडील–माझ्यावर अगदीं शंकररावप्रमाणें प्रेम करीत. शंकररावच्या घरची सर्वच मंडळी सुस्वभावाची होती. त्याची वडील बहिण ताई ( हिला सर्व ताई म्हणत व मीहि ताईच म्हणत असे ) दोन तीन वर्षे माहेरीं आली नसल्यामुळे आम्ही जाण्यापूर्वी पंधरा दिवसापासून ती आपल्या घरून आली होती. तिचा नवरा बडोदेसंस्थानांत एक अंमलदार होता. तिला तीन अपत्ये होतीं. वडील मुलगी त्यावेळीं सुमारे बारा वर्षांची असून तिचे नांव मंजुळा होतें, परंतु सहज बोलण्यांतहि तिच्या अवाजांत फार माधुर्य असल्यामुळें तिचा बाप थट्टेने तिला ' मधुरी ' म्हणत असे व तेंच तिचें नांव सर्वतोमुखी झाले होतें. दिसण्यात ती साधारणच होती. परंतु तिच्या चेहऱ्यात एक प्रकारची आकर्षक शक्ति होती. तिचे नेत्र नीलवर्णाचे असून त्याचे तेज विलक्षण चमकून पौर्णिमेच्या चंद्रासारखे नयनास आनंद देत. मनोहर व त्याच्यापेक्षां लहान शरद असे दोघे भाऊ तिला होते. शंकररावची धाकटी बहिण सुशीला मधुरीच्या बरोबरीचीच होती. ती त्यांच्या घरांत देखणी होती. हल्लीं शंकररावच्या कुटुंबांत इतकी मंडळी होती. मी शंकररावच्या येथें गेल्यावर दोन तीन दिवस झाले असतील; मी व शंकरराव संध्याकाळच्या सुमारास माडीवर त्याच्या खोलींत होतो. आम्ही बाहेर फिरावयास जाण्याच्या तयारींत होतो, मी कपडे घालून एका कापडाच्या आरामखुर्चीवर एका पदाचें चरण गुणगुणत पडलों होतों, व शंकरराव खिडकीजवळ उभा राहून कपडे घालीत होता. खिडकींतून खालीं रस्त्यावर नजर टाकून शंकरराव कोणाकडे तरी पाहून हंसला व लगेच म्हणाला,

" या, मास्तर, वर तर या. तुमची स्वारी दोन तीन दिवसांत कोठे दिसली नाहीं ती ? या, या, वर या. आमच्या एका मित्राची आणि तुमची ओळख करून देतो. "

" हो, हो, आलोंच. " असा अपरिचित शब्द माझ्या कानावर आला.

" कोणरे हे मास्तर शंकरराव ? " मी म्हणालों.

" ते वरच येताहेत, त्यांची व तुझी आतां प्रत्यक्षच ओळख करून देतों. फार चांगला माणूस आहे. त्यांची व माझी नुकतीच ओळख झाली. मध्यंतरीं मी येथें आलों

होतो ना ? तेव्हांच आमची ओळख झाली. त्याच सुमारास ते येथें आले. " शंकररावच्या तोंडचें वाक्य पुरें होते तोंच एक आमच्या वयाचा तरुण दारांत उभा राहिला. हे मास्तर असावें असा मी तर्क केला. शंकररावनें ज्या मास्तरांना संबोधिले ते मास्तर बरेच प्रौढ असावे अशी माझी पहिली कल्पना होती. मास्तर दारांत उभे राहून माझ्याकडे अगदीं टक लावून पहात होते व त्यांनां मीहि कोठें तरी पाहिलें असावें असें वाटून त्यांच्याकडे टक लावून पाहूं लागलो. आमच्या या वेडगळपणाच्या वर्तनाकडे पाहून शंकरराव हंसत होता. इतक्यांत मास्तर घाईनें पुढें येऊन व एकदम ओरडून म्हणाले.

" कोण ? चंदू ? "

आतां मीहि माझ्या जागेवरून ताडकन उठून ओरडलों,

" बाबूराव ! " आम्हीं दोघांनीं एकमेकाला कडकडून आलिंगन दिले. आज किती तरी वर्षांनीं माझ्या बाळपणाच्या प्रेमळ मित्राची मला भेट झाली ! तो बाबूरावच होता; पूर्वीच्या व आजच्या त्याच्या चेहऱ्यांत केवढा तरी विलक्षण फेर पडला होता ? आम्ही एकमेकांकडे मुकस्तंभासारखे किती तरी वेळ पहात होतो ! क्षणांत हंसत होतो. क्षणांत रडत होतो ! एकाच्याहि मुखांतून शब्दोच्चार होत नव्हता.

" चिंतामणि, ही काय बुवा भानगड आहे ? मला तर कळूं दे ! असे दगडासारखे एकमेकाकडे किती वेळ तुम्ही पहात राहणार ? " अखेरीस शंकरराव म्हणाला.

" शंकरराव, हा माझा हरवलेला बालमित्र चंदू आज मला येथें असा अचानक भेटेल असें मला कोणी सांगितलें असतें तरी सुद्धां खरें वाटलें नसतें. मी स्वप्न तर पहात नाहींना ? असा मला भास होतोय. चंदू, चंदू, खरोखरीच तूं चंदूचना ? " तो जोरानें मला हालवून म्हणाला.

" बाबू, मीच तो दुर्दैवी चंदू आहे याची अजूनहि तुला शंका वाटते का ? "

" पण चंदू, तूं इतके दिवस कोठें दडी दिली होतीस ? ते मला साग पाहूं प्रथम. "

" ती सर्व हकीकत तुला मी मग सांगेन, पण माझ्या घरची हकीकत तुला जी माहीत असेल ती साग आधीं, मी घरून निघाल्यापासून मला घरचा कांहींच समाचार कळला नाहीं. "

" पण मी म्हणतो चंदू, तूं असा कोणाला न कळवितां घरांतून कां निघून गेलास ? तूं असा मूर्खपणा करशील या गोष्टीवर प्रथम माझा विश्वास देखील बसेना, भाऊ रागावले म्हणून तूं घराचा त्याग केलास ? वारे वा ! " माझ्यावर रागावण्याचा आविर्भाव आणून बाबूराव म्हणाला.

" पण, मी घरातून कां निघालो याचें कारण तुला कळले नाहीं. घर सोडून बेकारपणानें अनाथासारखे जगभर हिंडण्याची कोणाला आवड कां असते ? "

" चोरीच्या साध्या आरोपांवरून तूं गृहत्याग केलासना ? "

" होय. "

" कांहीं काल तूं धीर धरला असता, तर सर्व कांहीं ठीक झालें असतें. परंतु यत्किंचित् कारणावरून तुम्ही लागलींच डोक्यांत राखघालून निघून गेलांत. "

" बाबूराव, तें कारण क्षुल्लक नव्हतें; माझ्या जागीं तूं असताम तर असाच वागला असतास. "

"कधीं नाहीं. तुझ्यासारखा उतावळेपणा मी कधींच केला नसता. "

" बरें, पण चोरी कोणी केली याचा कांहीं पत्ता लागला कां ? "

" दुसरें कोण चोरी करणार ? तुमचे गंगुमामाच असावे बहुतकरून."

" गंगुमामा ? " मी आश्चर्यानें म्हणालों.

" तुझ्यावर ज्या चोरीचा आळ आला होता, त्यासंबंधाने खरी हकीकत कांहीं कळली नाहीं, परंतु तूं गेल्यानंतर आपल्या आईजवळ जेवढें होते तें व आपल्या बहिणीचेहि बरेंचसे दागिने हस्तगत करून गंगुमामांची स्वारी तेव्हांपासून गुप्त झाली आहे, त्याचा अद्याप पत्ता नाहीं."

" परंतु माझ्यावरचा भाऊंचा संशय दूर झाला कां नाहीं ? "

" हें बघ, तें कांहीं मला अद्याप माहित नाहीं. मला जेवढी हकीकत कळली तेवढी मी तुला सर्व सांगतो. तूं नाहींसा झाल्यानंतर दुसऱ्या दिवशीं तुझ्या वडिलांनीं आमच्या येथे तुझ्यासंबंधीं चौकशी केली, पण तुझ्या जाण्याचें कारण मला मुळीच माहीत नसल्यामुळें आम्हाला तुझ्या अदृश्य होण्याचें फार आश्चर्य वाटलें. गांवांतल्या गांवांत तुझ्या विषयीं एकदोन दिवस तपास केला, परंतु तुझा कोठेंच पत्ता लागला नाही. तुझ्यावर चोरीचा वहिम असल्यामुळे तुझे भाऊ तुझ्यावर प्रथम फारच चिडले होते. कोठें जाणार आहे येईल आपोआप! असे तें कांहीं दिवस म्हणत होते; परंतु जेव्हा तुझा कोठेंच पत्ता लागेना तेव्हां त्यांना काळजी वाटूं लागली असावी. परंतु त्याबद्दल ते कोणाजवळ बोलत नसत. पुढें मी मॅट्रिकमध्ये असतां माझ्या वडिलावर कालाची विषारी दृष्टी जाऊन त्यांचा अंत झाला ! "

" काय ? काका वारले ? " मी एकदम आश्चर्यचकित होऊन म्हणालो. माझ्याच संबंधानें हकीकत विचारण्यांत त्याच्या घरची मी मुळींच चौकशी केली नव्हती. पित्याची आठवण होऊन बाबूराव सद्गदित झाला होता, व मलाहि रडूं येऊं लागले. आम्ही कांहीं वेळ निश्चलपणें बसलो होतो. आपले अश्रु पुसून बाबूराव पुढें सांगू लागला,

" आमची स्थिति कशी होती हें तुला माहीतच होते, माझे वडिल वारल्यावर शिकण्याची इच्छा असतांहि मला मध्येंच शाळा सोडावी लागून जी मिळाली ती नोकरी धरावी लागली. त्यानंतर माझी दुसऱ्या गांवीं बदली होऊन आज चार पांच वर्षात मी आपल्या गांवीं गेलोंच नाहीं. आम्ही आमचे घरदार विकून सावकाराचें देणें फेडून टाकलें. तेव्हां घरीं जाण्याची जरूरच उरली नाहीं ! "

" काकी कोठें आहेत ? " मी विचारलें.

" येथेंच. "

" आणि बाळकृष्ण ? तो आतां मोठा झाला असेल नाहीं ? "

" इतक्या वर्षांत तो मोठा होणार नाहीं कां ? " बाबूराव खिन्नपणें हंसून म्हणाला.

" आणखी–आणखी–शांता ? "

" तीहि माझ्याच जवळ आहे ? " खिन्नपणें दीर्घ निःश्वास सोडून बाबूराव म्हणाला. आणखी कांहीं तरी माझ्या मनात विचारावयाचें होते, पण माझा जीव होईना, मी निःस्तब्धपणें बाबूरावच्या तोंडाकडे पाहूं लागलो.

" चंदू. तिच्यावर–बिचारीवर दुर्दैवानें आपला अम्मल गाजविला आहे ! " तो माझा हात धरून दुःखानें म्हणाला. मी अगदीं दिङ्मूढ बनून गेलो, शरीरांतून एकदम सरकन वीज उत्पन्न झालीसे वाटले.

" काय ? काय म्हणतोस तूं ? " कसें तरी माझ्या तोंडातून अडखळत अडखळत शब्द निघाले. येणारे अश्रु पुसून तो म्हणाला,

" होय. तिच्यावर दुर्धर प्रसंग यायला आज सहा वर्षें झालीं. दादा असताच त्यांनीं घाईनें तिचें लग्न उरकून घेतलें व तेंहि स्थळ अगदीं गरीब असेच होतें. दादा वारल्यावर एक वर्षानें तिच्यावर हा प्रसंग आला, तिची सासू अति दुष्ट असल्यामुळें तेव्हांपासून मी तिला आमच्याच येथें आणली आहे. " बाबूरावच्या चेहऱ्यावर उदासीनपणाची पूर्ण छाया दिसत होती. एके काळीं जिचा चेहरा सुंदर दिसत होता व जिच्या मधुर भाषणाने सर्वांना आनंद व कौतुक वाटत होतें तिच्यावरच्या दुर्धर या प्रसंगाची हकीकत ऐकून माझें हृदय भरून आलें.बाबूरावावर इतक्या लहान वयांत किती विलक्षण प्रसंग आले होते ! त्याचें कोणत्या शब्दानें समाधान करावें हें मला सुचेना ! माझ्यापेक्षां त्याची स्थिति दुःखद होती; त्याला आपल्या आवडत्या विद्याभ्यासावर व पुढील सर्व महत्त्वाकांक्षेवर पाणी सोडून कुटुंबपोषणाची काळजी वहावी लागत होती. त्याचा स्वभाव मूळचा विनोदी असल्यामुळें तो नेहमी आनंदी दिसे, परंतु मी त्यांचा बालमित्र असल्यामुळे त्यानें आपलें दुःखी हृदय मला निवेदन करून जरा हलकें केलें. ते दिवशीं नंतर आम्ही बाहेर फिरावयास गेलो नाहींच. शंकररावला मी अद्यापपर्यंत माझें चरित्र कळविलें नसल्यामुळें त्यालाहि आमच्या दोघांच्या हकीकती ऐकण्याची इच्छा होऊन तोहि एकाग्रपणें ऐकत होता. आमचें किती वेळ तरी संभाषण चाललें होतें. बाबूरावची हकीकत पुरी झाल्यावर त्यानें आग्रह केल्यावरून मी माझी सर्व हकीकत घर सोडल्यापासूनची सांगितली. आज माझें चित्त ठिकाणावर नव्हते. एखादे दिवशीं सांगेन म्हणून कितीही सांगितलें तरी बाबूरावनें व शंकररावानें अतिशय आग्रह करून त्याच दिवशीं मला सांगावयास भाग पाडलें. माझी कहाणी पुरी झाल्यावर बाबूरावनें माझा हात सप्रेम दाबून म्हटलें,

" अहाहा ! चंदू ! खरोखरीच तुला किती तरी दुःख कंठावें लागलें ! अखेरीस शेटसाहेबासारख्या उदारधीपुरुषाची तुझ्या हातून सेवा घडून त्यांच्या कृपेला तूं स्वतःला पात्र करून घेतलेस व त्याचें फळ आज तुला मिळत आहे. तूं आतां तुझ्या भाऊला भेट. त्यांनाहि तुझ्या भेटीपासून आनंदच होईल. तुझ्याविषयी त्यांचा मत बदलला कीं नाहीं हें मला पुरतेपणीं माहीत नाहीं. कारण आम्ही आपलें गांव सोडून बरींच वर्षे झालीं हें मी आधींच सांगितलें आहे. गंगूमामाने चोरी करून पोबारा केल्याचें मला थोड्याच दिवसांपूर्वी कळले. आम्ही गांव सोडल्यावर वर्ष दोन वर्षांच्या आंत गंगूमामानें चोरी केली असें मला कळलें." त्यावर मी कांहींच बोललो नाहीं. भाऊंना भेटण्याची मला प्रबळ इच्छा झाली, परंतु त्यांना मला भेटावयाचें आहे कीं नाहीं हें खात्रीपूर्वक कळल्याशिवाय जाऊं नये असेंच मला वाटूं लागले. आणि त्याप्रमाणें मी बाबूरावाला बोलूनहि दाखविलें. माझा बालमित्र भेटल्याबद्दल मला परमावधीचा आनंद झाला होता, व त्याच्या कुटुंबाविषयींची करुणकहाणी ऐकून तेवढेच वाईट वाटलें ! आम्ही दोघे लहानपणीं शाळेंत असतांना पुढील भविष्याविषयीं किती बेत करीत होतो व आम्हाला भावीस्थितीचीं कशीं सुखस्वप्नें पडत होतीं; त्यांत बी. ए. होण्याचें माझें स्वप्न खरें होण्याचें चिन्ह दिसत होतें; परंतु बिचारा बाबूराव निराशेच्या खोल गर्तेत पडला होता व भावी कालाविषयीं उदासीन होता ! सर्वांच्याच इच्छा सफल होतात असें नाहीं ! एक सुखात असला तर दुसरा दुःखात दिसतो व कांहीं कालानें त्यांच्या उलट स्थिति होतात; हा जगाचा परमेश्वरी न्याय आहे !

---

## स्मृति सत्ताविसावी.

# ताईचे विचार.

—:०:—

त्याच दिवशीं बाबूरावकडे जाऊन त्याच्या आईला भेटण्याचा माझा विचार मी त्याला कळविला व आम्ही तिघेहि बाबूरावच्या घरीं जाण्यास निघालो. आम्हाला घरी येण्यास कदाचित वेळ होईल असें जातां जातां शंकररावने आपल्या बहिणीस सांगितलें. रस्त्यानें आम्ही मुकाट्यानेंच चाललो होतो. बाबूरावची आई पुढच्याच खोलींत कांहींसें करीत होती व रॉकेलच्या उघड्या दिव्याजवळ बसून बाळकृष्ण आपला अभ्यास करीत होता. त्याच्यापासून थोड्या अंतरावर शांता कांहीं वाचीत बसली होती, बहुतकरून ती शांताच असावी, कारण तिला मी नीटसें पाहिलें नाहीं. बाबूरावच्या बरोबर आम्हां दोघां अपरिचित तरुणांना पाहून ती तेथून आंत निघून गेली. मी तेथून बाहेर पडेपर्यंत पुनः ती माझ्या दृष्टीस पडलीच नाहीं. आम्ही आंत आल्यावर बाबूराव आपल्या आईला म्हणाला.

"आई, हे कोण आहेत तूं ओळखतेस काय ?" आज सात वर्षांत मला मुळींच न पाहिल्यामुळें काकी मला ओळखूं शकल्या नाहींत. त्या आश्चर्यानें माझ्या-कडे पाहूं लागल्या. बाळकृष्णाहि विस्मितपणें आपल्या अभ्यासाचीं पसरलेलीं पुस्तकें तशींच टाकून माझ्याकडे पाहूं लागला. स्वयंपाकखोलीच्या दाराआड शांताहि उभी असावी असा मला भास झाला. मी पुढे होऊन काकींना नमस्कार केला. माझ्या मुखांतून शब्दच बाहेर निघेना ! अखेरीस मी कोण हें बाबूरावलाच सांगावें लागलें. प्रथम त्यांना फार आश्चर्य वाटलें. तसेंच मला इतक्या दिवसांनीं पाहिल्यामुळें फार आनंदहि झाला. मी त्यांच्या अगदीं जवळ बसलों होतों, त्यांनीं प्रेमभरानें माझ्या पाठीवरून हात फिरविला. मला पाहिल्याचा आनंद व स्वतःवरच्या दुःखाचे स्मरण होऊन त्यांचा कंठ भरून आल्यामुळें त्यांच्यानें बोलवेना व माझीहि कांहींशीं तशीच स्थिति झाल्यामुळें मलाहि काय बोलावें हें कळेना ! खालीं मान घालून मी स्तब्ध बसलो होतों. माझी हकीकत थोडक्यांत बाबूरावनें सांगितली. सर्व ऐकल्यानंतर त्या म्हणाल्या,

" चंदूलाल, घर सोडल्यानेहि तुला सुख मिळाले नाहीं, तुझ्या जन्माच्या वेळीं जरी तुझी आई वारली, तरी तुझी आजी होती तोपर्यंत ठीक होतं, पण तुझी आजी मर-तांच ती चंडिका माई तुमच्या घरात शिरली व तिच्या मुलाच्यापायीं तुला असं देशो-धडीला लागावं लागल. तिच्याचमुळं तुला फार त्रास होत होता. तुझ्यासाठीं आम्हाला फार वाईट वाटे; पण आम्ही काय करणार ? परकी माणसं आम्ही ! " आज मी जेवावयास तेथेंच रहावें म्हणून बाबूरावनें पुष्कळ आग्रह केला, पण शंकरराव ऐकेना ! त्या दोघांचा बराच वाद होऊन अखेरीस दुसऱ्या दिवशीं मी बाबूरावकडे भोजनास यावे असें ठरलें. त्यानंतर आम्ही बराच वेळ तेथें होतों, बाळकृष्णाहि मी बोलाविल्या-वरून आमच्यात येऊन बसला होता. आमचें तिघांचे बराच वेळ संभाषण चालले होतें. बाळासाहेबासंबंधीं मी बाबूरावला सांगितल्यावर त्याला भेटण्याची त्याला अनिवार इच्छा झाली. रात्रींचे नऊ वाजल्यानंतर आम्ही दोघे बाबूरावचा व त्याच्या आईचा निरोप घेऊन बाहेर पडलों. जाण्यापूर्वी माझा हात धरून बाबूरावने मला विचारलें,

" चंदू, तूं उद्यां जरूर येशील ना ? "

" बाबूराव, मी येणार नाहीं असें कां तुला वाटतें ? " मी म्हणालों. बाबूरा-वच्या मुद्रेवर किंचित् औदासीन्य दिसत होतें, त्यांच्या मनातला आशय मी समजलों, आपण गरीब म्हणून तो शंकररावापुढें फार बोलूं शकला नाहीं. " बाबूराव, पाहिजे तर मी उद्यांपासून येथे राहायलाच येतों. " त्याच्या खांद्यावर हात ठेऊन मी म्हणालों.

" वः ! मग तर फारच उत्तम. मग तर मी स्वतःला भाग्यवान् समजेन ! " बाबूराव हंसून म्हणाला.

" अहो, महाराज ! तें कांहीं चालायचें नाहीं. आतां उद्यां जेवायला येण्याची परवानगी दिली तर तुमचे हात जास्त लांब व्हायला लागले; सध्यां चिंतामणि आमचा पाहुणा आहे, तेव्हां आमच्या परवानगीशिवाय त्याला कोठेंच जातां येणार नाहीं. " शंकरराव म्हणाला.

" त्याला तुम्ही कैद कां करून ठेवणार ! " बाबूराव हंसून म्हणाला.

" हो, हो, हा पहा. त्याला कैद करून नेतो. असें म्हणून शंकररावनें हंसत हंसत माझा हात धरून मला ओढण्याला सुरवात केली. त्यानंतर आम्ही दोघे शंकररावच्या घरीं गेलो. परंतु बाबूरावाशीं अद्यापहि बोलत रहावें असें मला वाटत होतें. तें दिवशीं मला किती आनंद व समाधान वाटलें व कांहीं दुःखद विचारांनीं वाईटहि वाटलें. असो. दुसऱ्या दिवशीं सकाळींच बाबूराव आला व तेव्हांपासून मी त्याच्या घरीं गेलो. संध्याकाळपर्यंत मी त्याच्याच घरीं होतो. आजहि मागल्या सर्व आठवणी पुनः ताज्या करून त्यांच्यावरच आमचें संभाषण चाललें होतें. आजहि शांता माझ्या दृष्टीस पडली नाहीं. मी तिचा लहानपणाचा खेळगडी असून ती माझ्याशीं परकेपणानें कां वागते, माझ्याशीं बोलावयास तिला काय हरकत आहे, असें मला पुष्कळ वाटत होतें. परंतु तसें मी बाबूरावला बोलून दाखविलें नाहीं. तिला शाळेंत तूं कां घालीत नाहींस असें मी बाबूरावला सांगतां तो म्हणाला " ती गोष्ट आईला पसंत नाहीं. तसेंच तिला पुण्यास ठेवायचा माझा विचार होता, पण, तिला एकटीला कोठेंच ठेवायची नाहीं असें आईनें म्हणतां, तिच्या मर्जीविरुद्ध मला कांहींच करता येत नाहीं."

" मग तिच्यासंबंधानें तुम्ही कांहींच करणार नाहीं एकूण ? " मी म्हणालो.

" सध्यां कांहीं नाहीं. " तोंड फिरवून व खिन्नपणें सुस्कारा सोडून बाबूराव म्हणाला. माझ्या वाक्यानें त्याच्या मनाला वाईट वाटलें असें वाटून मला कसेंसेंच वाटूं लागलें. मी तो विषयच फिरवून टाकला. संध्याकाळीं शंकरराव आला व आज सकाळपासून बाबूरावकडेच गुंग होऊन राहिल्याबद्दल त्यानें मला दोष दिला. त्यानंतर आम्ही तिघेही फिरावयास गेलो. आतां मी नित्य नेमानें एक वेळ तरी बाबूरावकडे जात असें व तोहि मला भेटावयास येत असे. एकमेकांना भेटल्याशिवाय आम्हाला बिलकुल चैन पडत नसे. रोज जरी मी जाई तरी शांता माझ्या क्वचित्च दृष्टीस पडे व मला पाहतांच ती आंत निघून जाई. त्यामुळें मलाहि तिच्याशीं मुद्दाम बोलावयास संकोच वाटूं लागला.

शंकररावच्या येथें येऊन आतां मला आठ दहा दिवस झाले होते; त्यांच्या घरच्या मंडळींशीं मी मोकळेपणानें वागत असे व तीहि मंडळी माझ्याशीं मोकळेपणानें वागत असत. माझी खरी हकीकत शंकररावमार्फत त्यांना सर्वांना कळली

होती. मी भाऊंना भेटावयास जावें असें दादासाहेबांचें मत होतें, परंतु माझ्या मनाचा अद्याप नक्की विचार झाला नव्हता.

मुंबईपेक्षां येथें उन्हाळ्याचा त्रास अधिकच होत होता. शंकरराव ज्या गांवीं होता तें गांव समुद्र किनाऱ्यालगतच होतें व शंकररावचें घरहि समुद्रापासून फारसें दूर नव्हतें. शंकररावचे वडील जमीनदार होते. त्यांचा जमीनजुमला पुष्कळच असून ते स्वतः नवीन पद्धतीनें शेतीची सुधारणा करण्याची मेहनत करीत. ते बी. ए. झालेले असून बरेच सुधारक होते. शंकररावाच्या घरीं जुन्यानव्या पद्धतींचा मिलाफ होता. दिवाणखाना तर अगदीं इंग्रजी चालीचाच होता, उन्हाच्या तापापासून संरक्षण व्हावें म्हणून खिडक्यावरून वाळ्याचे पडदे सोडण्यांत आले होते. शंकररावला त्याच्या वडिलांनीं कांहीं खासगी कामाकरितां त्यांच्या खोलींत बोलाविल्यावरून मी एकटाच दिवाणखान्यांत नांवाला एक पुस्तक हातांत घेऊन बसलों होतों. माझे विचार तुफानांत भडकलेल्या तारवाप्रमाणें इकडे तिकडे भडकलेले होते, घरचें वारंवार स्मरण होत होतें, पुनः बाबूरावसंबंधीं विचार येत होते; शांतेची करुणमूर्ति डोळ्यासमोर उभी राही तर बाळासाहेबाची आठवण होऊन जीव तळमळत होता. त्याला पुनः केव्हां भेटेन असें मला होऊन गेलें होतें. त्याला मी दोन तीन पत्रें लिहिलीं होतीं, परंतु त्याच्याकडून अद्याप एकाचेंहि उत्तर आलें नव्हतें. ह्यामुळें मला अगदीं काळजी लागून राहिली होती. अशा एकंदर मनःस्थितींत असतां " मामा " म्हणून मधुरीची हांक ऐकून मी एकदम भानावर आलों.

" काय मधुरी ? मामाचें काय काम आहे ? " मी विचारलें.

" पण मामा इथं नाहीं तो ? कुठं आहे मामा ? "

" मधुरी, मामाशीं काय काम आहे मला तर सांग. "

" अं—हं. पण, हें पहा. तुम्हीं मला मधुरी म्हणूं नका बरं कां ? माझं नांव मंजुळा आहे असं मी किती तरी वेळां सांगितलं. पण, तुम्हाला आठवण रहातच नाहीं वाटतं ? "

" खरेंच, मला आठवण रहात नाहीं खरी. पण तुला सारेच मधुरी म्हणतात ना ? "

" हो. पण मला कांहीं मधुरी हें नांव आवडत नाहीं. तुम्हीच सांगा पाहूं कोणतं नांव चांगलं तें ? "

" दोन्हींहि चांगलीं आहेत. " मी हंसून म्हणालो.

"खोट्टं, अगदींच खोट्टं ! तुम्ही पण आमच्या मामासारखी थट्टा करायला लागलात अं ! "

" बरें आहे. आतां नाहीं करणार हं. काय मी म्हणूं ? "

" मंजुळा. "

" हं. मंजुळे, तुझें तुझ्या मामाजवळ काय काम आहे ? "

ती हंसून म्हणाली, " हंऽऽ आतां कसें ठिकाणावर आलांत ? हें पहा, मामा मला आज हा इंग्रजी धडा समजावून देणार होता; हें पहा मी पुस्तक सुद्धां आणलं आहे, पण मामासाहेबांचाच कुठं ठिकाण आहे ? "

" बरें, मी सांगूं तुला समजावून ? "

" ओहो, मग तर फारच चांगलं ! कोणी सांगितला तरी हरकत नाहीं, द्या पाहूं समजावून ? " असें म्हणून तिनें पुस्तक माझ्या हातांत दिलें. इंग्रजी सोप्या सोप्या गोष्टींचें तें एक पुस्तक होतें. तिला इतक्यांतच इंग्रजीवाचनाचा नाद पाहून मला तिचें कौतुक वाटलें. मधुरीची मावशी सुशीला तिच्याच बरोबरीची असता, तिला फारसा शिकण्यासवरण्याचा नाद नव्हता म्हटलें तरी चालेल. शंकररावनंतर सुशीला बऱ्याच उशीरा झाल्यामुळें ती आपल्या मातापित्याची फार लाडकी होती व सर्वांकडून तिचे फार लाड होत असत. त्याचा परिणाम असा झाला कीं, ती बरींच हट्टी व लहरी बनली होती. तिची ज्यावेळीं जशी लहर लागे, तशी ती वागत असे. जात्या ती फार हुशार व चलाख होती, एकादी गोष्ट तिच्या लक्षांतून सहसा जात नसे. ती दिसण्यांताहि फार सुरेख होती, परंतु तिचें लक्ष खेळांतच असें; बहुतेक वेळ तिचा खेळण्यांतच जाई. मंजुळा कांहीं बाबतींत तिच्या उलट होती. मी तिला खेळतांना फार क्वचितच पहात असें. तिला खेळण्यापेक्षां विद्येचीच फार आवड होती. ती त्यावेळीं इंग्रजी दुसऱ्या वर्गात होती व इंग्रजी वाचण्याचा तिला फार नाद होता. ती स्वभावानें फार शांत होती. ती कधीं धांगडधिंगा अगर मस्ती करीत नसे, व कधीं रिकामीहि बसत नसे. तिचा बहुतेक वेळ आपल्या लहान भावंडांना खेळविण्यांत किंवा बाहुलीचें लहान लहान कपडे शिवण्यांत किंवा अभ्यास करण्यांत जात असे. तिचा कंठ फारच मधुर असल्यामुळें ती साधी देवादिकांची गाणींहि फार चांगली म्हणत असें. मी तिला पुस्तक वाचून समजावून सांगत होतो, इतक्यांत ताई व शंकरराव तेथें आले.

" अरे ! ही तुला येथें त्रास द्यायला आली वाटतं ? " थट्टेच्या स्वरात शंकरराव म्हणाला.

" बरं ! तुझं रे काय जातं मामा ? तूं तर नाहींना शिकवीत ? " मधुरी शंकररावावर असालें डोळें वटारून म्हणाली.

" माझें नाहीं, पण माझ्या मित्राचें जातेंना ? चल. तुझें पुस्तक घे आणि चालती हो येथून. " शंकरराव म्हणाला.

" काय म्हणून ? ताई पहा ग हा. "

" जाऊं दे रे तिला; कां उगीच बोलतोस ? जा. मधु, तूं आपली खालींच जा कशी !" ताई म्हणतांच मधुरी पुस्तक घेऊन निमूटपणें खालीं निघून गेली. ताईच्या विषयीं माझ्या मनांत फार आदर वसत होता, ताई फारशा जरी शिकलेल्या नव्हत्या तरी त्यांचे विचार फार उच्च दर्जाचे होते.

मी म्हणालों " ताई, खरोखरीच मधुरीची बुद्धि फार तीव्र आहे. तिला तुम्ही पुष्कळ विद्या शिकवा. इतक्यांत मी जो धंडा तिला समजावून दिला तो तिच्या पट्कन् लक्षांत राहिला. तिच्या वयाच्या मानानें तिची धारणाशक्ति फार उत्तम आहे."

" चिंतामणि, ताईच्या तोंडावर कशाला मधुरीची स्तुति करतोस ? इतकी कांहीं मधुरी हुशार नाहीं. दुसऱ्याची स्तुति करायची तुला आपली संवयच आहे."

" छे. मी कांहीं खोटें सांगत नाहीं." मी म्हणतांच ताई म्हणाल्या,

" हो. चिंतामणि, तुम्ही म्हणता तशी आमची मधुरी खरीच फार शहाणी व हुशार आहे. तरी माझी म्हणून मी तिची स्तुति करीत नाहीं, तिला जेवढे पहातात तेवढे असेंच म्हणतात. तिची स्मरणशक्ति फार चांगली आहे, एकदां माहित झालेली गोष्ट ती कधींच विसरत नाहीं."

" म्हणूनच तुम्ही तिला अगदीं विद्वान् करा."

" विद्वान् म्हणजे कशी ?" ताई हंसत म्हणाल्या.

" तिला ग्रॅज्युएट करा. आपल्या देशांत उच्च शिक्षण घेतलेल्या फार थोड्या स्त्रिया आहेत. स्त्रियांनीं पदव्या मिळवून पुरुषांच्या बरोबरीला यावें व आपल्या देशाचें नांव काढावें असें मला वाटतें. युरोप अमेरिकेंतल्या बहुतेक स्त्रिया कलाकौशल्यांत पुरुषांची बरोबरी करूं शकतात. त्या देशांत कितीतरी प्रसिद्धीस आलेल्या स्त्रिया आहेत, व त्यांनीं आपल्या विद्वत्तेनें पुष्कळ आश्चर्यकारक कामें केलेलीं आहेत. आपल्या इकडील स्त्रियांनींहि उच्च शिक्षण घेऊन आपल्या ज्ञानानें पुरुषवर्गाला दिपवून टाकावें असें मला वाटतें. माझी एखादी बहिणबिहिण असती तर मी तिला खूब शिक्षण दिलें असतें." माझें भाषण पुरें झाल्यावर किंचित हंसून ताई म्हणाल्या,

" चिंतामणि, तुम्ही म्हणतां तें सारं खरं; पण स्त्रियांनीं फक्त पदव्याच मिळवाव्या असं मला वाटत नाहीं. सर्व कलांचें स्त्रियांनीं ज्ञान मिळवावें हें चांगलें, परंतु इतर ज्ञानापेक्षां आम्हां स्त्रियांचें कर्तव्य काय आहे हें आम्हां स्त्रियांना चांगल्या प्रकारें कळलं पाहिजे. तुम्हीं म्हणतां तशा कांहीं थोड्या स्त्रिया जर पदव्या मिळवून आपल्या देशाच्या उपयोगी पडल्या तर हव्याच आहेत; तरी पण पदव्या मिळवूनहि त्यांना आपल्या स्त्रीत्वाची आठवण राहिली पाहिजे. सर्वच स्त्रिया पदव्या मिळवून पुरुषांसारख्या वागूं लागल्या तर मला वाटतं थोड्याच दिवसांत तुम्हां पुरुषांना आपल्या सर्व हक्कांना मुकावं लागून स्त्रियांचीं कामं करावीं लागतील. हल्लीं शिकलेल्या व बिनशिकलेल्या सर्वच स्त्रियांना गृहकृत्याचा कंटाळा येऊं लागला आहे; स्वतःच्या शरीराच्या स्वच्छतेपलीकडे, घरांतल्या स्वच्छतेकडे व सुशोभितपणाकडे दुर्लक्ष होऊं लागलें आहे, कारण बहुतेकांना अंगमेहनत होईनाशीं झाली आहे. स्त्रियांना सुशिक्षण पाहिजे खरं, पण ते हल्लींसारखं पुरुषी सुशिक्षण नको. फार शिकून तरी स्त्रियांना विशेष तो काय फायदा आहे ? नोकऱ्या करतील तर, डॉक्टरणी, नर्स किंवा मास्तरणी याशिवाय कोणत्या नोकऱ्या स्त्रियांनीं केल्या आहेत ? शिकलेल्या व अर्धवट शिकलेल्या स्त्रियांच्या

अंगांत स्वातंत्र्याचं वारं शिरून आपण स्वतंत्र बनावं असं वाटूं लागलं आहे. आम्ही नोकरीधंदा करून आमचं पोट भरूं असं त्या म्हणतात, पण नोकरी करून स्वतः पोट भरणं सर्वच स्त्रियांना सुलभ नसतं. शंभरांत पांचजणींनीं धंदा करून स्वतःच पोट भरलं म्हणजे झालं कां? हल्लींच्या शिक्षणाचाहि प्रकार असा आहे कीं ज्याचा पुढील आयुष्यांत मुळीसुद्धां उपयोग होत नाहीं, असलं शिक्षण मुलींना शिकवलं जातं."

"मग कोणतें शिक्षण द्यावें असें तुझें म्हणणें आहे?" शंकरराव मध्येंच म्हणाला.

"अरे, हल्लींचं मला तरी पसंत नाहीं, मला म्हणा त्यांत एवढं काय कळतय्, पण विषय निघाला म्हणून म्हणते, हें पहा, भूगोलन् खगोल, गणित वगैरे किती तरी विषय असे आहेत कीं शाळेंत असेपर्यंतच त्याचा उपयोग, पण शाळा सोडल्यावर त्याचा मुळींच उपयोग नाहीं."

"पण तेंही ज्ञान पाहिजे कां नको?" मी म्हणालो.

"अहो, पाहिजे खरं पण तें साधारण. तुम्ही मुलेंच पहा. एवढं शिकतां, पण तुम्हां सर्वांनाच त्या शिक्षणाचा अगदीं उपयोग होतच असतो कां? कांहीं विषय तुम्हाला पुढं मुळींच उपयोगास येत नाहींत व त्याची पुढं कांहीं वर्षांनीं आठवणसुद्धां रहात नसेल पुष्कळांना. मग मुलींना तें देऊन काय करायचं आहे? जें त्यांना संसारांत पुढे उपयोगी पडेल असंच दिलं तर किती चांगलं होईल?"

"सुशिक्षण कोणीच घेऊं नये व सर्वांनीच पहिल्या रूळलेल्या मार्गानें स्वयंपाक गृहकार्य, अपत्यसंगोपन करून आपलें आयुष्य पुरुषांच्या सुखसोयी पाहण्यांत व मुलाबाळांच्या खस्ता खाण्यांतच घालवावें काय?" मी म्हणालो.

"तसं माझं म्हणणं नाहीं. जुना सर्वच मार्ग चांगला नसला तरी सर्वच स्त्रिया पदव्या घेऊन सुशिक्षित होऊन समाजसेवा अगर देशसेवा एकदम करून तुमचा देश इतर सर्व देशांच्या वर नेऊन बसवितील असं मला तरी वाटत नाहीं! माझा म्हणण्याचा उद्देश असा कीं, ज्याला ज्याविषयाची विशेष आवड असेल त्यानें तो घेऊन त्यांतच जास्त ज्ञान मिळवावं व इतर विषयाचं ज्ञान तात्पुरतं असलं म्हणजे झालं, कारण सर्वच विद्या सर्वांनाच सर्वतोपरी मिळविता येईल असं नाहीं. ज्याची जशी ग्रहणशक्ति असेल तशीच त्याला मिळविता येणार. मुलींच्यासाठीं पुष्कळ स्वतंत्र विषयच ठेविले पाहिजेत असं मला वाटतं, त्यांत एकंदर गृहकर्तव्याची माहिती; त्यांतहि वेगवेगळाले विषय म्हणजे भाजीपाला लावणें, त्यासंबंधीं सर्व शास्त्रीय माहिती, त्यांचें उपयोग, दुधदुभत्यासंबंधी सर्व शास्त्रीय माहिती व त्यांचे उपयोग, सूपशास्त्र तेंहि शास्त्रीय पद्धतीनेंच शिकवावें, कारण आपण खरें पाहिलें असतां पद्धतशीर तसें वागत नाहीं. कित्येक प्रसंगी आजारी होईपर्यंत आपण एखादा पदार्थ करून खातो, व कित्येक प्रसंगीं जें अवश्य पाहिजे असतें तिकडे दुर्लक्ष करतो. तेव्हां कोणत्या ऋतूंत काय खाल्लें असतां तें आरोग्यदायक आहे व काय अपायकारक आहे हें प्रत्येक स्त्रीला कळलं पाहिजे. हें झालं सूपशास्त्राचं, त्याशिवाय शिवण; घरांत जें नेहमीं वापरण्यांत

येतें तें, ड्राइंग, गायन, साधारण वीणकाम, भरतकाम वगैरे कितीतरी विषय शिकून त्यांत सुधारणा करून प्राविण्य मिळविण्यासारखं आहे. अपत्यसंगोपनासंबंधीं तर पुष्कळ चर्चा होत आहेंच व स्त्रियांच्या मुख्य कर्तव्यांत त्यालाच जास्त महत्व दिलं पाहिजे असं मला वाटतं. इकडे तान्हं मूल घरीं ऱ्यां ऱ्यां करीतच आहे, नोकर लोक शिव्या देतच आहेत व आई गेली व्याख्यान ऐकायला! म्हणजे व्याख्यान ऐकूं नाहीं असं नाहीं पण प्रथम मुलांची काळजी घेतली पाहिजे. असो; त्याबद्दल मी जास्त सांगत नाहीं, पण वरील सर्व विषय मुलींच्या शाळेंत शिकविले गेले पाहिजे व त्या त्या विषयांत प्रवीण झालेल्या मुलींना पदव्या दिल्या पाहिजेत.त्याशिवाय ज्या मुलीला मुलांच्या बरोबरीनें शिक्षण घेण्याची इच्छा असेल तर तिला तसें शिक्षण देऊन मोठी विदुषी करायला हरकत नाहीं. परंतु तिनें मग अविवाहित राहून पुरुषांच्या बरोबरीनें कामें करावीं, लग्न करून संसार व बाहेरचीं कामें एका व्यक्तीला करतां येण्यासारखीं नसतात व केली तरी तें खरं संसारसुख नव्हे. त्या संसारांत जर नवराबायको दोघेहि नोकरीवर गेले तर गृहव्यवस्था कोणी ठेवावयाची हा प्रश्न येतोच. बरं, सर्वच जर लग्न न करतां पुरुषांच्याबरोबर कामें करूं लागल्या तर जगाचा व्यवहारच बंद पडणार! समजा, एखादं विवाहीत जोडपं आहे त्यांत बायको नवऱ्यापेक्षां बुद्धिवान असली तर तिनें मोठ्या पगाराची नोकरी करावी व तिच्या बुद्धिहीन नवऱ्यानें घरांतली उष्टीखरकटीं काढावी ही गोष्ट कबूल पण, जे परमेश्वराचे नियम आहेत त्यांत कितीहि बुद्धिवान माणूस असला तरी त्याला फेरफार करतां येणार नाहीं. मग दरएक गोष्टींत पुरुषासारखेंच वागण्याचा हट्ट घेऊन कसें चालेल ? आमच्या मधुरीला असलं शिक्षण देण्याचा आमचा दोघांचाही विचार नाहीं.'' इतकें लांब व्याख्यान देऊन ताई गप्प राहिल्या.

"म्हणजे ? तिला इंग्रजी जास्त शिक्षण देणार नाहीं वाटतें!'' मी उतावीळपणानें म्हणालो.

"तिला इंग्रजी फार शिक्षण द्यायचं नाहीं असें नाहीं.'' ताई मान हलवून म्हणाल्या, "इंग्रजी शिक्षण तिला द्यायचं, पण आधीं तिला घरांतलीं सर्व कामं आलीं पाहिजेत. तिला हल्लीं बारावं वर्ष आहे पण ती नऊदहा वर्षांपासून अडीअडचणीच्या प्रसंगीं चार माणसांचा साधारण स्वयंपाक करूं शकते. तसंच शिवण्याटिपण्यांतहि तिचं लक्ष आहे. मूळचा तिचा अवाज गोड असल्यामुळं आम्ही तिला गायनाचंहि चांगल्या मास्तरांजवळून शिक्षण देणार आहोंत. सध्यां ती हार्मोनियमवर चांगलं गाऊं वाजऊं शकते. घरांत कोणती जिन्नस कुठं ठेविली पाहिजे, स्वच्छता कशी ठेवावी, आल्यागेल्याचं आदरातिथ्य कसं ठेवावं, अंगांत नम्रपणा ठेवणें, कुटुंबांच्या माणसाशीं स्नेहभावानं वागणं हें सर्व आधीं आलं पाहिजे. नाहीं तर हल्लींच्या मुलींना आल्यागेल्याचा कंटाळा येतो, मग कुटुंबातल्या माणसाचा येईल त्यांत काय नवल! नम्रपणानं वागणं म्हणजे आपला

कमीपणा करून घेणं असं त्यांना वाटतं. आपण पुष्कळ श्रीमंत असावं, चांगले चांगले कपडे घालावे, दागिने घालावे, सारा दिवस स्वस्थ कांहीं उद्योग न करतां बसावं व आपणाला सर्वांनीं चांगल म्हणावं असं नेहमीं वाटत असतं. युरोपियन स्त्रियांसारखीं ऐट आमच्या अर्धशिक्षित स्त्रिया करायला शिकतात, पण त्यांच्या सारखं नेहमीं उद्योगांत कसं असावं व शिस्त कशी पाळावी हें कांहीं त्यांना कळत नाहीं. कांहीं बाबतींत पुरुषांकडूनच स्त्रियांची हल्लींची स्थिति झालेली आहे." त्यावर शंकरराव हंसून म्हणाला,

"स्त्रियांची सुटून आतां पुरुषांवर सक्रांत बसली वाटतें?"

"तूं हांस पाहिजे तर. मला खरं दिसतं तें मी सांगतें."

"बरें बुवा, आम्ही पुरुषांनीं काय तुमचीं गाढव मारली तें तर कळूं द्या.'' थट्टेनें शंकराव म्हणाला.

"तूं काय गाढव मारणार होतास रे? तुझ्या आधीच्याच पुरुषांनी मारून ठेविलींत." ताईहि थट्टेनेंच म्हणाल्या. त्यांचें पुढील संभाषण ऐकण्याची मला जिज्ञासा लागून राहिल्यामुळें मी म्हणालोः–

"सांगा. ताई. पुढें तुमचें काय म्हणणें आहे तें तर ऐकूं द्या. आमच्या हातून मेलेल्या गाढवांना पुनः जीवदान देता आलें तर पाहूं प्रयत्न करून." त्यावर ताई हंसून म्हणाल्याः–

"छे! आतां तीं जिवंत होण्याची आशाच नको! जिवंत करायला गेलांत कीं, तुम्हाला त्यांच्या चांगल्या लाथाच खाव्या लागतील. पुरुषांनींच स्त्रियांना पुष्कळ बाबतींत अगदीं डोक्यावर बसविल्या आहेत. आपल्या स्त्रिया अगदीं युरोपीयन स्त्रियांप्रमाणें आपल्याशीं मोकळेपणानें वागाव्या म्हणून प्रथम कांहीं पुरुषांनीं आपल्या स्त्रियांवर त्यांच्या मर्जीविरुद्ध जुलूमच केला म्हणाना? युरोपीयन समाज वेगळा आपला समाज वेगळा याचा मुळींच विचार केला नाहीं. युरोपीयन स्त्रिया जशा पुरुषांना आपल्या भोंवती माकडासारखें नाचवितात, तसं आपल्या इकडल्या पुरुषांनींहि वागावं असं त्यांना वाटूं लागलं, तसंच या सुधारणेच्यापायीं कित्येक पुरुष वाजवीपेक्षां जास्तच स्त्रियांवर जुलुम करायला लागले. एखादी सुशिक्षित स्त्री सभेंत व्याख्यान द्यायला लागली कीं आपल्या बायकोनंहि तसंच व्याख्यान द्यावं असं वाटून कांहीं पुरुष स्वतःच निबंध लिहून जिला ज्यांतलें मुळींच ज्ञान नसतं अशा आपल्या बायकोला कांहींशा जबरदस्तीनें व्याख्यान द्यायला लावतात. कित्येकांना बायकोला सुशिक्षण द्यायचं मनांत आलं, तर त्यांच्या त्या वेडेपणाला विचारूच नका. हिंदुपद्धतिप्रमाणं तिनं उजाडल्यापासून रात्रीं अकरा वाजेपर्यंत मुळींच विश्रांती न घेतां राबडावं व त्यानंतर नवरदेवानं तिला शिक्षण देण्याला सुरवात करावी, इकडे तिनं झोंप आल्यामुळं बिछान्याकडे आशाळभूत दृष्टीनं पहावं व नवऱ्याच्या भीतिस्तव डुकल्या घेतघेत एका शब्दाऐवजीं भलत्याच शब्दाचा पाठ करावा. त्याचं फळ काय? जर आपली बायको सुशिक्षित असावी असं

वाटत असलं तर लग्न होतांच कोणाची भीडभाड न ठेविता तिला शिक्षण पुरं होई पर्यंत माहेरीं तरी ठेवावी नाहींतर ऐपत असली तर चांगल्या बोर्डिंगांत तरी ठेवावी. मग तिला कोणत्याहि प्रकारचा त्रास नसावा व जवळ पण ठेवूं नये. एखाद्या नवरदेवांनीं ऑफीसमधून घरीं आल्यावर गरम चहा पिऊन क्लबमध्यें जातां जातां पत्नीला सांगावं "आज अमुक ठिकाणीं स्त्रियांची सभा आहे, जा बरं कां व्याख्यानाला." म्हणून चालतं व्हावें. पण तिला बिचारीला वेळ आहे कां नाहीं इकडे कोणाचं लक्ष आहे? घरांतल्या पोरांची सभा निजणार तेव्हां कुठं तिला वेळ मिळणार. एक पोर जेवायचं म्हणतंय, एक निजायचं म्हणतंय, तर एकानें उगाच भोंकाड पसरलं आहे. त्या सर्वांच्या समजूती करण्यांत, स्वयंपाक करण्यांत वगैरे सर्व काम उरकण्यांत सर्व वेळ निघून जातो व नवरदेव घरीं परत येण्याची वेळ होते. यजमान घरीं आल्यावर त्यांनीं विचारावं "कां? सभेंत काय झालं?" "मला जायला झालंच नाहीं." असें पत्नीचें शब्द ऐकतांच त्यांनीं भूंवया चढवून म्हणावें, "छे बुवा? इतकं जा म्हणून सांगितलं तरी जायला झालं नाहीं! काय चाललं होतं इतका वेळ? मी टेनीसचे चार सेट आणि पत्त्याचें तीन डाव खेळून शिवाय किती वेळ तरी गप्पा मारीत बसलो होतो, म्हटलं घरीं जरा उशीरा जावं, पण तुम्हां बायकांना घरातून बाहेर जायलाच नको. अगदीं गांवढळ, जगांत काय चाललें आहे याची कोणाला पर्वा आहे? खरोखरी हिंदु स्त्रियांसारख्या अशिक्षित स्त्रिया या साऱ्या जगांत नाहींत!" म्हणून तिची चांगली पूजा करावी! इकडे म्हणायच क्लबमध्यें जात नाहीं, व्याख्यानाला जात नाहीं, अमकीकडे जात नाहीं, तमकीकडे जात नाहीं, व इकडे अमुक वाजतां जेवण तयार पाहिजे! मुलांनीं रडलं न पाहिजे! सर्वांची तब्बेत ठेविली पाहिजे! घरांत चार मंडळी असणार त्यांपैकीं एक आठ वाजतां जेवणार, एक नऊ वाजतां, तर एकाला रात्रींच्या दहा वाजतां उजाडणार! मुलं असतील तीं पांच वाजतांच जेवणासाठीं नाचविणार! तोच प्रकार सकाळचा, म्हणजे दिवसाचा बहुतेक वेळ जेवणं व खरकटीं काढण्यांतच जाणार. तेव्हां दुसरातिसरा धंदा त्या करणार केव्हां? हा कोणी विचार करीत नाहीं; हल्लींच्या पद्धतिमुळें बिचाऱ्या कित्येक स्त्रियांचे दुहेरी हाल होऊं लागले आहेत. स्त्रिया सुशिक्षित व्हाव्या, त्यांनीं सभेतून वगैरे व्याख्यानं द्यावीं, सभेला जावें असं जर वाटत असलं तर तुम्ही त्यांना तशी मोकळीक नको कां द्यायला? युरोपीयन समाजाप्रमाणें शिस्तवारपणानं तरी वागत जा. तेंहि नाहीं अन् हेंहि नाहीं."

"ताई, केव्हांची तूं वर येऊन बसली आहेस," शंकररावची आई दारांतूनच म्हणाली. "तो शरू रडतोयना खालीं."

"काय झालं?" ताई उठून म्हणाल्या व त्या तेथून गेल्याहि. त्यांच्या तोंडून अधिक ऐकण्याची माझी इच्छा होती. आज ताईनीं पुरुषांवर व स्त्रियांवरहि कोरडे ओढले होते. त्यांच्या संभाषणावर मी किती वेळ विचार करीत होतो. त्या म्हणतात त्याप्रमाणें खरोखरीच आपल्या समाजाची हल्लींची स्थिति आहे कां? शंकररावहि गप्पच

होता, इतक्यांत बाबूराव आल्यामुळें आम्हीं तिघे समुद्रावर गेलो व ताईंच्या भाषणावर आम्ही तिघेहि किती वेळ तरी वादविवाद करीत होतो.

---

## स्मृति अठ्ठाविसावी.

# अनपेक्षित भेट.



बाबूरावकडून मला साधारणपणें घराकडील हकीकत कळली होती, त्यावरून माझ्यासंबधीं झालेला भाऊंचा प्रतिकूल ग्रह बदलला असावा, असें मला वाटत होतें, परंतु खात्री होईना; घरीं जाऊन भाऊंना भेटावें, असें मनांत असूनहि मला जावें असें वाटेना! शंकररावकडे आल्यानंतर आतां आमची अर्धी सुटी संपून रोज सकाळीं मी बाबूरावच्या येथें जावें व संध्याकाळीं बाबूरावनें आमच्याकडे यावें व नंतर आम्ही तिघांनीं मिळून फिरावयास जावे, असें आमचें ठरलें होतें. बाबूरावची घरची स्थिती बरीच गरिबीची होती. त्याला तेथल्या इंग्रजी शाळेंत तीसपस्तीस रुपये पगार होता, व कुटुंबांत चार माणसें असल्यामुळें त्याला जेमतेम आपला संसार चालवावा लागत असे. स्वतःच्या महत्वाकांक्षेवर व भावी सुखावर तिलांजली त्याला द्यावी लागली होती, त्याबद्दल तो कधींहि कुरकूर करीत नसे. उलट आपल्या कुटुंबाचा चरितार्थ चालविणें हा आपला धर्मच आहे असें तो म्हणत असें. स्वतःपेक्षां त्याला आपल्या बहिणीबद्दल फार वाईट वाटे, तो आपल्या बहिणीशीं भावाशीं व आईशीं फारच प्रेमळपणानें वागत असें. त्यांचें लहानसें कुटुंब गरिबींत दिवस काढीत होतें, परंतु ते एकमेकाच्या सुखासाठीं झटत असत. बाळकृष्णहि आपल्याकडून होईल तितके करून आपल्या वडीलभावाला, बहिणीला व आईला संतुष्ट करण्याचा प्रयत्न करीत असे. बाळकृष्णाला पुष्कळ विद्या शिकवून आपली इच्छा त्याच्या हातून पुरी करावयाची अशी बाबूरावाची इच्छा होती. त्यांच्या कुटुंबांतला वात्सल्यपणा, प्रेमळपणा पाहून मला फार समाधान वाटत असे. अद्यापिहि बाबूरावला आमच्या लहानपणच्या मराठी शाळेंतल्या प्रसंगाची आठवण होऊन वाईट वाटत असे. माझ्यामुळें तूं एवढा मार खावून घेतलास असें तो वारंवार म्हणे.

आज नित्याप्रमाणें मी बाबूरावची वाट पहात माडीवर शंकररावाच्या खोलींत बसलो होतो, शंकरराव नुक्ताच कशालासा खालीं गेला होता, आज बाळासाहेब येथें असता तर काय मजा झाली असती असा विचार माझ्या मनांत किती तरी वेळां येऊन गेला असेल. आपण वाटेल तशी जरी कल्पना केली तरी तसा प्रकार फार क्वचितच घडतो. बाळासाहेबला भेटण्याची मनांत फार इच्छा होती, पण ती मनांत येतांच पुरी होणें शक्य नव्हतें. मी अशा विचारांत होतो तोंच खोलीच्या बाहेर कोणाच्या तरी पावलांचा आवाज ऐकूं आला. शंकरराव असेल असें मला प्रथम वाटलें, मी सहज दारा-

कडे पाहिलें, तो शंकरराव व बाबूराव नसून तिसरेच बरेंच प्रौढवयाचे गृहस्थ दारांतून आंत येत होते. मीहि माझ्या जागेवरून उठून उभा राहिलो. ते गृहस्थ घाईनें पुढें येऊन त्यांनीं घोगऱ्या अवाजांत माझ्या नांवाचा उच्चार केला. " चंदू ! चंदू ! !" आलेले गृहस्थ दुसरें कोणी नसून माझे भाऊंच होते, मी त्यांना त्यांच्या आवाजावरून चटकन् ओळखलें व माझ्या तोंडून आश्चर्योद्गार निघाले,

" कोण ? भाऊ ? "

भाऊंनी एकदम पुढें होऊन मला आपल्या हृदयाशीं धरलें ! अहाहा ! ! आमच्या पितापुत्राच्या त्या वेळच्या भेटीचें कोण वर्णन करूं शकेल ! माझ्या बाळपणापासून माझा पित्यानें माझ्या शरिराला क्वचित्च स्पर्श केला असेल, आज मी त्यांच्याबरोबरीचा असतां त्यांनीं मला हृदयाशी धरावें हें आश्चर्य नव्हे काय ? परंतु अपत्यप्रेम कसें असतें तें सांगण्याची जरूर नाहीं. माझ्या प्रेमळ पित्याच्या प्रेमाचा मला आज अनुभव आला. मी इतके दिवस त्यांना कठोरहृदयीं समजत होतो ! कित्येकांच्या अंतःकरणांत प्रेमाचा झरा अखंड गुप्तरीतीनें वहात असला तरी तो इतरांना न कळून त्यांच्याविषयीं गैरसमज उत्पन्न होतो. माझ्या पित्याचें माझ्यावर प्रेम किती अलोट होतें याचा मला पूर्वी अनुभव आला नसल्यामुळें, इतर कांहीं कठोरहृदयीं पुरुषांत मी आजपर्यंत त्यांची गणना करीत आलों होतो. दर्शनीं मी त्यांना ओळखूं शकलों नाहीं. आज आठनऊ वर्षांत त्यांच्यांत बराच फरक पडला होता. पूर्वीचें त्यांचें तें सुदृढ शरीर आतां बरेंच कृश दिसत होतें. त्यांचा चेहरा काळवंडलेला होता, डोळे खोल गेले होते व केंस बहुतेक पांढरें झाले होते. त्यांच्या वयाच्या मानानें ते बरेंच वृद्ध दिसत होते. प्रथम कांहीं काल आम्ही दोघेहि निस्तब्धच होतो, काय बोलावें हें कोणालाच कळेना ! आनंद, आश्चर्य आणि लज्जा यामुळें माझ्या मुखांतून शब्दोच्चार होईना ! भाऊंचीहि जवळ जवळ तशींच स्थिति झाली असावी. इतका वेळ बाबूराव मुकाट्यानें दाराबाहेर उभा राहून आमच्या पितापुत्राच्या भेटीचा अपूर्व देखावा पहात होता. भाऊ माझा हात धरून एका खुर्चीवर बसले, मीहि त्यांच्याजवळ एका खुर्चीवर खाली मान घालून येणारे अश्रु पुसून बसलों होतों. त्यांच्यांशीं बोलण्याचें तर राहोच, पण त्यांच्या तोंडाकडे पहाण्याचेंहि मला धैर्य होईना ! बाबूरावाला आंत येऊन बसण्यास भाऊंनीं सांगितल्यावरून तोहि मुकाट्यानें एका खुर्चीवर येऊन बसला. माझा हात आपल्या हातांत घेऊन कांहीं वेळानें भाऊ सद्गदित स्वरानें म्हणाले,

" चंदू, तूं असा एकाएकीं घरांतून जाशील असें मला वाटलें नव्हतें."

काय उत्तर द्यावें म्हणून मी विचारांत पडलो. " तुला घरांतून अशा रीतीनें घालवून देण्याला मीच कारण झालों, त्याबद्दल मला मागाहून पुष्कळ पश्चाताप झाला. मी तुझा पुष्कळ शोध केला, पण तुझा कोठेंच पत्ता लागला नाहीं; बाबूनें जर मला कळविलें नसतें तर अद्यापहि तुझा पत्ता मला लागला नसता." इतकें बोलून त्यांनीं एक दीर्घ श्वास सोडला.

माझ्या प्रेमळ पित्याला हल्लींची अशी अकाली वृद्धावस्था येण्याला मीच कारण आहे, असें मनांत येतांच माझ्या हृदयाला पिळ पडूं लागला. माझ्यासारखा आपमतलबी नीच कोणी नसेल असें मला वाटून माझें अंतःकरण दुःखावेगानें भरून आलें !

" खरोखरीच चंदु, ज्या पित्यानें तुझ्याकडे तुझ्या बालपणापासून मुळींच लक्ष दिलें नाहीं, त्याला योग्य असेंच शासन झालें ! तुझ्यासाठीं तूं घरांतून गेल्यापासून मी रात्रंदिवस तळमळतों आहे, तुझ्या आईला व तुझ्या आजीला मी जें वचन दिलें, तें माझ्याकडून फार चांगलें पाळलें गेलें ! " कंठ दाटून आल्यामुळे भाऊंच्यानें जास्त बोलवेना, मी एकदम भाऊंच्या पुढें गुडघे टेकून गहिंवरून म्हणालो,

" भाऊ, मला तुम्ही घरांतून जा म्हणून सांगितलें नव्हतें. माझ्यावर चोरीचा आळ आला म्हणून दुसरा तिसरा विचार न करतां मी घरांतून चालता झालो, परंतु "नंतर मला पुष्कळ वाईट वाटलें, भाऊ–" अगदीं हलक्या स्वरांत मी म्हणालो. भाऊ. मला क्षमा क-- "

" छे, छे ! बाळ चंदू. तुला मी क्षमा ती काय करायची ? " खिन्नपणे सुस्कारा सोडून ते म्हणाले. त्यांचा आवाज अगदीं मृदु होता. माझा हात धरून पुनः त्यांनीं मला आपल्याजवळ बसविलें. माझ्या मुखाकडे अनिमिष नेत्रानें पहात ते म्हणाले, ' अरेरे ! मी तुझा बाप जिवंत असता, तुला आपल्या पोटासाठीं किती यातायात करावी लागली किती भयंकर हाल सोसावे लागलें ! त्या दुष्ट गंग्यामुळें मला तुझ्याविषयीं संशय आला. ते पांच रुपये भिमाजवळून घेतलें होतें, असें तूं त्याच वेळीं कां नाहीं सांगितलेंस ? " मी कांहीं न बोलता खालीं मान घालून बसलों होतों. बाबूराव भाऊंना म्हणाला,

" भाऊ, चंदूनें चोरी केली नसून गंगुमामानें केली हें केव्हां कळलें ? "

" प्रथम कांहीं दिवस याच्यावरच माझा संशय होता." भाऊ म्हणाले. " कारण ज्या दिवशीं माझें सोन्याचें घड्याळ चोरीस गेलें त्याच दिवशी याच्याजवळ पांच रुपये पाहून याच्याजवळ मुळींच पैसे नसतां हे पांच रुपये कोठून आले असें सहाजिकच वाटलें. बरें, रुपये कोठून आणलेस तेहि हा सांगेना, तेव्हां याच्यावरचा चोरीचा संशय अधिक बळावला. आपल्या मुलानें चोरी करावी असें कोणत्या पित्याला वाटेल बरें ? याच्या लहानपणाच्या एकंदर वर्तनावरून हा चोरीसारखें नीचकर्म करील असें मला वाटेना, परंतु रुपये कोठून आणले तेहि सांगेना ? तेव्हां यानें कबूल व्हावें म्हणून मी याच्यावर पुष्कळच रागावलो; त्याचा परिणाम असा होईल असें मला वाटलें नव्हतें; " जरा थांबून ते पुढें म्हणाले, " त्या हरामखोर गंग्यानें चोरी करून आपल्यावर संशय येऊं नये म्हणून याला पकडला. मीहि पुरतेपणीं चौकशी करण्यापूर्वी याला वाटेल तसें बोललों. हा घरांतून गेल्यावरहि एकदोन लहानसान चोऱ्या झाल्या, तेव्हां याच्यावर चोरीचा आळ घेण्यांत आपण उतावीळपणा केला,

असें माझ्या मनांत मला वाटूं लागलें. पुढेंतर गंगोबांनीं कमालच केली; हजार बाराशांच्या मालावर हात मारून तो नाहींसा झाला तेव्हांपासून घड्याळ त्यानेंच चोरलें असून चंदूवर आपण विनाकारण आळ घेतला असें मला वाटूं लागलें. माझ्या दृष्टीनें मला जोपर्यंत हा अपराधी दिसत होता, तोपर्यंत मला असें वाटत होतें कीं, येईल थोड्या दिवसांनीं, कोठें जाणार . आहे ? परंतु गंग्यानें चोरी केल्यानंतर चंदू जवळ पांच रुपये कोठचे हें जेव्हां भिमानें मला सांगितलें तेव्हां खरा प्रकार माझ्या दृष्टीस आला; व आपण चंदूशीं फार कडकपणानें वागलों, म्हणून मला वाईट वाटूं लागलें. त्यानंतर मी याचा अद्यापपर्यंत पुष्कळ ठिकाणीं तपास करून पाहिला पण कोठेंच पत्ता लागला नाहीं. संतापाच्या व दुःखाच्या भरांत यानें जीव तर दिला नाहीं ना ? असेंहि मला वाटूं लागलें. अखेरीस तोच संशय खरा होऊं लागला. दोन वर्षांपूर्वी एके दिवशीं वर्तमानपत्रें चाळींत असतां, इंटरच्या रिझल्टमध्यें पास झालेल्या विद्यार्थ्यांची नांवें पहात असतां सी. व्ही. देशपांडे म्हणून एका विद्यार्थ्याचें नांव माझ्या दृष्टीस पडलें व हा माझा चंदूच असावा असें प्रथम वाटून आशा उत्पन्न झाली; परंतु एका नांवासारखें दुसऱ्याचें नांव कशावरून नसेल, असा लगेच मनांत विचार आला. घरांतून निघून गेल्यामुळे चंदूला आपल्या पोटाचीच चिंता वहावी लागत असेल तर तो विद्या कोठून शिकणार ? ह्याहि एक विचार माझ्या मनांत येऊन माझी पूर्ण निराशा झाली ! ''

" आपण वर्तमानपत्रांत जाहीरात कां दिली नाहीं ? " बाबूराव म्हणाला.

" एक वेळ माझ्या मनांत तो विचार आला होता, परंतु याच्या जीविताविषयीं मला मुळींच आशा वाटत नसल्यामुळें मी तो विचार अमलांत आणला नाहीं. खरो-खरी, बाबूराव, माझा नष्ट झालेला मुलगा मला परत मिळवून देण्याचं सर्व श्रेय तुलाच आहे. " दीर्घ श्वास सोडून ते पुढें म्हणाले, " हा घरांतून गेल्यानंतर माईकडूनहि याला किती त्रास होत होता हेहि मला, भिमाकडून कळलें. मी घरांत बरोबर लक्ष न दिल्याचा हा परिणाम. " इतकें बोलून भाऊ गप्प बसले.

" भाऊ, भीमा कोठें आहे ? " मी म्हणालों.

" भिमा; भिमा आपल्याकडून निघाली, पण तिला माईनींच काढली असावी असें मला वाटतें. तिलाहि अद्याप तुझें विस्मरण झालें नाहीं. तुझा पत्ता लागला कां नाहीं याविषयीं ती बाहेरूनच तपास करीत असते, चंदू ! " माझ्याकडे पहात भाऊ एकदम म्हणाले, "तूं आतां घरीं येशील ना ? माझ्याबरोबर घरीं तुला नेण्याचा माझा विचार आहे ! " घरीं जाण्याचें नांव काढतांच मला पूर्वस्थितीचें स्मरण झालें, माई-साहेबांची ती कर्दनकाळमूर्ति माझ्या डोळ्यांसमोर उभी राहून इतक्या मोठ्या वयांतहि त्यांच्या विचारानें माझ्या हृदयांत कंप झाल्याशिवाय राहिला नाहीं. परंतु भाऊंची मर्जी मोडणें मला बरोबर वाटेना, भाऊंच्याबरोबर घरीं जाण्याचा मी निश्चय केला. मी कांहीं बोलत नाहीं असें पाहून भाऊ म्हणाले,

" चंदू ! माईकडून आतां तुझा पूर्वीसारखा छळ होणार नाहीं. माझ्यासाठीं तरी तूं घरीं येणार नाहीं काय ? "

" हो, भाऊ. मी तुमच्याबरोबर घरी यायला तयार आहे. घरीं कधीं जाईन असें मला कधींपासून तरी वाटत होतें. कधीं जायचें आपल्याला ? " मी उतावीळपणानें म्हणालो.

" आज रात्रींच जाऊं."माझ्या खांद्यावर प्रेमळपणानें हात ठेवून भाऊ म्हणाले.

" छे, छे. चंदू ? एवढी काय घाई ? " बाबूराव म्हणाला. " भाऊ आजच आले व तुम्ही लागलेच आज रात्रीं जाणार? उद्यां गेलात म्हणून काय हरकत आहे ? आजचा विचार तरी बदलून टाक चंदू ! "

" बरें आहे. बाबू, आम्ही उद्या जाऊं. " भाऊ म्हणाले.

"बाबूराव, मला न कळवितां मी येथें आहे हें तूं भाऊंना केव्हां कळविलेस ?" हा प्रश्न केव्हांपासून विचारीन म्हणून मी मनांत म्हणत होतो, त्यावर बाबूराव हंसून म्हणाला,

" तुझी व माझी भेट झाली, त्याच्या दुसऱ्याच दिवशीं तूं येथें आहेस म्हणून मी भाऊंना कळविलें; पण तें पत्र भाऊंना इतक्या उशीरानें कसें मिळालें कोण जाणें !

" बाबू, तुझें पत्र आलें, तेव्हां मी घरी नव्हतो. माझी प्रकृति ठीक नसल्यामुळें मी एकटाच माझ्या एका मित्राच्या येथें महाबळेश्वराला गेलो होतो. तें तुझें पत्र मला काल तेथें मिळालें व मी लागलाच जी गाडी मिळाली त्या गाडीनें निघालो. " माझ्याकडे वळून भाऊ म्हणाले. " चंदु, चल. तूं ज्या मित्राच्या येथें आहेस त्यांच्या वडिलांची व माझी ओळख करून दे व नंतर तुला घेऊन मी बाबूकडेच जाणार आहे. मी बाबूच्या येथें आणि तूं येथें रहाणें बरोबर दिसत नाहीं. " इतका वेळपर्यंत आपण कोठें आहोत याचें मंला स्मरणच नव्हतें,आमच्या पितापुत्राच्या भेटींत व्यत्यय येऊं नये म्हणून शंकरराव वगैरे कोणीहि अद्याप तेथें आलें नव्हतें.आतां आम्ही तिघेहि तेथून उठलो. भाऊंच्याबरोबर मीहि आपल्या घरीं येणार म्हणून बाबूरावला फार आनंद झालेला दिसत होता, मलाहि त्याच्या घरीं जाण्याला आनंदच वाटत होता. परंतु शंकररावचें मन मोडूं नये असें वाटत असल्यामुळें मी तसें बोलूं शकलो नाहीं. आज माझ्या पित्याच्या आकस्मिक भेटीनें मला जो परमानंद झाला होता त्याचें वर्णन करणें अशक्य आहे, आपल्या पित्याचें आपल्यावर आपल्या अंदाजापेक्षां किती तरी प्रेम आहे, हें जाणून माझें फार दिवस प्रेमासाठीं भुकेलेलें अंतःकरण प्रेमरसानें उचंबळून आलें. आपल्याचसाठीं आपल्या पित्याला ही अकालीं वृद्धावस्था प्राप्त झाली आहे, हें जाणून माझ्या हृदयांत वृश्चिकदंशाप्रमाणें तीव्रवेदना होऊं लागल्या.

आम्ही खालीं आल्यावर शंकररावचे वडिलांची भाऊंशी ओळख करून दिली. आम्ही पितापुत्र फार दिवसांनीं भेटलो म्हणून दादासाहेबानींहि आपला आनंद व्यक्त

केला. भाऊ मला आजच बाबूरावकडे घेऊन जाणार आहेत हें ऐकून शंकररावला वाईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं. परंतु आतां मला जाऊं न देणें हें योग्य नाहीं असें जाणून तो विशेष बोलला नाहीं. भाऊंची व माझी भेट झाली म्हणून शंकररावच्या मंडळीला जितका आनंद झाला, तितकेंच मी आजच त्यांच्या घरांतून जाणार म्हणून वाईट वाटलें. आणि तसें सर्वांनीं बोलूनहि दाखविलें. कांहीं वेळानें सर्वांचाच निरोप घेऊन व उद्यां आम्ही तिघांनींहि शंकररावकडे भोजनाला यायचें कबूल करून बाबूरावच्या येथें गेलो.

बाबूरावनें आमची भेट करून दिल्याबद्दल मी त्याचें मनापासून आभार मानिले. भोजनोत्तर आम्ही तिघे बाहेर ओटीवर बसलों असतां माझ्या जवळून माझी साविस्तर हकीकत भाऊंनी ऐकून घेतली. माझ्यावर जीं अनेक संकटें आलीं त्याबद्दल त्यांना फार वाईट वाटलें; तसेंच शेटसाहेबाबद्दल त्यांचा फार चांगला ग्रह झाला व त्यांना भेटण्याची त्यांना अतोनात इच्छा झाली. रजा संपून मी मुंबईला जातांनां माझ्याबरोबर मुंबईस शेटसाहेबांना भेटण्याची आपली इच्छा आहे असें त्यांनी मला बोलून दाखविलें व ती गोष्ट मलाहि पसंत पडली. आम्ही किती वेळ तरी बोलत होतो. पुनः मी पळून जाईन अशी भीति वाटूनच कीं काय, भाऊ अगदीं माझ्याजवळ बसले होते व क्षणोक्षणीं माझ्या चेहऱ्याकडे निरखून पहात होते.

दुसऱ्या दिवशीं ठरल्याप्रमाणें आम्हीं शंकररावच्या येथें भोजनास गेलों, भोजनानंतर थोडा वेळ गप्पागोष्टी करून आम्ही बाबूरावाकडे जावयास निघालो, जातांना मी ताईचा व त्यांच्या आईचा निरोप घ्यावयास गेलो, त्या दोघींनीं मला पुनः येण्याचा फार फार आग्रह केला व ताईनीं आपल्या घरीं शंकरराव बरोबर येण्याचा फारच आग्रह केला व ती गोष्ट तेवढ्यापुरती मी कबूल केली. मी येथून जर बाहेर पडतो, तो कोठूनशी मधुरी आली व मला हलकेंच म्हणाली,

" कांहो, तुम्ही तुमच्या घरीं जाणार, नाहीं का ? "

" होय, कां बरें ? " मी तिला विचारलें.

" कांहीं नाहीं. मग तुम्ही इथं कधीं याल ? ',

" आतां सध्यां नाहीं येणार. " माझ्या तोंडाकडे आश्चर्यानें कांहीं वेळ पाहून ती म्हणाली,

" बरं, इथं नाहीं तर नाहीं; पण आमच्या घरी याल कां ? दादांनाहि फार आनंद होईल, खरंच याल कां ? "

" पण तुझ्या दादांची व माझी मुळींच ओलख नाहीं ती ? "

" अहो ! माझी आहे ना ? " ती हंसून म्हणाली. " नाहीं कां तुम्ही येणार ? मला वाटतं तुम्ही एकदां तरी आमच्या घरीं यावं. तुम्हाला पुनः रजा पडेल तेव्हा या, याल का ? '



मी सांगण्यापूर्वीच भाऊ तेथें आले— प्र० २८ वें ( पृ० १७५ )

" बरें आहे पाहीन, " मी हंसून म्हणालो. ती मला एवढा कां आग्रह करते हें मला कळेना ?

" अं-हं. " मान हलवून ती म्हणाली. " कबूल करा. "

" पण मी आलेंच पाहिजे असें तुला कां वाटतें ? "

" हें पहा, आमचें घर तुम्हांला दाखवायचें आहे. " ती भूवया वर चढवून म्हणाली " आणि हें पहा तुम्ही फार चांगले अहांत " इतकें बोलून ती तेथून धांवत दुसरीकडे निघून गेली. तिच्या शेवटल्या शब्दाचें मला आश्चर्य वाटूं लागले. मी चांगला आहें असा तिचा ग्रह कशानें झाला, कळत नाहीं ? असो, मला निरोप देतांना शंकररावला वाईट वाटत होतें, असें त्याच्या खिन्न झालेल्या मुद्रेवरून दिसत होतें; तोच प्रकार बाबूरावच्या घरून निघतांना झाला ! कॉलेज सुरूं झाल्यावर माझी व शंकररावची गांठ पडणार होती, परंतु बाबूरावची कधीं पडेल याची शाश्वती नव्हती. मला निरोप देतांना त्यांच्या डोळ्यांस पाणी आलें होतें व कंठ दाटल्यामुळें शब्दोच्चार होत नव्हता. माझीहि तशीच स्थिति झाली होती ! बाबूरावची इतक्या वर्षांनंतर गांठ पडून पुनः थोड्या दिवसांत आमचा वियोग झाला ! भाऊंना मात्र विलक्षण आनंद झालेला त्यांच्या प्रफुल्लित चेहऱ्यावरून दिसत होता. त्यांना आनंदांत पाहून मलाहि आनंद वाटत होता. आम्ही आमच्या गांवीं येतांच मला माझ्या बालपणाच्या स्थळांच्या दर्शनानें फार आनंद वाटत होता. पूर्वीच्या कांहीं कांहीं स्थळांत नाविन्य दिसत होतें. आम्ही घरांत पाय देतांच माईसाहेबांची स्वारी पुढेंच माझ्या दृष्टीस पडली, त्यांच्यांत काडीमात्र फरक झाला नसल्यामुळें मी त्यांना चटकन् ओळखूं शकलो. मी पुढें होऊन त्यांना नमस्कार केला. पाहिल्यानें त्या मला ओळखूं शकल्या नाहीं, परंतु मी कोण हें भाऊंनीं सांगितलें तेव्हां त्या माझ्याकडे आश्चर्यचकित होऊन पाहूं लागल्या ! मी जिवंतच आहेना ? असें प्रथम त्यांना वाटलें असावें. नंतर मी बाईला नमस्कार करण्याकरितां आंत गेलो व माईहि माझ्या पाठोपाठ आंत आल्या. बाईनेंहि मला ओळखलें नाहीं मी तिला नमस्कार करून उभा राहिलों. माई म्हणाल्या,

" अग, बनु ! याला ओळखलस कां ? " 'नाहीं,' म्हणून बाईनें मान हलविली व ती आश्चर्यानें माझ्याकडे पाहूं लागली. " अग, हा पळून गेलेला चंदू ! केवढा मोठा झाला आहे ताडाएवढा ! बापाच्या बरोबरीला दिसायला लागला ! दोघं बापलेक जवळ उभे होते, तेव्हां हाच मोठा दिसत होता, " माईच्या त्या बोलण्याचें मला हंसूं आलें, पण मी तें आंतल्या आंत दाबलें. मला पाहून बाईला आनंद झालासा दिसला. ती म्हणाली, " चंदु, इतके दिवस कुठें होतास तूं ?" मी सांगण्यापूर्वीच भाऊ तेथें आले व त्यांनींच नंतर सर्व हकीकत सांगितली. मी आलों आहे हें समजताच भिमा मला भेटावयास आली व मला एवढा मोठा ताडाएवढा पुरुष झालेला पाहून तिला फार आनंद झाला ! ती किती तरी वेळ माझ्या तोंडाकडे वेड्यासारखी पहात होती; घटकेंत हंसत होती व

घटकेंत रडत होती. माझ्या अगदीं जवळ येऊन व माझ्या पाठीवर ममतेनें हात फिरवून ती म्हणाली, "माझ्या बाळा ! कुठं होतास इतके दिवस ? मी आवदसेनें तुला पैसे दिले; मला मेलीला काय बुद्धि झाली पैसे द्यायची, म्हणून माझा बाबा गेला घरांतून." असें आपलें तिचें एकसारखें चाललेंच होतें. पूर्वीपेक्षां ती आतां बरींच वृद्ध दिसत होती. तिचें प्रेम माझ्यावर फार होतें. आपण पैसे दिले म्हणून मी घरांतून गेलो असें आपलें तिला वाटत होतें. मी तिची पुष्कळप्रकारें समजूत केली, अखेरीस तूं जर पुनः असें म्हणशील तर मी येथें येणार नाहीं, असें जेव्हां मी म्हणालों, तेव्हां ती गप्प बसली. मी परत आलों हें गांवांत बहुतेकांना कळलें. ही बातमी पसरविण्याला माई व भिमाच कारण होत्या. पण दोघी एकमेकींच्या विरुद्ध ज्याला त्याला माझ्या येण्याचें वर्तमान सांगत होत्या. मी आल्यानें माईंना बरें वाटत नव्हतें, परंतु मी आतां पूर्वीचा पोर नसून ताडाएवढा थोर आहे हें त्या पक्कें जाणून होत्या. बाईला मात्र माझ्या येण्यानें बरें वाटलें व तसें तिनें बोलूनहि दाखविलें. बाईहि पूर्वीपेक्षां बरीच खंगलेली दिसत होती. माझ्या ओळखीची जेवढी मंडळी होती, तेवढी मला भेटावयास आली व मीहि सर्वांच्या घरीं जाऊन आलो. सीताबाईचें चिरंजीव गोपाळराव आतां दोन कन्यांचें पिता झालें असून सीताबाईची त्यांच्यापुढें कांहींच मात्रा चालत नाहीं असें मला कळलें. गोपाळरावहि वेळप्रसंगीं आपल्या आईवर खुब ताशेरा झाडींत असत. ते आतां व्याजबट्ट्याचा धंदा करीत होते व त्यांत त्यांना प्राप्तिहि चांगली होती. आमचे तात्या मास्तर अद्यापिहि मुन्सफांच्या ओटीवर मुलांना शिकवित होते. मला पाहून त्यांना फार आनंद झाला. मी घरीं आल्यावर त्या संबंधीचें सविस्तर हकीकतीचें पत्र बाळासाहेबाला लिहिलें, व त्या पत्राचें त्याच्याकडून लागलेंच उत्तर आलें. त्यांत आम्हां पितापुत्राची भेट झाल्याबद्दल त्यानें आपल्या नेहमींच्या प्रेमळपणाला अनुसरून आनंद व्यक्त केला होता. व तुला आतां कधीं भेटेन असें मला झाले आहे, असेंहि लिहिलें होतें. त्याला भेटण्याची मलाहि फार उत्कंठा लागून राहिली होती. घरीं आल्यानंतर रजा किती लवकर संपून गेली याचें मला स्मरणहि राहिलें नाहीं. काल मी येथें आलो नाहीं तर उद्यां मला मुंबईला जावें लागणार असें मला वाटूं लागलें !

———:o:———

## स्मृति एकोणतिसावी.

# काकासाहेब.



रजा संपून कॉलेज उघडण्याला दोन दिवसांचा अवकाश होता, ठरल्याप्रमाणें मी व भाऊ मुंबईस आलो, भाऊ आपल्या एका स्नेह्याकडे उतरले व मी शेटसाहेबांकडेच गेलो. मुंबईत आल्याबरोबर बाळासाहेब आला कां नाहीं याची मी पहिल्यानें चौकशी केली. तो उद्यां येणार असल्याचें त्याच्या घरच्या वृद्ध नोकर रुद्राजीनें मला सांगितलें,

आज त्याची भेट न झाल्यामुळें जरी माझी निराशा झाली होती,: तरी तो उद्यां येणार हें ऐकून माझ्या मनाला समाधान वाटलें. शेटसाहेबांना मी माझी सर्व हकीकत सांगून माझे वडिल आपल्या भेटीला आले आहेत असेंहि सांगितलें. त्यांना माझी इत्थभूत हकीकत ऐकून आश्चर्य वाटलें. मला या अफाट दुनियेंत कोणीच नाहीं अशी त्यांची आजपर्यंत समजूत होती. पित्याच्या घराचा त्याग केल्याबद्दल मला ते दोष दिल्याखेरीज राहिले नाहींत व भाऊंना दुसरीकडे उतरूं दिलें याबद्दलही दोष दिलाच. भाऊंना त्यांच्या भेटीला ताबडतोब घेऊन येण्यास त्यांनीं मला पिटाळले. भाऊ आल्यावर त्या दोघांना एकमेकांच्या भेटीपासून फार आनंद झाला व त्यांचे बराच वेळ माझ्या संबंधानें संभाषण चाललें होतें; मला घर सोडण्याला आपलाच हलगर्जीपणा कारण झाला असें भाऊंचें म्हणणे होते;' व असा अविचार करून घर सोडल्याबद्दल शेटसाहेब माझाच दोष काढीत होते. यापुढे शेटसाहेबांच्या मदतीवर राहूं नये असें भाऊंचें म्हणणें होतें परंतु ती गोष्ट शेटसाहेब बिलकुल कबूल करीनात. ते भाऊला म्हणाले,

"हें पहा, तो तुमचा मुलगा आहे ही गोष्ट खरी, पण इतके दिवसांच्या सहवासानें तो मला माझ्या मुलाप्रमाणें वाटतो. त्यानें माझ्या कुटुंबाची एकेकाळीं अब्रू बचाविली आहे, तेव्हा त्याच्या शिक्षणाची सर्व तजवीज मीच करणार, या बाबतींत मी आपलें मळींच ऐकणार नाहीं. तसेच शिक्षण पुरे होईपर्यंत त्याला मी दुसरीकडे जाऊं देणार नाहीं. बी. ए. होईपर्यंत तरी त्यानें येथेंच रहावें अशी माझी इच्छा आहे, मग त्याच्या मर्जीस येईल त्याप्रमाणें त्यानें करावें. शिवाय आपण जर येथेंच रहात असता तर त्याला जबरदस्तीने मला माझ्याघरीं कधींहि ठेवता आले नसते. तो हल्लीं बी. ए. त आहे व तो त्यात खात्रीनें यश मिळविणार; बी. ए. झाल्यावर त्याला जास्त शिकण्याची इच्छा असली तर त्यानें शिकावें असे मला वाटतें. याबाबतींत आपण कांहीं बोलूं नये, रजेंत तो आपल्याकडे येत जाईलच, त्याशिवाय वाटेल तेव्हा आपण त्याला भेटावयास येत जावें, कोणत्याहि गोष्टीचा संकोच धरूं नये." शेटसाहेबापुढें भाऊ विशेष कांहीं बोलूं शकले नाहीं. अखेरीस निदान बी. ए. होईपर्यंत तरी मी शेटसाहेबांकडेच रहावें असें ठरलें. अतिशय आग्रह करून शेटसाहेबांनी भाऊंलाहि ते मुंबईत असेंपर्यंत तेथेंच राहावयास भाग पाडलें. त्यानंतर दोनतीन दिवस भाऊ तेथें होतें. नंतर गांवीं गेले. माझ्या घरच्या मंडळींना माझा पत्ता लागून आमच्या भेटी झाल्याचें पाहून मोहनलाललाहि फार आनंद झाला व त्याच्या आईलाहि आनंद झाला. मी आपल्या घरीं जाईन अशी भीति प्रथम मोहनलालला पडली होती, पण सध्या तरी मी जाणार नाहीं हें जाणून त्याला बरें वाटलें. मोहनलाल आता पूर्वींचा मोहनलाल राहिला नव्हता. त्याचा पूर्वींचा अल्लडपणा पार मावळला होता. हल्लीं तो इंग्रजी सहाव्या वर्गांत होता. त्याचें माझ्यावर प्रेम पूर्वीं जसें होतें, तसेंच अद्यापिहि होतें. मोहनलाल मला आपल्या वडिल बंधुप्रमाणे लेखित असे. आपण श्रीमंत असून आपल्या पित्याच्या जीवा-

वर हा ऐट मारीत आहे, अशी आढ्यता त्यानें मला कधीहि दाखविली नाहीं. त्यामुळें मलाहि तो माझ्या लहान भावाप्रमाणें वाटत असे. आपल्याला एखादी बहिण अगर भाऊ असावा अशी मला फार इच्छा होती, परंतु ती माझी इच्छा पुरी झाली नव्हती, त्यामुळें मोहनलाल मला माझ्या भावंडापेक्षांहि अधिकच प्रिय वाटत असे.

दुसऱ्या दिवशीं बाळासाहेब ज्या गाडीनें येणार म्हणून समजलें, त्यावेळीं धीर न निघाल्यामुळें मी स्टेशनवरच गेलों. गाडी स्टेशनांत आल्यावर सेकंडक्लासच्या डब्यांतून मला पाहिल्यामुळें हांसत हांसत बाळासाहेब घाईनें प्रथम उतरला व माझा हात धरून जोरानें हलवित व मोठ्यानें हंसत तो म्हणाला. " ओहो ! चिंतामणराव, आम्ही तुमचें मनापासून अभिनंदन करतो बुवा ! अखेरीस तुमचे वडिल तुम्हाला भेटले एकूण ! पण पळपुटे महाराज ? आतां तरी कोणीकडे पुनः पळ काढण्याचा विचार करूं नका." त्याच्या नेहमीच्या स्वभावानुरूप माझी थट्टा करून तो एकसारखा हंसतच होता. त्यानें कितीहि थट्टा केली तरी मला कधींच राग येत नसे. "मी तुझी एवढी थट्टा करतों पण तुला मुळींच राग येत नाहीं, आणि म्हणूनच तूं मला फार आवडतोस." असें तो मला नेहमी म्हणत असे. बाळासाहेबाच्या मागोमाग बापुसाहेब, सगुणा व तिसरे अगदीं 'फॅशनेबल युरोपीयन फुलड्रेस केलेला व डोकीला भले मोठें टक्कल पडलेले एक गृहस्थ उतरले. मी बापुसाहेबांशीं हस्तांदोलन करून सगुणेला कुशल प्रश्न विचारले. त्या टकल्या गृहस्थींची व माझी मुळींच ओळख नसल्यामुळें मी बाळासाहेबाला हळूंच विचारलें, "हे कोण गृहस्थ बाळासाहेब ?"

"ये.मी त्यांची व तुझी ओळख करून देतों." माझा हात ओढून बाळासाहेब म्हणाला. तसेंच त्या टकल्या गृहस्थालाहि म्हणाला, " काकासाहेब, हा माझा मित्र चिंतामणि, माझ्याप्रमाणें थोड्याच वेळांत हा तुम्हालाहि आवडूं लागेल." आमचे दोघाचेहि हस्तमिलाफ झाले. स्प्रिंगच्या चष्म्यामधून आपली तीक्ष्ण भेदक दृष्टी माझ्याकडे रोखून ओठांत भला लठ्ठ चिरूट असल्यामुळें तोतऱ्या शब्दांत काकासाहेब म्हणालेः—

" बहोत उत्तम, बाळासाहेब. तुमच्या या दोस्ताच्या भेटीनें आम्ही अगदीं खूष होऊन गेलों."

प्रथमदर्शनींच काकासाहेबांविषयीं माझा चांगला ग्रह झाला नाहीं. बाळासाहेबाला कोणी काका नव्हता हें मला माहीत होतें, मग बाळासाहेबानें हें काकासाहेब कोठून पैदा करून आणलें कोण जाणें ? असा विचार माझ्या मनांत आलाच. एखाद्या भल्या गृहस्थाविषयीं त्याची पुरी खात्री करून घेतल्याखेरीज बरा किंवा वाईट ग्रह करणें कांहीं चांगलें नाहीं, असें मलाच वाटूं लागलें. काकासाहेबांची चांगली ओळख होऊन त्यांची पुरी माहिती झाल्याखेरीज त्याच्याविषयीं कोणतेच मत करणें योग्य नाहीं असें मला वाटलें. त्यानंतर आम्ही सर्व बाळासाहेबाच्या बंगल्यावर गेलो. बऱ्याच दिवसांनीं आम्ही भेटल्यामुळें आम्हाला दोघांनाहि फार आनंद झाला. माझ्यासंबंधीं मी सर्व हकीकत पत्रद्वारें बाळासाहेबला जरी कळविली होती, तरी त्यानें पुनः माझ्या तोंडून

सव बदविलीच. भाऊंना भेटण्याची त्यानें इच्छा दर्शविली, तसेंच बाबूरावालाहि भेटावें असें आपल्याला वाटतें, असें तो म्हणाला. त्यानंतर हैद्राबादची सर्व हकीकत सांग व हे काका कोण म्हणून मी त्याला विचारलें तेव्हां तो म्हणाला,

" चिंतामणि, माझ्या हकीकतीपेक्षां तुझीच हकीकत एखाद्या कादंबरीसारखी रहस्यपूर्ण आहे. मला सांगण्यासारखें विशेष असें कांहींच नाहीं. ज्या भानगडीमुळें आम्ही एवढ्या घाईनें गेलों, ती तितकी कांहीं महत्वाची बाब नव्हती. आम्हीं न जातां आमच्या वकिलाला सर्व तंटा मिटवितां आला असता, परंतु आमच्या कारभाऱ्यांनीं घाबरून बाबांना तार ठोकली. झालें! आम्ही गेलो तेव्हां मग आम्हाला त्यांत लक्ष घालावें लागलेंच. आतां पुनः सर्व सुरळीत चालू झालें आहे. तुझ्याबरोबर शंकररावकडे येण्याची माझी फार इच्छा होती, परंतु हा मध्येंच घोंटाळा झाला म्हणून त्या आमच्या कारभाऱ्याचा मला फार राग आला. येथूनच जर मी तुझ्याबरोबर आलों असतों तर ते जमलें असतें, पण हैद्राबादेस बाबाच्याबरोबर गेल्यावर ते थोडेच मला परत येऊं देणार होते? दुसरे हें काकासाहेब कोण म्हणून म्हणतोस, तर ते आमचे दूरचे नातलग आहेत. ते दहाअकरा वर्षे युरोपांत राहून आले आहेत. इंग्लंड, अमेरिका वगैरे पुष्कळ देश फिरून आले आहेत व त्या देशाचें त्यांना बरेच ज्ञान आहे. तेथलें एक एक वर्णन ते असें कांहीं करतात कीं, इंग्लंडांत जाण्याची माझी इच्छा आता तर शतपट वाढली आहे. युरोपियनापुढें आपले लोक किती अज्ञानी आहेत हें हळूहळू मला पटूं लागलें आहे. त्यांच्यासारखें धाडस, कौशल्य व कर्तबगारी आपण दाखविल्याशिवाय आपला देश ऊर्जितावस्थेला येणार नाहीं! खरोखरी, चिंतामणि, माझ्याप्रमाणें तूंहि इंग्लंडला यावें अशी माझी फार इच्छा आहे."

मी खिन्नपणें हंसून म्हणालो, " बाळासाहेब, मलाहि तुझ्याप्रमाणें परदेशांत जावें असें वाटतें, पण कांहीं बाबतींत तुझें व माझें जमण्यासारखें नाही. तुझ्यापासून कधींहि दूर राहूं नये असें मला वाटतें पण—"

" पण काय? तुझे भाऊ तुला येऊं देणार नाहीं कां?"

" तसेंच कांहीं नाहीं. परंतु माझ्या भाऊंची प्रकृति बरीच अशक्त झालेली आहे व त्यांना अलीकडे नेहमीं बरें नसतें, त्यांना असें अकालीं दुखणें यायला मीच कारण आहे! इतक्या वर्षांनीं आम्ही भेटलों असतां, त्यांचें मन दुखवून परदेशांत आतांच जाणें मला बरें वाटत नाहीं." त्यावर बाळासाहेब कांहींच बोलला नाहीं. परदेशांत जाण्याची माझीहि मनापासून इच्छा होती, परंतु ती गोष्ट भाऊंना पसंत पडणार नाहीं अशी माझी खात्री होती. ते माझ्या इच्छेआड येणार नाहींत हीं गोष्ट खरी; पण मनांत त्यांना दुःख झाल्याशिवाय रहाणार नाहीं. माझ्यापासून दूर होऊं नये म्हणून ते आपली वकिली सोडून सर्वांना घेऊन मुंबईसच रहावयाला येण्याचा विचार करीत होते, तेव्हां फक्त आपल्याच पुढच्या सुखावर दृष्टी देऊन आपल्या पित्याला पुनः

चिंतेंत टाकणें अधमपणा होय असें मला वाटूं लागलें व माझी मनांतली इच्छा मी मनांतच दाबून टाकली. बापुसाहेबांनीं भाऊंना भेटण्याची आपली इच्छा दर्शविली व त्यांना तुम्ही आज संध्याकाळीं आमच्याच येथें घेऊन या म्हणून त्यांनीं मला फार आग्रहपूर्वक सांगितलें. अखेर त्यांचें म्हणणें कबूल करावे लागलें. घरीं गेल्यावर त्याप्रमाणें मी भाऊंना सांगितलें व त्यांनींहि येण्याचें कबूल केलें. भाऊंच्या भेटीनें बाळासाहेब, बापुसाहेब व काकासाहेब या त्रिवर्गास समाधान वाटलें. आम्ही दोघेच असतां माझ्या पाठीवर थाप मारून बाळासाहेब म्हणाला,

"चंद्या, अशा चांगल्या बापाला तूं त्रास दिलास त्याबद्दल तुला अगदीं कडक शासन केलें पाहिजे. तो पुंड्या बरा तुला माथ्याचा भेटला होता, मी जर तुझा बाप असतो तर घर सोडून पळून जाण्याच्या तुझ्या गुन्ह्याबद्दल तुला चतुर्भूज करून टाकलें असते वैशाखमहिन्यात!" असें म्हणून तो मोठमोठ्यानें हंसत सुटला. मलाहि त्याच्याबरोबर हंसू येऊं लागलें.

काकासाहेब आल्यापासून ते बाळासाहेबाला एकट्याला कॉलेजखेरीज कोठेंहि जाऊं देत नसत. जेथें बाळासाहेब जाई, तेथें हें बिनशेंडें नक्षत्र आहेच त्याच्या मागोमाग! त्याच्याशीं पूर्वीप्रमाणें मोकळेपणानें वागावयाला आम्हाला मात्र अडचण भासूं लागली. हा बजरबट्टू कधीं येथून जाईल असें माझ्या मनांत हजार वेळा येत असे. स्वारी होतीहि बजरबट्टूसारखी, वर्ण सांवळा व ठेंगणी मूर्ति. त्याचें वय जवळजवळ चाळीस वर्षांचें तरी असावें. परंतु मिशांना त्यांच्या ओठावर थारा न मिळाल्यामुळे तें बरेच तरुण दिसत, व आमच्यासारख्या दुप्पटीनें लहान मंडळींत नेहमीं असत. युरोपमधून आल्यालाच त्यांना सहासात वर्षे झालीं होतीं व ते त्यानंतर सगळा हिंदुस्थान देश फिरत होते; ते नुकतेच उत्तरहिंदुस्थानांतून हैद्राबादेकडे गेले व तेथून बापुसाहेबाबरोबर कांहीं दिवस रहाण्याला मुंबईस आले. एके दिवशीं संध्याकाळीं मी, बाळासाहेब व काकासासाहेब कोटांतून पायींच येत होतों; काका एका मोठ्या युरोपीयन 'रेस्टोरन्ट' पुढें उभें राहून म्हणाले, "कायरे बाळासाहेब? येतोस कां रेस्टोरन्ट मध्यें? माझा घसा अगदीं कोरडा पडला आहे बुवा. थोडा सोडा घेऊं आपण?" असें म्हणून ते पायऱ्या चढूं लागलेच व आम्हीहि त्याच्या मागोमाग आंत गेलों. सोडावाटरच्या तीन ग्लासची 'आर्डर' देऊन आम्ही तिघे एका टेबलाभोंवतीं बसलों. आपल्या खिशांतून एक उत्तम सुवर्णाची लहानशी डबी काढून व त्यांतली तपकीर आपल्या नाकांत कोंबून, काकासाहेब म्हणाले,

"हें पहा, मला तपकीर ओढतांना पाहून तुम्हांला हंसू येत असेल कदाचित्, पण काय करावें बुवा? नाइलाजास्तव हें व्यसन मला लावून घ्यावें लागलें. अहो, पूर्वी माझें डोकें फार दुखत असें. इतक्या भयंकर माथाशूळाची मला व्यथा लागली कीं, काही विचारूं नका. मी पुष्कळ उपाय करून पाहिले पण कांहीं नाहीं, बिलकूल

गुण नाहीं. शेवटीं एका सभ्यगृहस्थानें हा उपाय करायला सांगितला; प्रथम मला कांहीं हें खरें वाटेना; अखेरीस माथाशूळानें कंटाळून मी तपकीर ओढण्याची सुरवात केली. पण काय चमत्कार ? तेव्हांपासून कानांत गोष्ट सांगितल्यासारखा गुण आला पहा ! तेव्हांपासून मला आपली ही संवयच जडली आहे, ” असें म्हणून त्यांनीं आणखीहि एक बार भरून दिला. आम्ही दोघेहि स्तब्धपणे त्यांचें व्याख्यान ऐकत होता; इतक्यांत! बॉय सोडावाटरचें तीन ग्लास घेऊन आला, पण काकासाहेबांना फक्त सोड्यानें समाधान होण्यासारखें नव्हतें, त्यांनीं ‘ व्हिस्की’हि मागविली; त्याव-रहि गंभीर मुद्रा करून ते म्हणाले. “ काय करावें बुवा, या पोटदुखीमुळें मला ही ‘ व्हिस्की ’ घ्यावी लागते ! नेहमीं माझें पोट दुखतें ! जेव्हां ‘ व्हिस्की ’ चा एखादा ‘ पेग ’ घ्यावा, तेव्हां जरा बरें वाटतें ! ” मी विस्मयानें त्यांच्याकडे पाहूं लागलों ! शरीर अस्वास्थ्यामुळें त्यांना आणखी असलीं किती व्यसनें जडलीं आहेत ईश्वर जाणे ! स्वतःच्या ग्लासमध्यें त्यांनीं बरीचशी ‘ व्हिस्की ’ ओतून घेतली व मलाहि आग्रह करूं लागले, पण मी त्यांची ती गोष्ट साफ नाकारली. बाळासाहेब नको नको म्हणत असतां त्यांच्या ग्लासात त्यांनीं बळेंच थोडी व्हिस्की टाकली व हंसत म्हणाले.

“ अरे, बाळासाहेब, तूं म्हणे इंग्लंडला जाणार ? तेथल्या हवेला तर व्हिस्की ब्रॅन्डी अवश्य पाहिजेच. छे, बुवा ! तूं जर येथेंच थोडीशी प्रॅक्टीस करशील तर ठीक पडेल. नाहींतर तुझी तेथें एखादवेळेस फजिती होईल बघ. ” असें म्हणून ते खोखो हंसूं लागले. त्यांच्या मुरवतीस्तव बाळासाहेबानें तो ग्लास घेतला, पण बाळासाहेबाचा तो दुर्बलपणा मला मुळींच पसंत पडला नाहीं. त्यावेळीं मी काहींच बोललो नाहीं. पण मनांतून काकासाहेबांचा व आजच प्रथम बाळासाहेबाचा मला राग आला. तेथून भाड्याची मोटार करून आम्ही बाळासाहेबच्या बंगल्यावर जाण्याचें पूर्वी ठरविलें होतें; परंतु आतां मी येथूनच परस्पर घरीं जातों, असें कांहींसें रागानेंच बाळासाहे-बाला म्हणालो. माझ्याकडे खिन्नपणें पाहून तो म्हणाला,

“ चिंतामणि, तूं कां नाहीं येत ? चल, चल. ” त्यानें बळेंच माझा हात धरून मला मोटारीकडे ओढले. माझ्यानेंहि त्याच्याशीं अधिक कठोरपणा करवेना ! आम्ही तिघे बाळासाहेबाच्या घरीं आलों. बाळासाहेब मला माडीवर आपल्या खोलींत घेऊन गेला. आंत गेल्यावर त्यानें दार लावून घेतलें. माझ्याकडे पाहून तो म्हणाला,

“ चिंतामणि, तुला माझ्या आजच्या वर्तनाचा राग आला काय ? जें कांहीं तुला बोलायचें असेल तें स्पष्ट बोल. ”

“ हो. बाळासाहेब, तुझ्या आजच्या दुबळेपणाचा मला खरोखरींच फार राग आला आहे, ” मी जरा कठोरपणानेंच म्हणालों. “ आजच्यासारखाच कोणाच्या तरी संगतीनें तूं इंग्लंडांत वागत जा हं, काकासाहेबाची तुझ्यावर इतकी छाप कशी पडली कळत नाहीं ! ” बाळासाहेब माझ्या तोंडाकडे एकसारखा पाहूं लागला. त्याच्या नेत्रांत अश्रु होते, आपले दोन्ही हात त्यानें माझ्या खांद्यावर ठेविले.

" छे, चिंतामणि, " तो गद्गद कंठानें म्हणाला " काकासाहेबांना कां दोष देतोस ? माझेंच मन कोठें आहे ? तुझ्याप्रमाणें मी त्याचवेळीं नाहीं कां म्हणालो नाहीं ? चिंतामणि ! ही गोष्ट तूं बाबांना सांगू नको. नाहींना सांगणार ? " असें म्हणून त्यानें माझ्या खांद्यावर डोकें टेकलें. त्या प्रेमळ मित्राचा तो प्रेमळपणा पाहून त्याला कठोर शब्दानें ताडण केल्याबद्दल मलाहि वाईट वाटूं लागलें.

" चिंतामणि, एक वेळ मला क्षमा कर, यापुढें असें न करण्याबद्दल मी चांगली काळजी घेईन. बाबांना मात्र कळवूं नकोस. काय करूं ? केव्हां केव्हां माझें मन असें दुर्बल होतें खरें. "

आतां फार वेळ मला माझा राग ठेवितां येईना; मी बाळासाहेबाला म्हणालों " बाळासाहेब, झाली गोष्ट परत येत नाहीं, परंतु यापुढें जर मी तुला असें कांहीं करतांना पाहिलें कीं मला सहन होणार नाहीं, बघ. मी मग तुझ्यावर फार रागवेन. अरे ! अजून तर तुला पुष्कळ विद्याभ्यास करायचा आहे, आणि आजपासून तूं जर अशा भलत्याच नादाला लागलास तर कसें होईल ? शिक्षणाच्या नावाखालीं आपण वाटेल ते प्रकार करणें कधींहि योग्य ठरणार नाहीं. आयुष्यांत कित्येक प्रसंग असे असतात कीं, आपल्या हातून एखादवेळेस यत्किंचित् जरी चूक झाली, तरी त्याचा परिणाम जन्मभर भोगावा लागतो. म्हणून जी गोष्ट करणें ती विचारपूर्वक करावी. "

" पण, चिंतामणि, मी पुनः असें करणार नाहीं मग तर झालें ना ? "

" होय, बाळासाहेब. तूं पुनः असें करतां कामा नये. " माझ्या मुखावर हास्य पाहून त्याच्याहि मुखावर पूर्वींचें स्मित झळकूं लागलें. इतक्यांत खालीं बापुसाहेबांनीं त्याला हांक मारल्यावरून आम्ही दोघे गडबडीनें खालीं आलों. मी घरीं जातांना माझ्या मनांत तो मघाचचा प्रकार येऊन काकासाहेबांविषयीं संताप व बाळासाहेबाच्या दुर्बलपणाविषयीं खेद उत्पन्न झाला. असल्या पाजी लोकांपासून कित्येकांच्या घरादाराचा सत्यानाश झाला असेल !

---

## स्मृति तिसावी.

# बाळासाहेबांचें विलायतेस प्रयाण.



मागें लिहिल्याप्रमाणें काकासाहेब जे बाळासाहेबाकडे आड्डा ठोकून बसले होते, ते लवकर जातील असें चिन्ह दिसेना ! काकासाहेबानें कोणतीहि गोष्ट करावयाची म्हटली असतां बाळासाहेबाच्यानें त्यांना विरोध करवत नसे. काकासाहेबांनीं बाळासाहेबाला एक वेळ व्हिस्की घ्यावयास लाविली होती म्हणून मी बाळासाहेबावर बराच रागावलो होतो, त्यानें त्या दिवसापासून दारू जरी

घेतली नाहीं. तरी तो इतर बाबतींत त्याच्या अगदीं मर्जीनें वागत असे. नाटकें, सिनेमा, घोड्याच्या शर्यती पाहाण्याचा काकासाहेबांना विलक्षण नाद होता व ते आपल्याबरोबर बाळासाहेबालाहि ओढीत असत. मी त्याबद्दल बाळासाहेबाला पुष्कळ दोष देई; परंतु पहावयास जाणें म्हणजे प्रत्यक्ष कृति करणें नव्हे, असें म्हणून तो ती गोष्ट थट्टेवर नेत असे. कोणत्याहि गोष्टीचा अति नाद चांगला नाहीं असें मला वाटत असें. या काकासाहेबामुळें बाळासाहेबाला एकादा वाईट नाद न लागो म्हणजे झालें! असें मला अलीकडे वाटूं लागलें. मी आपल्याकडून कितीहि सांगितलें, तरी काकासाहेब फार चांगले आहेत अशी जी बाळासाहेबाची एकदां समजूत झाली ती झालींच! ते जें करतील तें चांगलेंच असणार असें त्याला अंतःकरणपूर्वक वाटूं लागलें. काकासाहेब रात्रंदिवस बाळासाहेबाच्या घरींच असल्यामुळें त्यांचें वजन त्याच्यावर पडून गेलें. आमच्या परिक्षेचें दिवस जसजसें जवळ येऊं लागले तसतसें बाळासाहेबाला विलायतेस जाण्याचें दिवसहि जवळजवळ येऊं लागले. काकासाहेबाच्या उत्तेजनाने विलायतेस जाण्याची बाळासाहेब दुप्पट जोरानें उचल करूं लागला. आपण इंग्लंडला कधीं जाऊं असें त्याला होऊन गेलें होतें. आतां कितीहि अडचणी काढल्या तरी तो ऐकणार नाहीं अशी बापुसाहेबांची खात्री होऊन चुकली. अलीकडे त्यांच्या चेहऱ्यावर मला औदासिन्य दिसत असें. सगुणा पूर्वीपेक्षां विशेषच गंभीर दिसूं लागली. काकासाहेबांचा स्वभाव सगुणेला आवडत नसावा कारण जेव्हां काकासाहेबावर तिची दृष्टी जाई, तेव्हां ती त्यांच्याकडे तिरस्कारानेंच पहात असावी असा मला भास होत होता.

मी चार पांच वेळ दोनतीन दिवसांकरितां तरी घरीं जाऊन आलो असेन, व भाऊ सातआठ वेळ तरी कांहींना कांहीं काम काढून मुंबईस येऊन गेले असतील. मला माझ्या परिक्षेच्या परिणामाची मुळींच काळजी नव्हती. पास होण्याची पूर्ण खात्री होती, परंतु मला आतां जी काळजी होती ती भाऊंच्या संबंधाचीच होय. दिवसेंदिवस त्यांची प्रकृति क्षीण होत चालली होती. कांहीं दिवस मुंबईंत राहून त्यांनीं चांगल्या डॉक्टरचें औषध घ्यावें म्हणून मी त्यांना किती वेळ तरी सांगून पाहिलें, 'थोड्या दिवसांत मी येथला सर्व कारभार आटोपून मुंबईस रहावयास येतो, म्हणून ते मला जेव्हां तेव्हां सांगत असत. बाईलाहि नेहमीं बरें नसेंच. माई होती तशींच होती. उलट पूर्वीपेक्षां तिला तोंड फार सुटलें होतें. गंगुमामासंबंधीं गोष्ट निघतांच ती त्याचा मुळींच वांक काढीत नसे. उलट, भाऊंनीं त्याच्या शिक्षणाची वगैरे काळजी घेतली नाहीं म्हणून पोर देशोधडीला लागला! असें ती ज्याला त्याला सांगत असे. भाऊवर व बाईवरहि वाटेल तसें तोंडसुख घेत असे.' तिच्या बडबडीकडे भाऊ मुळींच लक्ष देत नसत व बाईहि तिला कांहींच बोलत नसे.

बाबूरावचीं पत्रें नेहमीं येत असत; त्यानंतर भेटण्याला त्याला मला झालेंच नाहीं व तो येणेंहि शक्य नव्हतें. मी मनांत जो बेत योजून ठेविला होता, त्याप्रमाणें एके दिवशीं शेटसाहेबजवळ बाबूरावाविषयीं गोष्ट काढली होती, परंतु सध्यांच जरी नाहीं, तरी थोड्या दिवसांनीं बाबूरावला त्यांच्या बँकेंत नोकरी देण्याचें त्यांनीं कबूल केलें होतें व ते त्या विचारांतहि होते. मी ती गोष्ट बाबूरावाला अद्याप कळविली नव्हती. शंकररावहि मेच्या सुट्टीनंतर आपल्या गांवीं गेला नव्हता. त्याचें गांव आमच्या गांवापेक्षां मुंबईपासून जरा लांबच होतें.

मी लहानपणापासून ज्या मनोराज्याच्या कल्पना करीत होतों, त्यापैकीं बी. ए. होण्याची माझी कल्पना खरी होण्याचा समय अगदीं जवळ येऊन ठेपला. मी, बाळासाहेब व शंकरराव तिघेहि पास होण्याच्या आशेनें न कंटाळतां एकसारखा अभ्यास करीत होतों.अभ्यास करतां करतां फार कंटाळा आला कीं,बाळासाहेब हंसविण्याला कांहीं तरी कारण शोधून काढीत असे व घटकाभर आमची करमणूक करीत असे. आतां परीक्षा चार दिवसांवर–दोन दिवसांवर म्हणतां म्हणतां कधींपासून गाजत असलेली व जिच्यावर पुढील आयुष्याची इमारत उठवावयाची असते ती परीक्षा एकदांची होऊन गेली! आमच्या पेपरवरून आम्ही तिघे पास होऊं अशी आम्हां तिघांनाहि आशा वाटूं लागली. पूर्वी मनाला जो एकप्रकारचा ध्यास लागला होता, तो जाऊन मनाला जरा मोकळेपणा वाटूं लागला. पुढील अभ्यासाकरितां बाळासाहेब विलायतेस जाणार होताच, परंतु पुढें काय करावें हें माझें अद्याप कांहींच ठरलें नव्हतें. शंकरराव एल्. एल्. बी. च्या टर्म्स भरणार होता व मीहि एल् एल्, बी. व्हावें असें त्याचें मत होतें. पण एल्.एल्.बी. होऊन वकिली करणें मला पसंत नव्हतें. हल्लीं वकील डॉक्टरांचा सुळसुळाट पुष्कळ झाल्यामुळें वकिल होण्याचें माझ्या मनांत नव्हतें. बरें, बी. ए. ची डिग्री मिळतांच नोकरीच्या पाठीस लागून वणवण फिरण्याची आतां मला आवश्यकता नव्हती. आपल्या देशांत ज्या धंद्याची अवश्य जरूर आहे असा एखादा उद्योगधंदा शिकण्याची माझी फार इच्छा होती; व त्या धंद्याचें चांगलें ज्ञान मिळवावयास परदेशांत जाण्याची जरूर होती. पण परदेशात जाणें सध्यां मला शक्य नव्हतें. परीक्षेचा निकाल लागल्यावर काय तें ठरवूं, असें म्हणून मी स्वस्थ बसलों! परिक्षा होतांच शंकरराव आपल्या गांवीं गेला. मलाहि भाऊंनीं बोलाविलें होतें, परंतु बाळासाहेब परीक्षेचा निकाल लागल्याबरोबर इंग्लन्डला जाणार असल्यामुळें, गांवीं जाण्याचा बेत मी रहीत केला. भाऊंच्या अत्याग्रहास्तव दोन दिवस जाऊन त्यांना भेटून आलों. मी एल्. एल्. बी. होऊन भाऊंच्याप्रमाणें आमच्या गांवीं वकिली करावी असें भाऊंच्या मनांत होतें. परंतु वकिली करण्याची माझी मर्जी नाहीं हें जाणून ते विशेष कांहीं बोलले नाहींत. तसेंच त्याचवर्षीं माझें लग्न करून टाकावें असेंहि भाऊंच्या मनांत फार होतें, त्यांनीं अप्रत्यक्ष रीतीनें मला तसें बोलूनहि दाखविलें. आम्ही बी. ए. ची परिक्षा नुक्तीच दिली आहे हें जाणून बऱ्याच उपवर मुलींच्या पालकांकडून भाऊंना विनंतीपत्रें आलीं होतीं.

मला आश्चर्य वाटलें कीं, मी इतकें दिवस कोठें होतो याची कोणाला खबर नव्हती' परंतु बी. ए. ची परिक्षा दिलेला लग्नास योग्य वर आहे, ही खबर सर्वांना कशी मिळाली? त्या बाबतींतही माझ्याकडून भाऊंची निराशाच झाली. माझें अद्यापपर्यंतचे दिवस बहुतकरून चिंतेंतच गेले असल्यामुळें लग्नाच्या बाबतीचा मी कधींच विचार केला नव्हता व तो चुकूनसुद्धां अद्यापपर्यंत माझ्या मनांत आला नव्हता, तेव्हां भाऊंची मर्जी असतांहि मी माझी असंमति दर्शविली. माझ्या मर्जीविरुद्ध कोणतीच गोष्ट करावयाची नाहीं, असें भाऊंनीं ठरविलें असावें, कारण त्यानंतर ते त्या बाबतीसंबंधानें माझ्याजवळ फारसे कधीं बोलले नाहींत. लहानपणीं मला माझ्या पित्याच्या स्वभावाची पारख झाली नव्हती, इतर पित्याप्रमाणें त्यांनीं आपलें प्रेम उघडपणें व्यक्त करावें असें मला फार वाटे. तसें तें करीत नसत म्हणून मनांत मी त्यांच्यावर रागावत असे, परंतु आतां जसा मला त्याचा सहवास जास्त होऊं लागला, तसा त्यांच्या स्वभावांतला प्रेमळपणा व उदात्तपणा माझ्या चांगलाच प्रत्ययास येऊं लागला. आठनऊ वर्षे आपणहि कष्ट भोगलें व आपल्या पित्यालाहि कष्ट भोगावयास लाविलें, याबद्दल मला माझ्या मनांत पुष्कळ अनुताप होऊं लागला. परंतु गोष्ट घडून गेली ती पुनः कधींहि परत येणें शक्य आहे काय? शिवाय इतकें कष्ट भोगून मला जो जगाचा अनुभव आला त्याचा उपयोग माझ्या पुढील आयुष्यांत होऊन मला त्यापासून पुष्कळ फायदा झाला, असें मला आतां वाटतें.

शंकररावचें लग्न लवकरच होणार होतें, असें त्यानें जरी सांगितलें नाहीं, तरी बाबूरावच्या पत्रावरून मला कळलें होतें. आमच्या परिक्षेचा निकाल लागून आम्ही तिघेहि उत्कृष्ट रीतीनें उत्तीर्ण झालों होतो. मी पास झालों त्याचा जेवढा हर्ष भाऊंना झाला, तेवढाच शेटसाहेबांना झाला. मी पास झाल्यामुळें मला हर्ष झाला, परंतु बाळासाहेबाचें जाणें त्यामुळें जवळ जवळ येऊं लागलें. मित्रवियोगाच्या कल्पनेनेंच मला अतिशय खेद उत्पन्न होऊं लागला. आतां मी बी. ए. झालों! बी. ए. झाल्यावर मला अधिक शिकण्याची इच्छा असल्यास मी पुढें शिकावें असें शेटसाहेबानीं मला बोलावून सांगितलें. परंतु पुढें कोणीकडे पाऊल टाकावें हें अद्यापिहि माझें नक्की ठरलें नव्हतें, व त्यामुळें माझ्या मनात बराच गोंधळ उडाला होता. पुढें मी काय करावें, म्हणून बाळासाहेबाला विचारलें असतां तो हंसून म्हणाला,

"हें पहा, चिंतामणि, पुढचा रस्ता तुला दिसत नाहीं. म्हणून म्हणतो तूं चल माझ्याबरोबर! मी तुला चांगला रस्ता दाखवितो. अजून तरी माझ्याबरोबर येण्याचा विचार कर! पहा! तूं आलास तर मला किती तरी आनंद होणार आहे! खरोखरी; तुझ्यासारखा वृद्ध आजोबा माझ्याबरोबर मार्गदर्शक असला म्हणजे मलाहि बरें नव्हें कां?" इतकें बोलून तो गप्प राहिला. त्यावेळीं त्याच्या चेहऱ्यावर कांहींशा खिन्नपणाची छाया पसरली होती. पण याहि-वेळेस त्याचें म्हणणें मला कबूल करतां आलें नाहीं. बाळासाहेबाचें जाणें आतां

अगदीं नजीक आलें होतें. त्याचा बहुतेक वेळ प्रवासाच्या तयारींतच जात होता व काकासाहेब मध्येंमध्यें लुडबुडून त्याला सर्व माहिती पुरवित होते. विलायतेस जाण्या-पूर्वी बाळासाहेबाचें लग्न करून टाकावें असें बापुसाहेबांच्या मनांत फार होतें; परंतु ती गोष्ट बाळासाहेबानें साफ नाकारली. विलायतेस कायमचें राहण्यास कांहीं आपण जात नाहीं ! असें तो थट्टेनें आपल्या पित्याला म्हणूं लागला. बाळासाहेबाचा विवाह सगु-णेशीं व्हावा अशी बापूसाहेबांची मनापासूनची इच्छा होती आणि सगुणा बाळासाहे-बाला योग्य अशीच वधू होती. सगुणेचेंहि बाळासाहेबांवर प्रेम असावें असें दिसत होते. ती बाळासाहेबासाठीं इतके कांही स्वतः श्रम करीत असे कीं, तसे श्रम तशाच कारणाशिवाय होणें शक्य नाहीं. परंतु बाळासाहेब तिच्यावर भगिनीप्रेमाव्यतिरिक्त आधिक कोणत्याप्रकारचें प्रेम करीत असावा असें कांहीं दिसत नव्हतें. तो तिच्याशीं फार ममतेनें वागे, तिच्या मनाला लागेल अशी गोष्ट त्याच्या हातून घडली, तर त्याला फार वाईट वाटे. आपल्यासाठीं दर एक बाबतींत सगुणा एवढी काळजी घेऊन स्वतःला विनाकारण त्रास करून घेते, म्हणून तो तिला दोष देत असे. बाळासाहे बाचें जाणें, जसजसें जवळ येऊं लागलें, तसतसा बिचाऱ्या बापुसाहेबांचा जीव खालीं-वर होऊं लागला. आपल्या मनाचा उद्वेग व खिन्नपणा दुसऱ्याच्या नजरेस येऊं नये म्हणून ते आपल्याकडून पुष्कळ प्रयत्न करीत, परंतु तो त्यांचा प्रयत्न व्यर्थ जात होता. आपल्या पित्याला अशा दुर्धरचिंतेंत टाकून आपल्या नादीपणानें बाळासाहेब जात आहे म्हणून मलाहि मनांतून वाईट वाटत होतें. वरवर जरी बाळासाहेब आनंदी दिसत होता, तरी त्यालाहि अंतःकरणात खेद वाटत होताच. बापुसाहेबांनीं आजप-र्यंत बाळासाहेबाला कधींच दूर केला नसल्यामुळें आतां तो दोन अडीच वर्षें तरी आपणाला भेटणार नाहीं, याविचारानें त्याना कां दुःख होणार नाहीं ? बाळासाहेबाची आई वारल्यापासून बापुसाहेबांचें आपल्या मातारहित पुत्रावर विलक्षणच प्रेम जडलें होतें. त्याच्या सुखासाठीं त्यांनीं आपल्या कोणत्याच सुखाकडे पाहिलें नव्हतें. ज्या पुत्राला यत्किंचित खोकला झाला कीं, जरासे डोकें दुखलें तरी त्यांच्या जीवाची कोण धांदल उडून जात असे; ज्याला घरीं यावयाला क्षणभर उशीर झाला कीं ते घरांतून बाहेर व बाहेरून घरात अस्वस्थांतःकरणानें शंभर खेपा घालीत असत, तो त्यांच्या प्राणाचाहि प्राण असा सर्वगुणसंपन्न एकुलता एक पुत्र दूर देशीं जाणार असून, त्यांची व त्याची कित्येक दिवस नव्हे, वर्षें दृष्टी भेटहि होणार नाहीं, या पुत्र-विरहाच्या दारुण कल्पनेनें त्याना किती कष्ट होत असतील तें कसें सांगावें ?

अखेरीस हं-हं म्हणतां मध्यंतरींचे दिवस निघून गेले व बाळासाहेबाला हिंदु-स्थान सोडून विलायतेस जाण्याचा दिवस उगवला ! बाळासाहेबाशीं पुष्कळ बोलावयास मिळावें म्हणून मी आदल्या दिवसापासूनच त्याच्या येथें रहावयास आलों होतो. रात्रीं बराच वेळ बापुसाहेब, काकासाहेब वगैरे आम्ही बोलत बसलों होतों. त्यानंतर ती सर्व रात्र आम्ही दोघां मित्रांनीं बोलून घालविली. एकालाहि निद्रा येईना ! " मी

येथून गेल्यावर बाबांना फार क्लेश होतील, त्यांच्या भेटीला तूं रोज जरी नाहीं तरी एक दोन दिवसाआड येत जा, व त्यांच्या मनाला धीर देत जा." असें सद्गदित वाणीनें बाळासाहेब म्हणाला. "काय करूं चिंतामणि! त्यांच्या त्या उदासीन चेहऱ्याकडे पाहिलें कीं कसेंसेंच वाटतें! इतर सर्वांनाच मुलें असतात, परंतु बाबांच्या प्रेमाला सीमाच नाहीं. मी गेल्यावर ते स्वतः विनाकारण त्रास करून घेतील, असें वाटून माझ्या अंतःकरणांत कालवाकालव होते!" एक दीर्घ निःश्वास सोडून बाळासाहेब म्हणाला. मी माझ्याकडून त्याचें समाधान केलें; बोलण्यात रात्र केव्हां सरली याचेंहि आम्हाला भान राहिले नाहीं. सकाळपासून एकसारखी गडबड सुरू होती. बापुसाहेबांना व सगुणेला कोणाच्या नकळत अश्रुविसर्जन करतांना मी दोन तीन वेळां तरी पाहिलें असेल! बाळासाहेबाचीहि तीच स्थिति होती, आणि माझीहि जवळजवळ तशीच स्थिति झाली होती. अखेरचा निरोप घेतांना सर्वांची जी स्थिति झाली ती वर्णन करणें अशक्य आहे! काहीं तरी आकस्मिक कारण घडून बाळासाहेबांचे जाणें त्यावेळीं रहीत झालें असतें तर किती उत्तम झालें असतें! पुढें येणारा प्रसंग टळला असता. परंतु जी गोष्ट होणार ती झाल्याखेरीज कधींच रहात नाहीं. आपण मानव ईश्वरी सत्तेपुढें काय करणार!

बाळासाहेबानें जेव्हां आपल्या प्रेमळ पित्याचा निरोप घेतला, तेव्हां दोघांच्याहि तोंडावाटे शब्दोच्चार होईना, नेत्रातून अविरत अश्रुधारा वहात होत्या, पलीकडे खालीं मान घालून येणाऱ्या अश्रूंचा जबर प्रवाह कष्टानें दाबण्याचा प्रयत्न करीत सगुणा बसली होती. बाळासाहेबाला फक्त दृढालिंगन देऊनच बापुसाहेबांनीं निरोप दिलें! नंतर बाळासाहेब सगुणेचा निरोप घ्यावयास गेला, तो जवळ येतांच इतका वेळ दाबून ठेवलेला हुंदका एकदम बाहेर पडून तीहि काहीं एक न बोलतां फक्त रडूंच लागली. "सगुणे, मी लवकर येईन बाबांना संभाळ." इतके कसेबसे तरी शब्द उच्चारून त्यांच्याकडे न पहातां बाळासाहेब एकदम बाहेर पडला! काकासाहेब आमच्याबरोबर बंदरावर येणार होते; ते बाळासाहेबाला बाहेर पडण्याची एकसारखी घाई करीत होते, बाळासाहेब बाहेर पडतांच सगुणा दोन्ही हातानें तोंड झांकून रडूं लागली व बापुसाहेबहि दुःखावेग अनावर झाल्यामुळें एका खुर्चीवर नेत्र झांकून निस्तब्धपणें पडले होते. मला गर्दी असल्यामुळें जड पावलांनीं मीहि बाळासाहेबाच्या मागें गेलों. आम्ही तिघे मुकाट्यानेंच बंदरावर गेलो, आमची इतर मित्रमंडळीहि बाळासाहेबाला पोंचवावयास बंदरावर हजर होती.

आतां बाळासाहेबाचा शेवटचा निरोप घेण्याची शेवटची पाळी माझी होती! बाळासाहेबाला अमुक अमुक सांगावयाचें म्हणून मी मनांत पुष्कळ बेत केला होता; पण वेळ येतांच दोघांचीं तोंडें बंद झालीं! आम्ही एकमेकांला प्रेमालिंगन दिलें. माझ्या खांद्यावर डोकें टेकून बाळासाहेब किती तरी वेळ अश्रुविमोचन करीत होता; त्याला काय सांगावें? कोणत्या शब्दांनीं त्याचें समाधान करावें? परदेशांत परक्या

माणसांबरोबर वागतांना जपून वागत जा म्हणून कसा उपदेश करावा? हें मला मुळींच कळेना! आपल्या मित्राची व आपली पुनः कधीं भेट होईल? आज त्याचें आपल्यावर एवढें प्रेम आहे; परंतु परत येईपर्यंत असेंच राहील काय? तसेंच त्याचा स्वभाव असा उतावीळ व कांहींसा रागीट असल्यामुळे त्याच्यावर कांहीं अकल्पित संकट तर येणार नाहींना? अशा नानाप्रकाच्या असंख्य कल्पना माझ्या मनांत उद्भवूं लागल्या! "चिंतामणि! तूं बाबाविषयीं मला वारंवार कळवित जा." मोठ्या कष्टानें बाळासाहेब म्हणाला, "तुम्हाला सर्वांना सोडून जातो म्हणून आतां मला फार वाईट वाटत आहे, चिंतामणि, सर्वांत बाबांची आठवण झाली कीं मला भडभडून येतें! माझ्यावर त्यांनीं माझ्या लहानपणापासून एवढें प्रेम केलें नसतें तर बरें झालें असतें, म्हणजे त्यांना माझ्यामुळें एवढें दुःख झालें नसते," तो उद्वेगानें श्वासोश्वास सोडूं लागला. आपल्या पित्याच्या वियोगाचें दुःख त्याला असह्य होत होतें. आमचा सर्वांचा कसा तरी निरोप घेऊन तो स्टीमरवर चढला. लाबवर स्टीमर दिसेपर्यंत डेकवर उभा राहून आपला रुमाल हालवित होता. व क्षणोक्षणीं डोळ्यालाहि लावित होता. आम्हींहि धक्क्यावर उभें राहून आमचें रुमाल हलवित होता. ती स्टीमर पाण्यांत हेलकावे खात असलेली पाहून माझें अंतःकरणहि हेलकावें खाऊं लागले! स्टीमर लहान होत होत अगदीं लहानशीं अंधुक काळसर आकृति दिसूं लागली व नंतर अदृश्य झाली! त्या अफाट दर्याच्या आड थोड्या वर्षांच्या सहवासानें पण जन्मजन्मांतरीच्या ऋणानुबंधाप्रमाणें दृढ झालेल्या मैत्रीनें माझा प्रिय मित्र दृष्टीच्या पलीकडे गेला! मी त्याच जागेवर रात्रंदिवस जरी तसाच उभा राहिलो तरी त्याची लवकर भेट होणें शक्य नव्हतें, समुद्राकडे पाहून निराशपूर्ण दीर्घ श्वास सोडून मी जड पावलानें घरीं जाण्याला निघालो. या निष्ठूर सागरानें आजपर्यंत किती तरी प्रियजनाना विरहदुःखात लोटून दिले असतील! व कित्येकाचे समागम घडवून आणले असतील! मी कसा तरी घरी येऊन पोंचलों व इतका वेळ मित्रवियोगाचें दुःख मोठ्या कष्टाने आवरून धरलें होतें, त्याचा बाध फोडून बाहेर येण्याची मोकळीक दिली! मला ज़र त्याच्यासाठीं एवढें वाईट वाटत आहे तर त्याच्या पित्याला, सगुणेला किती वाईट वाटत असेल याची कल्पना करणें महादुर्घट काम आहे.

---

## स्मृति एकतिसावी.

# मी पुनः बँकेंत राहिलों!



बाळासाहेबाच्या प्रयाणानंतर दुसऱ्याच दिवशीं शेटसाहेबांनीं मला बोलावून विचारलें, " चितामणि, तुझी पुढें शिकण्याची इच्छा असली तर ठीकच आहे, नाहीं तर मी एक विचार केला आहे, तो तुला जर पसंत असला तर तसें स्पष्ट

सांग." मी 'काय,' म्हणून विचारतां ते पुढें म्हणाले, "माझा विचार असा आहे कीं, तूं आमच्या बँकेंत रहावें. आमची बँक सध्यां चांगल्या स्थितींत आहे व पुढें तिची अशीच स्थिति रहाण्याला आम्हाला उद्योगी व विश्वासु माणसाची जरूर आहे. आमच्या बँकेंत इतर दुसरीं माणसें आहेत, परंतु खऱ्या विश्वासानें काम करणारें असें क्वचित एखादें असेल. आजपर्यंतच्या माझ्या अनुभवावरून कोणतेंहि काम तुझ्याकडे सोंपाविलें असतां तें तूं उत्तमप्रकारें करूं शकशील अशी माझी खात्री आहे. इतर धंद्या-पेक्षां बँकेचा धंदा कांहीं वाईट नाहीं. तेव्हां तुझी मर्जी असली तर मी सांगतों तें काम तूं करीत जा. मोहन अद्याप लहान असून त्याचें शिक्षण व्हायचें आहे. त्यालाहि हा धंदा पसंत पडल्यास त्यानें यांत पडावें असें माझ्या मनांत आहे. बाकी मी तुझ्यावर अगर त्याच्यावर जबरदस्ती करणार नाहीं. पहा, विचार करून पहा, तुला ठीक वाटल्यास हो म्हण, नाहीं तर नाहीं सांगितलेंस तरी हरकत नाहीं." त्यावर जरा थाबून मी म्हणालों,

"आपण जें कराल तें माझ्या हितार्थच असणार, असा माझा पूर्ण भरंवसा आहे. मी पुढें काय करावें हे अद्याप माझें कांहींच नक्की नसल्यामुळें आपण म्हणतां तें मला कबूल आहे, परंतु मी आपल्याला कांहीं दिवसामागे माझ्या एका मित्राविषयीं सांगितले होते, तर तो माझा मित्रहि एखादें जोखमीचें काम विश्वासानें करणाऱ्यापैकीं आहे. तेव्हां त्याला जर आप-"

शेटसाहेब मध्येंच म्हणाले. "चिंतामणि, तुझ्या मित्रासंबंधाचें तुझें सांगणें माझ्या स्मरणातून गेलें नाहीं, त्याचीहि मी व्यवस्था केली आहे, परंतु मी जी ही काम-गिरी तुझ्याकडे सोंपविणार आहे, ती तुलाच केली पाहिजे तुझ्याचसाठीं ही जागा मी राखून ठेविली आहे." त्यानंतर मला विशेष बोलतां येईना. मी त्याच्या म्हणण्याला संमति दिली. प्रथम मला बँकेचा धंदा पसंत पडला नाहीं, परंतु असें रिकामें बसून राहण्यापेक्षां कांहीं तरी उद्योगांत असणें बरें असें वाटून मी त्यावेळीं तरी त्या गोष्टीला कबुल झालों. शिवाय बाळासाहेबाचें वियोगदुःख तेवढ्यावेळपर्यंत तरी हलकें वाटेल या विचारानेंहि मी शेटसाहेबांना लागलाच माझा होकार दिला. नोकरी लागल्यानंतर स्वतंत्र बिऱ्हाड करून हवापालट करण्याला भाऊंना येथें आणावें हाहि एक माझा अंतस्थ हेतु होता. व तो माझा बेत मी शेटसाहेबांना कळविला; पाहिल्यानें मला दूर करण्याचें त्यांच्या जिवावर आलें होतें, परंतु भाऊंच्यासंबंधी गोष्ट निघतांच त्यांना ती गोष्ट कबूल करावी लागली. ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवसापासूनच मी बँकेंत जाऊं लागलों. कांहीं वर्षांमागें मी त्याच बँकेंत अगदीं हलक्या दर्जाचा कार-कून म्हणून जात असे व माझ्याकडे कोणाचेंहि विशेषसें लक्ष नसें, तोच आज मी बऱ्याच वरच्या दर्जाचा अमलदार (असिस्टंट मॅनेजर) म्हणून बँकेंत जाऊं लागलो. व बऱ्याच महत्त्वाचे काम माझ्याकडे असल्यामुळे मलाहि बरेंच महत्व प्राप्त झालें! हा सर्व प्रभाव विद्येचा होता! नोकरीवर हजर होतांच ती सर्व हकीकत मी भाऊंना कळ-

बिली व आपण सर्व मंडळीस घेऊन लवकर निघून यावें असेंहि लिहिलें होतें. शेटसाहेबांपासून जवळच फार आमच्याकरितां मी एक भाड्यानें जागा ठेविली. मी दुसरीकडे रहावयास जाणार म्हणून मोहनलालला फार वाईट वाटले, पण मी असा जन्मभर त्यांच्याच येथें रहाणें शक्य नसल्यामुळें, व तो आतां समजूतदार झाला असल्यामुळें त्याला कसेंतरी आपलें समाधान करून घ्यावें लागलें व त्यानें मला जाण्याविषयीं फार अडथळा घेतला नाहीं. त्याच्या आईला व शेटसाहेबांनाहि जरा वाईट वाटलेंच, कारण त्यांनीं मला खरोखरीच आपल्या पोटच्या मुलाप्रमाणें वागविलें होतें. ज्यांनीं आपत्कालीं मला हाताशीं धरून माझ्यावर पुत्रवत प्रेम करून मला आज या योग्यतेस आणून सोडलें, त्यांचें जेवढे उपकार मानावे तेवढे कमीच आहेत.

बिऱ्हाडाची व्यवस्था लावल्यावर मी गांवीं जाणार होतो, परंतु त्यापूर्वी भाऊची प्रकृति बिघडली असल्यामुळें मला घरून खबर आली व मी शेटसाहेबांची आज्ञा घेऊन तावडतोब घरीं निघून गेलों. भाऊंची प्रकृति बरीच अस्वस्थ झाली होती. कांहीं दिवस राहून त्यांना जरा आराम वाटतांच आम्ही सर्व मंडळी मुंबईस आलों. मी भिमालाहि आमच्याबरोबर मुंबईस आणावयास विसरलों नाहीं. माझ्या नवीन बिऱ्हाडांत आल्यामुळें तिला अत्यानंद झाला. परंतु मी लग्न करून घराला शोभा आणावी अशी तिची व सर्वांचीच इच्छा होती. आम्ही मुंबईस आल्यावर एका मोठ्या हुशार डॉक्टरचें औषध भाऊंना सुरू केलें. हवापालटानें, चांगल्या डॉक्टरच्या औषधानें व आम्ही दोघे एकत्र राहूं लागल्यामुळें भाऊंना हलकेहलके गुण पडूं लागला. शंकररावाकडून आणि त्याच्या वडिलांकडूनहि मला लग्नाकरितां आग्रहाचें निमंत्रण आलें होतें, परंतु भाऊंच्या दुखण्यामुळें मला त्या शुभप्रसंगीं जातां आलें नाहीं. म्हणून तसें मी त्यांना कळविलें. शंकररावचें लग्न झाल्यानंतर पुढें थोड्याच दिवसांनीं शंकरराव व बाबूराव मुंबईस आले. शेटसाहेबांच्या सांगण्यावरूनच मी बाबूरावला बोलाविलें होतें शेटसाहेबांनीं कबूल केल्याप्रमाणें त्याला बँकेंत भरपूर पगाराची जागा दिली. आतां आम्ही दोघेहि एका गांवांत व एकाच जागीं नोकर असल्यामुळे आमच्या नित्य भेटी होऊं लागल्या व आम्हाला त्यापासून आनंदच वाटूं लागला. मुंबईस आल्यावर थोड्याच दिवसांनीं बाबूरावनें आमच्याजवळच बिऱ्हाडाला जागा घेतली, नंतर लवकरच त्यानें आपल्या आईला, बहिणीला व भावाला तेथें आणलें. शांताला शाळेंत पाठविण्याविषयीं मी बाबूरावला पुनः सांगितलें व त्याच्या आईच्याहि मनांत ती गोष्ट तिच्या किती फायद्याची आहे हें पटवून दिलें. तसेंच खेडेगांवांपेक्षां मुंबईसारख्या ठिकाणीं तिच्या येवढ्या मुलीनें शाळेंत जाण्यास हरकत नाहीं; कारण मुंबईंत तिच्यापेक्षां मोठाल्या अविवाहित मुली असूनहि शाळेंत जातात, हें प्रत्यक्ष पाहिल्यावरून शेवटीं त्यांनी ती गोष्ट कबूल केली व शांताला शाळेंत दाखल करण्यांत आलें. अद्यापिहि ती माझ्याशीं पूर्वीप्रमाणें मोकळेपणानें बोलत नसे. परंतु पूर्वीसारखी माझ्या दृष्टीस न पडण्याचा प्रयत्नहि करीत नसे.

बाळासाहेबला विलायतेस जाऊन दीडदोन महिने होत आले होते. तेथें सुखरूप पोंचल्याबद्दल त्याच्याकडून तार आली होती. तो गेल्यावर दोनतीन दिवसाआड मी बापुसाहेबाच्या समाचाराला जात असें. परंतु मध्यंतरीं भाऊंच्या नादुरुस्त प्रकृतिमुळें मला कांहीं दिवस जातां आलें नाहीं. भाऊंना जरा आराम पडतांच मी त्यांच्या येथें गेलों. काकासाहेब अद्यापही तेथेंच होतें. बाळासाहेब गेल्यानंतर दीडदोन महिन्यांतच बापुसाहेबांत फारच फरक पडला होता. पुत्रविरहाचें दुःख त्यांना किती असह्य होत होतें हें त्यांच्या शरिरावर झालेल्या परिणामावरून दिसत होतें. क्षणभर देखील त्यांना आपल्या प्रियपुत्राचें विस्मरण होत नव्हतें. खालपासून वरपर्यंत जेवढ्या म्हणून खोल्या होत्या तेवढ्या खोल्यामधून बाळासाहेबाचा एक तरी फोटो टांगलेला दृष्टीस पडत होता. कारण ज्या खोलींत आपण प्रवेश करूं तेथें बाळासाहेबाचें सस्मित मुख आपल्या दृष्टीस पडावें असें बापुसाहेबांना वाटत होतें. बाळासाहेबाच्या लहानपणच्या एकएक गोष्टींचें स्मरण होऊन त्या प्रेमळपित्याचें हृदय वियोगदुःखानें भरून येऊन डोळ्यात अश्रु उभे रहात असत. मी कितीहि सांगितलें तरी त्याचें समाधान होत नसें. " माझा बाळासाहेब पुनः कधीं मला भेटेल कोण जाणे ? माझी आणि त्याची भेट होईल कां नाहीं ? तो येईपर्यंत मी जगेन याचीच मला खात्री वाटत नाहीं. ईश्वर त्याला सुखी ठेवो." असें म्हणून ते निराशेनें दीर्घ निःश्वास सोडीत असत. आजपर्यंत पुष्कळ युरोपांत गेले आहेत व आपला विद्याभ्यास संपवून पुनः परत आलेले आहेत. बाळासाहेब कांहीं प्रथमच गेला नव्हता, परंतु आपल्या पुत्राची फिरून भेट होणार नाहीं अशी बापुसाहेबांची समजूत कां झाली कळत नाहीं. त्यांचे निराशपूर्ण उद्गार ऐकून मलाहि अत्यंत खेद वाटत असें. त्यांचें कोणत्या शब्दानें समाधान करावें हें मला समजत नसे.

बाळासाहेबानें लवकर युरोपांत जावें म्हणून काकासाहेब त्याला फारच आग्रह करीत. युरोपच्या एकंदर वर्णनाच्या मोहास्त्रानें त्यांनीं बाळासाहेबाला अगदीं भुरळ घातली होती. प्रथमपासून त्याला युरोपांत जावयाचें होतेंच त्यांत काकासाहेबच्या सहवासानें इंग्लंन्डांत जाण्याची त्याची इच्छा अधिकच प्रबल झाली होती. होईल तितक्या लवकर हिंदुस्थान सोडून तूं युरोपांत जा असा काकासाहेब त्याला एकसारखा उपदेश करीत असत. बापुसाहेबासारखीं वृद्ध माणसे असाच विरोध करीत राहणार ! त्यासाठीं आपल्या मुख्य कर्तव्याला विसरणें चांगलें नव्हे, तुझ्या अंतःकरणांत देशहिताची खरी कळकळ असली, तर तुला प्रथम युरोपांतच गेलें पाहिजे असें म्हणून जाण्याबद्दल ते त्याला विशेषच प्रोत्साहन देत असत. बाळासाहेबानें इंग्लंडला जाऊन अधिक विद्या शिकून आपल्या मातृभूमीची सेवा करावी व आपलें नांव सर्वतोमुखीं करावें असें मला वाटत होतें. परतु आपल्या पित्याला अशारीतीनें विरहदुःखाच्या सागरांत लोटून जावें असें मला वाटत नव्हतें. शिवाय बाळासाहेबाचा स्वभाव कसा होता हें त्याच्या पांचचार वर्षांच्या सहवासानें मला माहीत झालें

होतें. तेव्हां तो आपल्या निष्कपटी पण तापट मनोवृत्तिवरून कधीं तरी आपल्यावर भलतांच प्रसंग ओढून न घेवो, असे त्याच्या पित्याप्रमाणें मलाहि वाटत होते. "चिंतामणि, माझा बाळासाहेब किती निष्कपटी व भोळा आहे याचा अनुभव तुम्हाला आहेच, त्याचमुळें त्याच्याविषयीं मला फार काळजी वाटते." बापुसाहेब उद्वेगानें म्हणाले. "त्याला जगाचा अनुभव फार थोडा आहे, आपल्याप्रमाणेंच सर्वजण निष्कपटी व निर्मळमनाचे आहेत असें त्याला वाटतें. तसाच तो रागीटहि आहे त्याला राग यायला वेळ लागत नाहीं व जायलाही लागत नाहीं. कोणावर फार कसे रागवावें हें त्याला मुळींच माहीत नाहीं. तसेंच स्वतःबद्दल तो कधींच काळजी घेत नाहीं, त्याचें तेथें कसें होईल ? त्याच्या कपड्यालत्त्याची, खाण्यापिण्याची कोण काळजी घेईल ? माझ्या बाळासाहेबाला त्याची आई वारल्यानंतर मी क्षणभरहि दूर केला नाहीं, आतां इतके दिवस त्याच्याशिवाय मी कसे काढूं ? युरोपमध्यें जाण्याचा त्यानें एवढा का नाद घेतला कोण जाणे ? जेवढे शिक्षण त्यानें घेतलें होतें तें कांहीं कमी नव्हतें, आणि तो मुळींच जरी शिकला नसता, तरी त्याला नोकरी धंदा करण्याची जरूर नव्हती. त्याच्या मुलाबाळापर्यंतहि कोणत्याच गोष्टींची ददात पडण्यासारखी आमची स्थिति नाहीं. तो अशिक्षित जरी असता तरी मला इतकाच प्रिय असता." असें म्हणून बापुसाहेब स्तब्ध रहात. बापुसाहेबाना सुख व्हावें म्हणून सगुणाहि आपल्याकडून पुष्कळ यत्न करीत असे. स्वतःच्या अंतःकरणांतलें दुःख बाहेर दिसूं न देतां ती त्याना सुख होण्यासाठीं एकसारखी झटत असे. परंतु तहानेल्या चातकाला मेघवृष्टीशिवाय कधींहि तृप्ती होणे शक्य नव्हते ! बाळासाहेब गेल्यापासून सगुणेंतहि हळुहळु फरक पडत होता. तिच्या पूर्वीच्या प्रफुल्लित मुखावर टवटवी कधींच दिसली नाहीं. ती त्याच्यासंबंधानें फारशी बोलत नसे, तसेंच आपल्याला दुःख होत आहे हें कोणाला कळूं नये म्हणून काळजीपूर्वक यत्न करीत असे. तिच्या चेहऱ्यावर मला कधींच स्मित दिसलें नाहीं. बाळासाहेब गेल्यानंतर त्याच्या बंगल्यांत मलासुद्धां बिलकूल बरें वाटत नसे. जेथें पूर्वी आनंद व प्रेम नांदत होतें, तेथें हल्लीं औदासीन्य व गंभीरता पसरून राहिली होती. बाहेरची बाग पूर्वी आपल्या टवटवीतपणानें माझें स्वागत करीत असे, परंतु तीच आतां आपल्या धन्याच्या विरहानें निस्तेज दिसूं लागली होती. तिची कोणी काळजी घेत नव्हतें असें नाहीं, परंतु मला आपलें तसें वाटत होतें. कधीं कधीं मी रस्त्यावर असतांच बाळासाहेबाचा आनंदी चेहरा त्याच्या माडीवरील खिडकींतून हास्यपूर्वक माझें स्वागत करतांना दिसत असे, ज्यावेळीं मी त्याच्या खिडकीकडे समोर रस्त्यावर येई, त्यावेळीं बाळासाहेब दिसावा म्हणून मी त्याच्या खिडकीकडे आशाळभूत नजरेनें पहात असे, परंतु आता त्या खिडक्या बंद होत्या !

बाळासाहेब गेल्यानंतरहि काकासाहेबांची स्वारी अद्याप येथेंच काय करीत आहे, याचा मला हळुहळु खुलासा होऊं लागला. तसेंच बाळासाहेबाला लवकर हिंदु-

होते. तेव्हां तो आपल्या निष्कपटी पण तापट मनोवृत्तिवरून कधीं तरी आपल्यावर भलतांच प्रसंग ओढून न घेवो, असे त्याच्या पित्याप्रमाणें मलाहि वाटत होते. "चिंतामणि, माझा बाळासाहेब किती निष्कपटी व भोळा आहे याचा अनुभव तुम्हाला आहेच, त्याचमुळें त्याच्याविषयीं मला फार काळजी वाटते." बापुसाहेब उद्वेगाने म्हणाले. "त्याला जगाचा अनुभव फार थोडा आहे, आपल्या-प्रमाणेंच सर्वजण निष्कपटी व निर्मळमनाचे आहेत असें त्याला वाटतें. तसाच तो रागीटहि आहे त्याला राग यायला वेळ लागत नाहीं व जायलाही लागत नाही. कोणावर फार कसे रागवावे हें त्याला मुळींच माहीत नाहीं. तसेंच स्वतःबद्दल तो कधींच काळजी घेत नाहीं, त्याचें तेथे कसें होईल ? त्याच्या कपड्यालत्त्याची, खाण्यापिण्याची कोण काळजी घेईल ? माझ्या बाळासाहेबाला त्याची आई वारल्यानंतर मी क्षणभरहि दूर केला नाही, आता इतके दिवस त्याच्याशिवाय मी कसे काढूं ? युरोपमध्यें जाण्याचा त्यानें एवढा का नाद घेतला कोण जाणे ? जेवढें शिक्षण त्यानें घेतलें होतें तें काहीं कमी नव्हतें, आणि तो मुळींच जरी शिकला नसता, तरी त्याला नोकरी धंदा करण्याची जरूर नव्हती. त्याच्या मुलाबाळापर्यंतहि कोणत्याच गोष्टींची ददात पडण्यासारखी आमची स्थिति नाहीं. तो अशिक्षित जरी असता तरी मला इतकाच प्रिय असता." असे म्हणून बापुसाहेब स्तब्ध रहात. बापुसाहेबाना सुख व्हावे म्हणून सगुणाहि आपल्याकडून पुष्कळ यत्न करीत असे. स्वतःच्या अंतःकरणातलें दुःख बाहेर दिसूं न देता ती त्याना सुख होण्यासाठी एकसारखी झटत असे. परंतु तहानेल्या चातकाला मेघवृष्टी-शिवाय कधींहि तृप्ती होणे शक्य नव्हते ! बाळासाहेब गेल्यापासून सगुणेतहि हळुहळु फरक पडत होता. तिच्या पूर्वीच्या प्रफुल्लित मुखावर टवटवी कधींच दिसली नाहीं. ती त्याच्यासंबंधाने फारशी बोलत नसे, तसेंच आपल्याला दुःख होत आहे हें कोणाला कळूं नये म्हणून काळजीपूर्वक यत्न करीत असे. तिच्या चेहऱ्यावर मला कधींच स्मित दिसलें नाहीं. बाळासाहेब गेल्यानंतर त्याच्या बंगल्यांत मलासुद्धा बिलकूल बरें वाटत नसे. जेथें पूर्वी आनंद व प्रेम नांदत होतें, तेथे हल्लीं औदासीन्य व गंभीरता पसरून राहिली होती. बाहेरची बाग पूर्वी आपल्या टवटवीतपणानें माझें स्वागत करीत असे, परंतु तीच आता आपल्या धन्याच्या विरहानें निस्तेज दिसूं लागली होती. तिची कोणी काळजी घेत नव्हतें असे नाहीं, परंतु मला आपलें तसें वाटत होतें. कधीं कधीं मी रस्त्यावर असताच बाळासाहेबाचा आनंदी चेहरा त्याच्या माडीवरील खिडकीतून हास्यपूर्वक माझें स्वागत करताना दिसत असे, ज्यावेळीं मी त्याच्या खिडकीकडे समोर रस्त्यावर येई, त्यावेळीं बाळासाहेब दिसावा म्हणून मी त्याच्या खिडकीकडे आशाळ-भूत नजरेने पहात असें, परंतु आता त्या खिडक्या बंद होत्या !

बाळासाहेब गेल्यानंतरहि काकासाहेबाची स्वारी अद्याप येथेंच काय करीत आहे. याचा मला हळुहळु खुलासा होऊं लागला. तसेंच बाळासाहेबाला लवकर हिंदु-

स्थानांतून घालविण्याची ते एवढी जिवापाड कां खटपट करीत होते, त्याचेंहि कारण माझ्या लक्षांत येऊन चुकलें. काकासाहेब बरींच वर्षे युरोपांत राहिल्यामुळें, त्यांना हिंदुस्थान देश अगदीं अज्ञानी, रानवट, मूर्ख व गुलामगिरीच्या स्थितीला योग्य आहे असें वाटत होतें. आणि त्यामुळें ते हिंदुस्थानची व त्यांतल्या सर्व लोकांची नेहमी निंदाच करीत असत. हिंदुस्थानांतील झाडून सारे लोक रानटी असल्यामुळें कोणत्याहि हिंदुस्त्रीशीं विवाह करण्याची काकासाहेबाची इच्छा नव्हती, व त्यांच्या-सारख्या 'काळ्या आदमीला' कोणतीहि पांढरी तरुणी पत्करण्याला तयार झाली नव्ह-त्यामुळें ते अद्यापपर्यंत अविवाहितच होते. सर्व हिंदु स्त्रियांचा महामूर्ख, गावढळ, शुद्ध पशू वगैरे वगैरे शेलक्या शब्दांनीं ते गौरव करीत असत. युरोपांत असतां एका संस्थानिकाची व त्यांची गांठ पडून संस्थानिकानें आपल्या चिरंजीवाला शिक्षक म्हणून काकासाहेबासारख्या हुशार व विद्वान गृहस्थास आपल्या पदरीं ठेविलें होतें, व ते तेव्हांपासून त्यांच्याकडे होते. त्यांच्या चिरंजीवाबरोबर ते पांच सहा वर्षे हिंदुस्थानांत बरींच प्रेक्षणीय स्थळें पहाण्यास हिंडले होते. परंतु पुढें आपल्या चिरंजीवाला कोणतें शहाणपण प्राप्त होणार आहे, याचें स्वप्न पडूनच कीं काय संस्थानिकांनीं त्यांना कायमची रजा दिली व ते त्यानंतर हैद्राबादेस जाऊन तेथून बापुसाहेबाबरोबर बंधु या हक्काच्या नात्यानें मुंबईस येऊन बरेच दिवस राहिले होते.

कोणत्याहि हिंदुस्त्रीशीं विवाह न करण्याचा त्यांचा निश्चय अलीकडे ढांसळला होता. त्यांना आपल्या दोन हाताचे चार हात करण्याची अनिवार उत्कंठा लागून राहिली होती, परंतु त्यांच्या कार्यांत बाळासाहेबाकडून व्यत्यय येण्याचा संभव होता, म्हणून त्यांची ब्याद मोठ्या कुशलपणे त्यांनीं बऱ्याच दूर घालविण्याचा प्रयत्न केला. बाळासाहेब गेला; तरी त्यांची आशा सफळ होण्याचा बिलकूल रंग दिसेना, त्यांनीं आपल्याकडून पुष्कळ खटपट लटपट करून पाहिली परंतु सर्व व्यर्थ! आजपर्यंत त्यांना आपल्या अगाध ज्ञानाची व आटोकाट बुद्धिसामर्थ्याची फार घमेंड होती; आपणाला कशांतच अपयश येणार नाहीं; जें धारूं तें आपल्या हिकमतीनें पार पाडूं असें त्यांना वाटत होतें. आपल्या भपकेबाज पोषाखानें व चातुर्यानें कोणाहि हिंदु तरुणीला आपल्या पायाची दासी आपण सहज करूं शकूं असा त्यांचा समज होता. परंतु या बाबतींत त्यांचा समज साफ चुकला होता.

काकासाहेबासारख्या व्यक्तीला सगुणेसारखें रत्न लाभणें शक्य नव्हतें. तिला प्राप्त करून घेण्याचा त्यांचा सारा उद्योग व्यर्थ गेला होता, सगुणेचें लक्ष बाळासाहेबावर आहे, तेव्हां त्याच्यावरचें लक्ष काढून ती आपणाकडे कधींहि पहाणार नाहीं, हें ते पक्केपणीं जाणून होते. बाळासाहेब दूर गेल्यावर तिचें लक्ष आपल्याकडे जाण्याला फारसा अवधि लागणार नाहीं असें त्यांना वाटत होतें. बाळासाहेब गेल्यावर कितीहि लाळ घोटली व कितीहि प्रयत्न केला तरी आपले मनोरथ पूर्ण होणार नाहींत अशी त्यांच्या मनाची खात्री होऊं लागली. सगुणेच्या अटळ

मनापुढें यांच्या कपटी सुरुंगाची मात्रा न चालून त्याचा चंचूप्रवेशहि होऊं शकला नाहीं. दिवसेंदिवस सगुणा त्यांचा जास्तच तिरस्कार करूं लागली, होताहोईतो ती त्यांच्या दृष्टीस पडत नसे; अखेरीस त्यांच्या कोणत्याच प्रयत्नाला यश न येऊन पूर्ण निराशा झाल्यामुळें वैतागून काकासाहेबांनीं आपलें मुंबईंतलें वास्तव्य पूरें करून पुनः हैद्राबादेस प्रयाण केले ! त्यानंतर त्यांच्यासंबंधी काहींच वर्तमान समजले नाहीं व तें समजण्याची मला इच्छाहि नव्हती.

---

## स्मृति बत्तीसावी.

# भग्नहृदयी पिता.



आपल्या वकीलीचीं सर्व कामे सोडून भाऊ आता मुंबईस राहूं लागले होते. आम्हांला एकमेकांच्या सहवासांत आनंद वाटत होता. शंकरराव मला नेहमीं भेटत असेच व बाबूराव तर आता जवळच राहूं लागला होता. आम्ही तिघेजण एकत्र असलों कीं आमचा तो काल सुखाचा जात असे. मी एकटा असल्यावर बाळासाहेबांच्या स्मरणावाचून माझा एकहि क्षण जात नसे. बाळासाहेबाला भेटण्याची बाबूरावाची फार इच्छा होती, परंतु आता बाळासाहेब पुनः परत आल्याशिवाय ती तृप्त होणे शक्य नव्हतें. बापुसाहेबांची व बाबूरावाची मी एकदां भेट करून दिली होती. बापुसाहेबांसारख्या पित्यास विरहांत टाकून बाळासाहेब उगाच गेला असें बाबूरावाचें म्हणणे पडलें. बाबूरावाला लहापणापासून चित्रकलेचा फार नाद होता, पण मध्यंतरीं त्याला आपल्या आवडीचा विषय सोडून द्यावा लागला होता. मुंबईस आल्यापासून आपल्या कुटुंबाचें पोषण करूनहि त्याला आपली इच्छा पूर्ण करून घेण्याची संधी मिळत होती व तो आपला रिकामा वेळ आपल्या आवडीची कला शिकण्यात खर्च करूं लागला. त्यांत हळू हळू चांगलें यश येईल अशी त्याला खात्री वाटूं लागली, त्याच्या घरची स्थिति आता बरी होती. इतके दिवस त्याला साधन नव्हतें. पण आतां तो फोटोग्राफीचीहि थोडी माहिती घेऊं लागला होता. माझें बँकेत ठीक चाललें होते. आतां तरी मी लग्न करावें असें भाऊंनीं पुनः सुचविले, परंतु बाळासाहेब परत येईपर्यंत लग्न न करण्याचा मी निश्चय केला होता. बाळासाहेबांची तेथून खुशालीची व नानातऱ्हेच्या तेथल्या वर्णनाची लांबच लांब पत्रें येत असत.मला त्याचीं पत्रें वाचतांना कंटाळा येत नसे. मी तें पुनःपुनः दुसऱ्या आठवड्यापर्यंत वाचीत असें. त्याची आठवण झाली कीं अंतःकरण अगदीं भरून येई, व आपल्या या प्रियमित्राची प्रत्यक्ष भेट पुनः कधीं होईल असें मला एकसारखें वाटत होतें.

बाळासाहेबला जाऊन जवळजवळ दीड वर्ष होत आलें होतें, आता फक्त

आठ दहा महिन्यांतच तो परत येणार होता. हे दिवस जसे निघून गेले, तसेच उरलेले दिवस आतां निघून जातील व माझा मित्र लवकरच भेटेल. असा आनंददायी विचार मनात येऊन मला फार समाधान वाटत असे. शंकररावाने एल् एल्. बीच्या दुसऱ्या वर्षाची टर्म भरली होती. तो आता एका पुत्राचा पिता झाला होता.

एके दिवशी संध्याकाळच्या सुमारास मी व मोहनलाल असे दोघे शेटसाहेबाच्या बागेंत बोलत बसलो होतो. माझे तोंड सडकेकडे होते, दिवे लावण्याची वेळ झाली व तेथून उठण्याच्या तयारींतच मी होतो; इतक्यात सूंसूं करीत एक गोळी येऊन माझ्या डाव्या खाद्याजवळ दंडात शिरली व तिचा अवाज ऐकून मोहनलाल आश्चर्यचकित झाला ! हा प्रकार इतक्या अकस्मात् व अल्पावकाशात झाला कीं, हें काय हेंच कळले नाहीं. गोळी लागून वेताच्या खुर्चीवरून मी कोलमडून मागच्या मागें पडलो होतो. मोहनलालने ओरड करून नोकर लोक जमा केले. घरात असलेले शेटसाहेबहि धावत बाहेर आले. पुढे काय झालें तें मला कळलेच नाहीं मी आठ दिवस चैतन्यशून्य होतो. आठव्या दिवशीं पहाटेच्या सुमारास मी सावध झालो. मी कोठें आहे वगैरे काहींच आठवेना ! मी डोळें उघडून पाहिले तो भाऊ माझ्या उशाला आपल्या हातावर डोके टेकून बसलेले माझ्या दृष्टीस पडले. भाऊंना साद घालावी असे माझ्या मनात होतें व त्याप्रमाणें मी करावयास गेलो परंतु माझ्या तोंडातून शब्द इतक्या हळूं निघूं लागले कीं ते माझें मलाच ऐकूं येईनात ! मी बोलावयास सुद्धां किती असमर्थ आहे, याचे हळुंहळुं मला ज्ञान होऊं लागले. अशी माझी स्थिती कशाने झाली म्हणून मी मनात विचार करूं लागलो, तों पूर्वगोष्टींचें स्मरण मला होऊं लागले, मला गोळी लागून मी पडलो होतो.मी माझ्या जखमी हाताकडे पाहिले तर तो हात बांधून ठेवल्याचे मला दिसलें व तो मला उचलताहि येईना ! अशारीतीने मला गोळी घालणारा शत्रु कोण असावा याचा मला काही केल्या बोध होईना ! माझा जीव घेऊन आपल्या द्वेषाची शांती करून घेण्यासारखा मला कोणीहि शत्रु नव्हता अशी माझी पूर्ण खात्री होती. पुष्कळ वेळ डोक्याला श्रम दिले, पण माझा शत्रु हुडकून काढण्यात मला यश आले नाहीं. शेवटीं माझ्या मनात एक कल्पना आली, व तीच अखेरीस खरी असावी असें मला वाटूं लागलें. शेटसाहेबाना मारण्याकरिता ज्या व्यक्तीने ही युक्ति योजिली होती, तिचा प्रयत्न फुकट जाऊन चुकून माझ्यावर त्याने पिस्तुल झाडली असावी. एवढे बरें झाले की ईश्वरकृपेनें मी जिवंत राहून शेटसाहेबावरचा हा दुर्धर प्रसंग टळला ! तरी पण यापुढे शेटसाहेबांच्या जिवाला भीति आहे असें मला वाटूं लागले !

मी चळवळ करीत आहे, ही गोष्ट भाऊंच्या लक्षात येऊन ते आपल्या जागेवरून माझ्या जवळ आले. मी डोळें उघडून पहात आहे व कांहीं तरी बोलण्याचा प्रयत्न करीत आहे असें जाणून भाऊंनी आपले डोके खालीं केले. समोर असलेल्या दिव्याचा प्रकाश त्यांच्या तोंडावर पडून त्यांच्या चेहऱ्यांत किती विलक्षण फेर पडला

हें माझ्या दृष्टोत्पत्तीस आले ! काळजीनें आणि चिंतेनें त्यांचा चेहरा करपून गेला होता ! मला शुद्धीवर आलेला पाहून त्यांच्या मुखावर समाधान दिसत होते व त्यांच्या नेत्रांत अश्रू उभे राहिले होते. माझ्या तोंडाजवळ तोंड वांकवून ते गद्गद स्वरानें म्हणाले.

" चंदू, काय पाहिजे ? "

"पाणी." मी खोल स्वरांत उत्तर दिलें.जवळच असलेल्या एका तांब्यातलें थोडेसें पाणी त्यांनीं माझ्या तोंडांत घातलें. मी येथें किती वेळ पडून आहे ? शेटसाहेब कोठें आहेत वगैरे मला पुष्कळ विचारावयाचें होतें, पण माझ्यानें स्पष्ट उच्चारच करवेना ! अखेरीस तसाच मुकाट्यानें पहात पडून राहिलो.भाऊंनीं आपली खुर्ची माझ्याजवळ आणून तेहि मुकाट्यानें माझ्याकडे पहात बसले. "मला आता बरें वाटत आहे,तुम्ही निजा." म्हणून कसेंतरी मी भाऊंना सांगून पाहिलें, पण ते तेथून मुळींच उठले नाहींत. माझा उजवा हात आपल्या हातांत धरून ते कितीवेळ तरी माझ्याकडे निश्चलपणें पहात होते, हळुहळु उजाडलें व मी शुद्धीवर आल्याचें सर्वांना कळलें. शेटसाहेब, मोहनलाल व त्याची आई मला पहाण्याकरितां येऊन गेले. परंतु मला कोणी बोलूं दिलें नाहीं. मी शेटसाहेबाच्या बंगल्यांत माझ्या पूर्वींच्या खोलींतच निजलो होतो. बाई, भिमा वगैरेहि येऊन गेल्या, तसेंच बाबूरावहि आला त्या दिवसापासून मला हळुहळु गुण पडूं लागला. मला साफ आराम पडण्याला बराच कालावधी लागला. माझ्यावर पिस्तुल झाडणाराचा अद्याप मुळींच पत्ता लागला नव्हता. माझ्या दुखण्यांत भाऊ रात्रंदिवस माझ्याजवळ बसून होते. बाबूराव, शंकररावहि मदतीला येत असत, पण भाऊ सारी रात्र तेथून हालत नसत. त्याचा परिणाम त्यांच्या अधिक अशक्त असलेल्या प्रकृतीवर झाल्याखेरीज राहीला नाहीं. माझ्या दुखण्यापेक्षां त्यांच्या त्या अगदीं क्षीण झालेल्या प्रकृतीकडे पाहून मला कसेंसेंच वाटूं लागलें. माझ्यासाठीं त्यानीं स्वतःस जास्त परिश्रम करून आपल्या जीवाला अधिक त्रास करून घेतला होता. दिवसेंदिवस माझ्या भाऊंचें माझ्यावरील प्रेम मला प्रत्ययास येऊं लागलें होतें. बापुसाहेबासारख्या प्रेमसागराच्या लाटा त्यांच्या हृदयातून वर उसळ्या मारीत नसल्या, तरी त्यांच्या हृदयांत खोल प्रेमप्रवाह एकसारखा वहात होता.

या दोन अडीच महिन्यांत बाळासाहेबाकडील कांहींच वर्तमान कळलें नव्हतें. तो दर मेलला मला व बापुसाहेबाला पत्र पाठवित असे, मग त्यानें आतां इतके दिवस मूकवृत्ति कां धरली होती कळत नाहीं ! त्याच्या पत्राची मी चौकशी केली, पण पत्र न आल्याचें कळलें, त्यामुळें माझ्या अस्वस्थ मनाला अधिकच अस्वस्थता उत्पन्न झाली. जरा हिंडण्याफिरण्याची शक्ति येतांच बापुसाहेबाकडे जाण्याचा मी विचार केला. परंतु चांगलें बरें वाटेपर्यंत भाऊंनीं मला बाहेर पडूं दिलें नाहीं. बाबूराव व शंकररावला मी विचारतां आपल्याला बाळासाहेबाकडील वर्तमान माहित नाहीं, असेंच

कांहीं तरी सांगून त्यांनीं उडवाउडवी केली.त्यामुळें मला जास्तच चिंता वाटूं लागली. शेवटीं महाप्रयासानें भाऊंची परवानगी घेऊन मी बाळासाहेबाच्या बंगल्यावर जावयास निघालो. अद्याप पहिल्यासारखी मला शक्ति आली नसल्यामुळें शेट साहेबांची मोटार घेऊन मी त्यांच्या बंगल्यापर्यंत गेलों. आज नेहमीपेक्षांहि बंगल्यांत विशेष औदासिन्य दिसत होते. तेथले एकंदर वातावरणच असें कांहीं उद्वेगजनक दिसूं लागलें कीं निष्कारण माझें हृदय धडधडूं लागले. आंत जाण्यास माझें पाऊल माघार घेऊं लागलें. कांहींतरी अनिष्ट बातमी कळणार आहे, असें आपलें मला वाटूं लागले. मी कसातरी आंत गेलो, पुढचा दरवाजा ओलांडून आंत जाताच खिन्नपणे बसलेला रुद्राजी माझ्या दृष्टीस पडला. मी उतावीळपणाने त्याला विचारले, " रुद्राजी, बापुसाहेब कोठे आहेत?" माझ्याकडे सखेदाश्चर्यानें काही वेळ तो पहातच राहिला, मी पुनः त्याला तोच प्रश्न केला.

" चिंतामणराव, इतकें दिवस कुठ गेला होतात? मी तर तुम्हाला ओळखलेंच नाहीं!"

" रुद्राजी! मी इतकें दिवस आजारी होतो म्हणून येऊं शकलो नाहीं व म्हणूनच तूं मला ओळखूं शकला नाहीस. सर्व मंडळी खुशाल आहेत ना? बाळासाहेबाचें पत्र कधीं आले होते?"

" या, माझ्या मागून या." विशेष काहींएक न बोलता तो पुढेच चालूं लागला. माझ्या प्रश्नाचे उत्तर न देता त्याचें हें चमत्कारिक वर्तन पाहून मला जास्त जास्त घोटाळल्यासारखे वाटूं लागलें. मी निमूटपणें त्याच्यामागे माडीवर बापुसाहेबाच्या निजावयाच्या खोलीत गेलो. बापुसाहेब बहुतकरून नेहमीं दिवाणखान्यातच भेटावयाचे, ते आज त्याच्या निजावयाच्या खोलींत काय करीत असावेत हे मला कळेना.मी भीत भीत आत प्रवेश केला, सगुणा एका खुर्चीवर सचिंतपणे बसली होती, दोन तीन महिन्यांत ती फारच कृश झालेली दिसत होती. पूर्वीपेक्षां ती कितीतरी क्षीण दिसत होती! दाराकडे प्रथम तिची पाठच होती; परंतु माणसाची चाहूल लागल्यामुळें तिनें मागे वळून पाहिलें. तिच्या मुखाकडे पहाताच माझ्या छातीत धसका बसला! तिचें तेजस्वी नेत्र अगदीं निस्तेज दिसत होते; नेत्राभोंवती कृष्णवर्ण वलयें दिसत होती व ते बरेच खोल गेले होते. मुखावर तारुण्याच्याऐवजी अकाली प्रौढपणा आला होता. थोड्या दिवसापूर्वी मी तिची रूपवती स्त्रियांत गणना करीत होतो, ते लावण्य भस्म झाल्या असलेल्या तेजोहीन हिऱ्याप्रमाणें निस्तेज दिसत होतें. मला पहातांच तिनें आपली कृश अंगुली आपल्या फिकट ओठावर ठेवून मला न बोलण्याची खूण केली व आपल्या जागेवरून ती हलकेंच उठली. बापुसाहेब पलंगावर निजले होते; परंतु त्यांचा चेहरा माझ्या दृष्टीस पडला नाहीं. सगुणेनें मला पुनः बाहेर येण्याला हलक्या स्वरांत सांगितले व आम्ही दोघे दिवाणखान्यांत आलो. सगुणेला काय विचारावें हें

मला सुचेना. सगुणा एका कोचावर बसली होती व तिची शरीरयष्टी कर्दळीप्रमाणें थरथर कांपत होती. मीहि एका खुर्चीवर बसलों व अडखळत अडखळत तिला पुढील प्रश्न केला.

" बापुसाहेब आजारी आहेत कां? मी स्वतःच आजारी असल्यामुळें इतकें दिवस येऊं शकलो नाहीं. बाळासाहेब खुशाल आहेना? त्याचें वर्तमान मला बरेच दिवसांत कळलें नाहीं." माझ्या शेवटल्या वाक्यानें सगुणेला फार दुःख झालेलें दिसलें. तिच्या नेत्रांत अश्रु आले व ते तिनें मोठ्या कष्टानें आवरलें. तिच्या विचित्र वर्तनाचा व मुग्धपणाचा मला अर्थ न समजून बाळासाहेबाच्या जीविताविषयीं माझ्या मनांत कुकल्पना येऊन माझे हातपाय लटपटूं लागले व घशाला कोरड पडूं लागली.

" बाळासाहेबाकडील काय हकीकत आहे ती एकदां मला कळूं द्या." धीर न निघून मी एकदम म्हणालो. एका टेबलाच्या खणांतलें एक पत्र काढून माझ्या पुढ्यांत टाकून ती रडत रडत म्हणाली.

" हें वाचा, म्हणजे सर्व खुलासा होईल." मी घाईनेंच तें पत्र उचलून घेतलें, परंतु अक्षर बाळासाहेबाचें नव्हते. या पत्राचा व बाळासाहेबाचा काय संबंध हें मला पहिल्याने कळेना. थरथरणाऱ्या हाताने व धडधडणाऱ्या हृदयानें तें पत्र मी वाचूं लागलो. पत्र पुढील अर्थाचें इंग्रजींत लिहिलेलें होतें.

" आपले चिरंजीव येथें आल्यापासून बरेंच गुण पाघळूं लागले आहेत. ते सुरादेवीचे तर पुरेंच भक्त झाले आहेत. त्याशिवाय जुगारीचा नादहि त्यांना बराच लागला आहे, हें त्यांच्या अलीकडच्या वाढत्या पैशाच्या मागणीवरून आपल्या लक्षांत आलें असेलच. तसेंच ते येथील हलक्या कुलाच्या पण सुंदर अशा एका आंग्ल तरुणीच्या प्रेमपाशांत पुरेच अडकलें आहेत व लवकरच आपल्या नूतन परिणीत पत्नीसह आपल्या भटीला येतील. येथें येऊन त्यांचीं जी मतें बनलीं आहेत ती सुधारण्याची आता आशा नाहीं. आपण जर यापुढें आपल्या चिरंजीवाला पैसे पाठविण्याचें बंद कराल तरच कदाचित् ते ताळ्यावर येऊं शकतील."

आपला व आपल्या चिरंजीवाचा
एक हितेच्छु."

पत्र एवढेंच होतें, पण तें किती घातकी होतें! डोळ्यापुढें अंधेरी आल्यामुळें मला कांही वेळ त्या पत्रांतला अर्थच कळेना. एक–दोन–तीन वेळ मी तें पत्र पुनः-पुनः वाचलें. "हाय! बाळासाहेब, तूं हें काय केलेंस? माझ्या अटकळीप्रमाणें तूं कोणातरी नीच माणसाच्या हातांत सांपडलास"! मी हताशपणें त्या पत्राकडे पहात म्हणालो. सगुणेचा हुंदका माझ्या कानीं आल्यामुळें मी कोठें आहे व माझ्यासमोर कांहीं अंतरावर सगुणा आहे याची मला शुद्धि आली. दोन्ही हातांनीं तोंड झांकून सगुणा अविरत अश्रुविमोचन करीत होती. कांहीं वेळानें आपलें मन स्थिर करून ती म्हणाली.

" किती निष्ठुर ! आपल्या पित्याचीसुद्धां आठवण झाली नाहीं? हाय ! हाय ! बाबांच्या दुःखाकडे पाह्यलं कीं छाती फुटूं लागते ! ज्यांनीं आपल्या सर्व सुखाच्या आहुती दिल्या, त्यांना असे बक्षिस मिळावं काय ? "

तिचें हृदय फोडून ते शब्द बाहेर पडत होते, तिच्या दुःखी अंतःकरणाची कशी समजूत करावी ? तिची कशानें तरी समजूत होण्यासारखी होती काय ? मी जडमूढासारखा निस्तब्ध बसून राहिलों, एकदम माझ्या मनांत एक आशेचा किरण आला, मी म्हणालो.

"हें पहा, सगुणाताई हें पत्र कांहीं बाळासाहेबाच्या हातचें नाहीं. त्याचें चांगलें पहावत नसेल अशा एखाद्या त्याचें शत्रुत्व करणाऱ्यापैकीं कोणी तरी लिहिलें असावें. बाळासाहेबाला इतक्यांत येथल्या मंडळींचें विस्मरण होईल असें मला वाटत नाहीं. त्याचें स्वतःचें पत्र कधीं आलें होतें ? " त्यावर मान हालवून निराशेनें ती म्हणाली.

" या दोन महिन्यांत बाळासाहेबाचं मुळींच पत्र नाहीं. अलीकडे पहिल्यापेक्षां दुप्पट तिप्पट पैसे पाठवावे लागत असल्यामुळें पत्रांत लिहिलेली हकीकत खरी असावी, अशी माझी खात्री झाली आहे हें तुम्हाला माहित नाहीं कां ? अशा स्वभावाच्या माणसाच्या हातून अशा गोष्टी होणं असंभवनीय नाहीं, अरेरे ! निदान बाबांच्या करतां तरी आपल्या मनाचा मोह आवरायचा होता ! बाबांचें प्रेम किती आलोट आहे याचं कसं विस्मरण झालं ? ही वार्ता त्यांच्या कानावर जाऊन त्यांच्या मनाची काय स्थिति होईल याचा कसा मुळींच विचार केला नाहीं ! " दुःखभरानें तिचा कंठ दाटून आल्यामुळें तिच्यानें अधिक बोलवेना ! मलाहि आतां तिचें म्हणणें खरें भासूं लागलें. ती हृदयभेदक वार्ता ऐकून माझ्या हृदयाचेंहि शतशः तुकडे होऊन गेले ! बाळासाहेब ? अरेरे ! तूं इतका कठोर कसा झालास ? आपल्या प्रेमळ पित्याचें व तुझ्या प्रेमासाठीं आपल्या सर्वस्वाचा त्याग करून तुझ्यासाठीं झुरणाऱ्या कोमल-हृदयी सगुणेचें तुला इतक्यात विस्मरण झाले काय ! यापासून पुढें काय अनर्थ होईल याची तुला कल्पना झाली नाहीं काय ? आम्ही दोघे कितीतरी वेळ तेथेंच बसून होतो ? सगुणा एकसारखी रडत होती व मी तुफान झालेला घोडा ज्याप्रमाणें जबर दस्तीनें आवळून ठेवावा त्याप्रमाणें हृदयांत होणारें जबर दुःख मोठ्या कष्टानें दाबून धरण्याचा प्रयत्न करीत होतों; माझ्या मित्रावर माझें प्राणापेक्षांहि अधिक प्रेम होतें. त्यानें अशा रीतीनें भलत्याच नादाला लागून आपल्या बरोबर आपल्या कुटुंबाचा नाश करण्याला प्रवृत्त व्हावे हें किती असह्य होतें ! ' सगुणा, ' म्हणून खोल स्वरांत उच्चारलेले बापूसाहेबांच्या तोंडचे शब्द आमच्या कानांवर आले व आम्हीं दोघेहि त्यांच्याकडे जाण्यास एकदम उठलो. सगुणेनें आपले अश्रु साफ पुसून टाकले व ती म्हणाली. " बाबांची स्थिति फार चमत्कारिक झाली आहे. हें पत्र वाचून त्यांचें लक्ष अगदीं उडून गेलें आहे. त्यांचें कसें समाधान करावें हें मला कांहीं सुचत नाहीं. ते

अगदीं अमिष्टासारखे करतात. तुम्हाला मी बोलावणार होते, पण तुम्ही आजारी असल्याचें मला कळलें. चला. तुम्ही आतां प्रत्यक्षच पहा." ती पुढें व तिच्या मागें चोरासारखा मी आंत गेलो. बापूसाहेबांच्या दुःखी अंतःकरणाची मला अद्याप भेट घ्यावयाची होती. त्यांच्याशी काय बोलूं, त्यांना काय सांगूं असें वाटून माझ्या हृदयांत अधिकच धसका बसला!

"सगुणा, कोठें होतीस बाळ?" बापुसाहेब अत्यंत क्षीण व खोल स्वरांत म्हणाले. माझी कंबरच खचली. त्यांच्या चेहऱ्यावर प्रेतकळा आली होती. हेच कां बापुसाहेब? मला माहीत नसतें, तर कांहीं दिवसावर पाहिलेले तेच हे बापुसाहेब असें मला खरेंसुद्धां वाटलें नसतें. मी स्तिमितपणें जागच्याजागीं थिजल्यासारखा उभा राहिलों! बापुसाहेबांचीहि आतां माझ्याकडे नजर गेली. "अहो चिंतामणी!" असें अगदीं हृदय विदीर्ण करून टाकणाऱ्या दीनवाणीनें ते म्हणाले. व त्यांनीं आपल्या कृश झालेल्या व अस्थिचर्म उरलेल्या हातानें आपलें तोंड झाकून घेतलें. त्यांच्या दुःखाचें कसें वर्णन करावें हें मला न कळून मी वेड्यासारखा त्यांच्याकडे पाहूं लागलो. पहिल्या दुःखाचा उमाळा जरा ओसरल्यावर ते म्हणाले.

"हाय! हाय!! माझा प्राण, माझा आत्मा असा माझा गुणी बाळासाहेब कसा हो असा झाला! देवा! देवा!! मला तूं कशाला जगवलेस? एवढ्याचसाठीं काय? म्हणूनच त्याला पाठवायला मी कबूल नव्हतो! अरे देवा! माझा बाळासाहेब वाईट लोकांच्या संगतीनें खराब झाला अं?" ते एकदम उठून बसले, "नाहीं. नाहीं. तो असे कधीं करणार नाहीं. त्याच्यावर माझें किती प्रेम आहे हें त्याला माहीत आहे. तो मला अशा दुःखसागरांत कधींहि लोटणार नाहीं! जा. जा, माझ्या बाळासाहेबाला घेऊन या जा. त्यानें कितीहि दुर्वर्तन केलें, तो कितीहि व्यसनी असला तरी तो माझा जीव कीं प्राण असा मुलगा आहे. त्याला मी माझ्या हृदयाशी धरेन, त्याला मी सर्व अपराधांची क्षमा करेन. जा, जा, त्याला सांगा कीं, मी तुला क्षमा केली आहे, तूं एकदा येऊन मला भेट. साऱ्या जगानें जरी तुझा तिरस्कार केला तरी मी तुझा कधींहि तिरस्कार करणार नाहीं. माझ्या या हृदयाशीं तुला घट्ट धरून ठेवीन. अहो, जा हो! त्याला तुम्ही लवकर घेऊन या. हाय! हाय! आता कसला माझा बाळासाहेब मला भेटणार आहे? अरे देवा!! हें दुःख मी कसें सहन करूं!!" असें म्हणून स्वतःच्या कपाळावर ताडकन हात मारून ते पलंगावर निश्चेष्टित पडले. त्यांना सावध करण्याचा आम्ही बराच प्रयत्न केल्यावर ते जरा शुद्धीवर आले. त्यांची ती स्थिति पाहून माझें अंतःकरण द्रवून गेलें. पण त्यांचें समाधान करण्याचें साधन माझ्याजवळ काय होतें? मी बापुसाहेबांना पंख्यानें वारा घालीत होतो, त्यांनीं ताठरलेले आपले डोळे उघडून माझ्याकडे टक लावून पाहिलें व माझे दोन्ही हात आपल्या हातात धरून ठेवले.

"माझ्या बाळासाहेबाला घेऊन नाहींच आलास ना? अरेरे! निष्ठुरा! आम्हीं पितापुत्रांची ताटातूट केल्याचा तुला पश्चाताप होईल बघ. जा. जा. अझून तरी जा.

तो बंदरावर आला, पण येथें यायला त्याला शरम वाटत असावी." आपला स्वर खालीं करून ते म्हणाले. " हें पहा ! मी फार दिवस कांहीं जगणार नाहीं, तेव्हां त्याला म्हणावें मला येऊन एकदां तरी भेट. मी मेल्यावर वाटेल तसें करायला तुला मोकळीक आहे. पण छे ! मग या माझ्या सगुणेची काय वाट ? तिला मी माझ्या मुलीसारखी वाढविली, आतां तिनें कोणाच्या तोंडाकडे पहावें ? अहा रे निर्दया ! या सुस्वभावी पोरीची सुद्धां तुला दया आली नाहींना ? "

" बाबा ! असं काय हे ? " कसे तरी सगुणा म्हणाली, " जरा तुम्ही स्वस्थ निजाल तर बरं होईल. "

" स्वस्थ निजूं ? " मोठ्यानें हंसून ते म्हणाले " अहाहा ग वेडे ? मी आतां स्वस्थ निजूं ? " असे म्हणून ते लहान मुलासारखे रडूं लागले. माझ्यानें त्यांची ती वेड्यासारखी स्थिति पहावेना ! धन्य आहे सगुणेची ! स्वतःचें हृदय धगधग जळत असता, ती बापुसाहेबांची शुश्रुषा करीत होती. पुनः बापुसाहेब एकदम भानावर आल्यासारखे दिसले. पण नाहीं, ते उन्मादावस्थेत बोलूं लागले. " अग सगुणे, चल लवकर, बाळासाहेब आला, तूं बंदरावर येतेस ना ? " ते गडबडीनें उठून पलंगाखालीं उतरूं लागले, पण त्यांना उतरवेना व आम्ही मोठ्या प्रयासानें त्यांना परत निजविलें. "अरे, दुष्टांनो ! मला माझ्या बाळाला भेटायला जाऊं द्या माझ्या बाळा ! माझ्या बाळासाहेबा येरे ये. तूं तरी ये इकडे ! " म्हणून ते पुनः निश्चेष्ट पडले. बाळासाहेबाच्या अविचारीपणाचा मला फार राग आला. येथली सर्व हकीकत कळवून त्याला ताबडतोब बोलाविण्याचा मी विचार केला. तसेच तेथे जाऊन फार उत्तम मार्ग तूं स्वीकारलास म्हणून क्षणभर्तीत त्याची कानउघाडणी करावी असेहि वाटूं लागले. परंतु त्याच्या कोमल अंतःकरणाला या गोष्टीनें किती दुःख होईल हा विचार दुसऱ्या क्षणीच माझ्या मनात आला. तरी पण त्याच्या मनाला न लागेल अशा रीतीनें इकडील सर्व हकीकत कळविण्याचा मी विचार केलाच बॅरिष्टर न होता तूं शक्य तितक्या लवकर येऊन तुझ्या पित्याला भेटशील तर कदाचित् त्याची भेट होईल, असें कळवावयाचें असें मी निश्चित केले. आधींच पुत्रविरहाच्या दारुणव्यथेनें त्याचें अंतःकरण करपून गेलें होतें व त्यात हें पत्र वडवाग्नीच्या ज्वालेप्रमाणे त्याच्या हृदयाला येऊन भिडलें होते ! बाळासाहेबाला काळजी न लागेल अशा रीतीनें मी एक सविस्तर हकीकतीचें पत्र लिहून शक्य तितक्या लवकर हिंदुस्थानात निघून येण्याविषयी त्याला विनविलें होतें. परंतु माझें तें पत्र पोंचण्यापूर्वींच सहृदयी बापुसाहेबानीं ' बाळासाहेब ! बाळासाहेब ! ' म्हणून अखेरपर्यंत हाहो फोडून आपल्या जिवाचें विसर्जन केलें ! बापुसाहेबांची तशी स्थिति पाहिल्यावर असहाय सगुणेला एकटीला तेथें सोडून मला घरीं आणें शक्य नव्हतेंच. मी ताबडतोब बाबूराव व शंकरराव यांना तेथें बोलावून घेतलें. पुष्कळ नामांकित डॉक्टरांचे उपाय योजून पाहिले, मोठ्या डॉक्टरांसहि आणलें, पण

कशालाच गुण न येतां अखेर सात आठ दिवसानंतर बापुसाहेबांचा आत्मा हा मर्त्यलोक सोडून गेला! ते गेल्यावर तीन दिवसांनीं सगुणा एकाएकीं नाहींशीं झालीं " मी या बंगल्यांतून निघून जात आहे व माझा शोध करण्यांत अर्थ नाहीं. " अशी तिच्या हातची एक चिठ्ठी मला मिळाली. सगुणा कोठें नाहींशीं झाली तिचा पत्ता लागला नाहीं.

त्या आनंदसागरांत पोहणाऱ्या बाळासाहेबाच्या बंगल्याचें स्मशान बनलें! बंगला बंद करून वृद्ध रुद्राजी आपल्या तरुण धन्याच्या येण्याची आशापूर्ण अंतःकरणानें वाट पहात आहे. ही दुःखद बातमी बाळासाहेबाला कशी कळवावी हा मोठा बिकट प्रश्न माझ्यापुढें उभा होता आणि तो दुर्धर प्रश्न अखेरीस मलाच सोडवावा लागला! ही बातमी कळून माझ्या प्रियमित्राच्या मनाची काय स्थिति होईल याची माझ्यानें कल्पनाच करवेना! ज्या पत्रानें हा सारा घोंटाळा माजून एका प्रेमळ कुटुंबाचा असा दुःखद शेवट झाला होता, त्या पत्रावर अद्यापहि माझा भरंवसा नव्हता. बाळासाहेबावर सूड उगविण्याकरितां कोणीतरी हा कपटव्यूह रचला असावा, असें माझ्या अंतःकरणाच्या कोंपऱ्यांत वाटत होतें; पण, असा बाळासाहेबाचा शत्रू कोण असावा याचा मुळींच तर्क होईना? तो शत्रू कोणीहि असो; त्याच्या कपटव्यूहाला यश येऊन बाळासाहेबाच्या कुटुंबाची वाताहत झाली होती. अहारे दुर्दैवा! बापुसाहेबांसारख्या सज्जनाचा किती निष्ठुरपणानें घात केला!

——:o:——

### स्मृति तेहेतीसावी.

## माझी विलायतेची सफर.



बापुसाहेबांचा अंत होऊन सगुणेलाही तशाप्रकारें नाहींशीं झाल्याला आतां सहा सात महिनें होत आले होते. इतक्या दिवसांत बाळासाहेबाकडील कांहींच वर्तमान मला कळलें नाहीं. मी त्याला कितीतरी पत्रें धाडलीं परंतु माझ्या एकाहि पत्राचें उत्तर आलें नाहीं. उलट मालकाचा पत्ता नाहीं म्हणून माझी सर्व पत्रें माझ्याकडे परत आलीं. बाळासाहेब एकदम असा स्तब्ध कां ? तसेंच तो आपल्या लंडनच्या पूर्वी असलेल्या बिऱ्हाडातून कोणीकडे गेला ? तो आपल्यासंबंधीं कांहींच कां कळवीत नाहीं ? त्याला बापुसाहेबांचा अंत झाल्याचें कळले कीं नाहीं ? त्याला पत्र तरी कोठें धाडावें ? असे हजारो विचार माझ्या मनांत येऊन मला त्याच्याविषयीं आतां तर काळजी वाटूं लागली. आपल्या पित्याचा अशा रितीनें अंत झाला हें वर्तमान कळून त्यानें आपल्या जीवाचें कांहीं बरें वाईट तर करून घेतलें नाहींना! त्याच्या

साठीं माझ्या मनाला एकसारखी तळमळ लागून राहिली होती. मला कोठेंच चैन पडेना. काय केले असतां बाळासाहेबाचें वर्तमान कळेल, त्याची विलायतेंत तरी कोणाला माहिती विचारावी ? वेगेरें विचारांनीं माझ्या मनांत एकच काहूर उडवून दिलें होतें. आपण स्वतःच यूरोपला जाऊन बाळासाहेबाचा तपास करावा असा एक विचार माझ्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं. परंतु माझ्या वडिलांची प्रकृति अलीकडे फारच अशक्त झाली होती; ते आतां तर अगदीं अंथरुणाला खिळून होते; त्यांना तशा स्थितींत टाकून मला जाणें शक्यच नव्हतें. बाळासाहेबाची व भाऊची अशा दुहेरी दारुण काळजींत मी होतो. भाऊंना कसे बरें वाटेल ? कोणत्या उपायांनीं त्यांना गुण येईल ? ही चिंता माझ्या अंतःकरणाला एकसारखी जाचत होती. जेवढे म्हणून उपाय करणें शक्य होतें, तेवढे सर्व उपाय करून त्यांना आराम पडण्याची मी पराकाष्ठा करून पाहिली; परंतु कशालाहि गुण न येतां, ते अधिकाधिक अशक्त होत होते. बाईचीहि जवळजवळ त्यांच्याच सारखी स्थिति होती; ती त्यांच्यासारखी पडून नव्हती, पण तीहि अत्यंत क्षीण व अशक्त झाली होती. 'कांहीं दिवस यांना चांगल्या हवेंत घेऊन जा.' असे डॉक्टरनें सांगितल्यावरून मी भाऊला व बाईला घेऊन माथेरानला गेलो; तरी पण त्यांच्या प्रकृतीस यत्किंचितहि गुण न येतां, त्यांची फार दिवस आशा नाहीं, असें निराशेचे डॉक्टरचे उद्गार ऐकल्यापासून माझी अगदीं चमत्कारिक स्थिति होऊन गेली. डॉक्टरच्या सल्ल्यानें मी पुनः त्यांना मुंबईस घेऊन आलो. माझ्या पित्याची अशी अवस्था होण्याला कांहीं अंशी मीच कारण आहे, ही टोंचणीं मला एक सारखी शल्याप्रमाणें लागून राहिली होती. शक्य तितका काल मी त्यांच्याचजवळ बसून काढीत असें. त्यांनीं कांहीं इच्छा दर्शवितां ती पूर्ण करण्याला मी नेहमीं तत्पर असे. त्यांच्या हयातींत मला त्यांची एक इच्छा पूर्ण करतां आली नाहीं. त्याबद्दल मला नंतर फार फार खेद होत होता; ती इच्छा म्हणजे माझा विवाह होय, परंतु 'भवितव्यता बलीयसी.' त्यापुढें आपण काय करणार ?

भाऊंच्याजवळ बसून मी एके दिवशीं एक वर्तमानपत्र वाचीत होतो, त्यांतला पुढील मजकूर वाचून मला आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. मी ज्या क्षुधाशांतिगृहांत होतो, त्या आमच्या मालकाला-विठोबाला भर दिवसा गोळी घालून कोणी तरी ठार केलें होतें ! तसेंच पुंड्या व त्याच्या कांहीं साथीदाराला एका खुनाच्या खटल्यांत पकडले होते. व त्यांच्या साक्षीदाराच्या यादींत आमच्या गंगुमामाचेंहि नांव होतें ! तसेंच विठोबाला ठार मारणारा त्याचा मित्र पुंड्याच असावा असा पोलिसांचा समज होता. तो ती गोष्ट कबूल करीत नव्हता. कांहीं दिवसांपूर्वी ज्यानें मला गोळी घालून मारण्याचा विचार केला होता, तो बहुतकरून पुंडोबाच असावा असें मला निश्चयपूर्वक वाटूं लागलें. शेटसाहेबांकडे झालेली मोठी थोरली चोरी माझ्याचमुळें त्यांच्या पचनीं पडली नाहीं, असें

वाटून त्याबद्दल माझा अशारीतीनें सूड घेण्याची बुद्धि पुंडोबासारख्या इसमास होणें सहाजकिच आहे. परंतु गंगुमामा पुंडोबाच्या टोळींत कसे सामील झाले, याचें आम्हाला दोघांनाहि आश्चर्य वाटून खेद झाल्याशिवाय राहिला नाहीं. बाईला मात्र फार वाईट वाटलें. आपल्या दिवट्या चिरंजीवानें चांगला ढणढणींत दिवा लाविल्यामुळें माईसाहिब फारच संतापल्या व त्या झाडून साऱ्या लोकांना शिव्याशाप देऊं लागल्या. दोन चार दिवसपर्यंत त्यांनीं आम्हाला सर्वांना घरांत अगदीं सळो कीं पळो करून दिलें होतें. परंतु त्यांच्याकडे आम्ही कोणीच फारसें लक्ष दिलें नाहीं. भाऊंच्या सांगण्यावरून मी गंगुमामांची चौकशी करावयाला व त्यांची भेट घ्यावयाला त्यांच्या बंदीगृहांत गेलों. मला पाहिल्यावर तिरस्काराने ते म्हणाले. " तुम्ही कोण हो आमची चौकशी करणारे ? " मला त्यानीं ओळखलें नव्हतें व प्रथम मीहि त्याना ओळखूं शकलों नाही. मी माझी त्यांना ओळख करून देतांच पिसाळल्यासारखे माझ्यावर वसकून ओरडून ते म्हणाले.

" अरे चंद्या ! चोरा, तूं मला सोडविणार होय ! मी काय तुझ्या बापाला भीतो वाटते ? काय समजतोस ? मी कोणाची चोरीबिरी केली आहे काय ? हे सारे पोलीस शिंचे महामूर्ख आहेत. मी त्याच्या बापाचे काय खाले आहे गुलामाच्या ? जा, जा. तुझी मला मुळीच गरज नाहीं. मी निरपराधी आहे हे शाबीत करण्याची माझ्यांत धमक आहे. स्वतः चोऱ्या करून मला शहाणपणाच्या गोष्टी सागायला लाज नाहीं वाटत ! जा, निघ येथून. " त्याच्या त्या भाषणाचा मला फार राग आला व काहींएक न बोलता मी तेथून निघून आलो. त्याच्या या मगरूरीच्या व गुरकावण्याच्या भाषेला सरकार थोडीच दाद देणार आहे ? विठोबाचा खून केल्याबद्दल व दुसऱ्याहि खटल्यात मुख्य आरोपी पुंड्याच असल्यामुळे त्याला फांशीची शिक्षा झाली व गंगुमामाचें त्याला बरेंच सहाय्य झाल्यामुळें त्यांना काळ्या पाण्याची शिक्षा होऊन ते आपल्या जलपर्यटनाला गेले. गंगुमामाच्या बातमीने बाईला जास्तच धक्का बसला व माईसाहेब फारच चवताळल्या होत्या.

"चंदू, तूं असा अविवाहितच रहाणार काय ? माझ्या हयातींत जरी नाहीं, तरी पुढेंमागे तूं लग्न करून सुखाने संसार करावा अशी माझी फार इच्छा आहे असे आपल्या शेवटल्या समयीं म्हणून व त्याबद्दल माझ्याकडून वचन घेऊन भाऊंनीं या मेश्वर लोकाचा त्याग केला ! हाय ! माझ्या पित्यानें शेवटी आपली इच्छा पुरी होण्यापूर्वी या दुःखदसंसाराचा त्याग केला होता ! भाऊंच्या मरणानंतर बाईहि फार दिवस दुःख भोगीत राहिली नाहीं. दोन अडीच महिन्यांत तिनेही आपली मृत्युलोकची यात्रा संपविली. बाई जरी माझी सावत्र आई होती तरी ती माझी माता होती, आणि तिच्यापासून मला फारसा त्रास झालेला नव्हताच; मला घरांतून निघून जाण्याला आपलाच भाऊ कारण आहे व माझ्या-

मुळें माझा पिता तळमळत असें हें जाणून तिला फार कष्ट होत असत. मला पुनः परत आलेला पाहून तिला हर्ष झाला होता. मी लग्न करावें अशी भाऊंच्याप्रमाणें बाईचीहि फार इच्छा होती. परंतु ही एकच इच्छा मी त्या दोघांची पुरवूं शकलो नाहीं माझ्या मातापित्यांच्या मरणानें मला किती दुःख झालें त्याचें वर्णन करणें सामर्थ्या बाहेरचें आहे. सर्व जग आतां मला उदास व भयाण वाटूं लागलें. निद्रा माझ्या पासून दूर निघून गेली. कशांतच गोडी लागेना व कोठेंच मन रमेना! खरोखरीं जगांत सर्वदा कोणी सुखी असूं शकेल काय? परंतु माझ्या सारखा दुर्दैवी कोणी तरी असूं शकेल काय? दैवाचें चक्र नेहमी माझ्या बाबतींत वक्रगतीनेंच चालत आले आहे काय?

बाळासाहेबावरच्या त्या प्रसंगाची आठवण अद्याप ताजीच होती, तो माझ्यावर तसाच कांहींसा दारुण प्रसंग आला होता. आधींच माझ्या चिंताग्रस्त मनःस्थितीला अधिकच चिंतेनें व्यापलें! आतां मला मुंबईस राहणे बरें वाटेना! कोठें तरी दूर जावें असें मला फार वाटूं लागलें! विचार करण्याचाहि आतां मला अगदीं वीट आला होता! विचार! विचार!! विचार!!! विचाराचा सर्व बोजा विधात्यानें जन्मापासून माझ्याच वांट्याला राखून ठेविला होता काय? असा एकहि दिवस गेला नसेल कीं, कांहीं तरी दुःखदविचारानें मन व्याप्त झालें नाहीं, अतिविचारानें माझा मेंदू मस्तक फोडून बाहेर येतो कीं काय? असें मला एकादसमयीं वाटल्याशिवाय रहात नसे. काहीं दिवस तरी मुंबईला रामराम ठोकून कोठें तरी एकांतवासांत दिवस घालवावें असें माझ्या मनांत अलीकडे फार येऊं लागलें. माझी ती मनःस्थिति ओळखूनच कीं काय, एकदां शेटसाहेबांनीं मला बोलावून विचारलें, " चिंतामणी, आपल्या बॅंकेच्या कांहीं कामासाठीं एक मनुष्य इंग्लन्डला पाठविण्याचा माझा विचार आहे व तुलाच पाठविण्याचा माझा हेतु आहे. पहा, तुझा उद्देश आहे का जाण्याचा? हल्लीं तुझ्या स्थितीचा विचार करतां कांहीं दिवस तूं यूरोपांत राहिलास तर पुष्कळ फायदा होणार आहे. तेथील सर्व माहिती मिळवून आपल्या बॅंकेचा चांगला फायदा करतां येईल. तर तूंच जाऊन ही कामगिरी करून यावेस अशी माझी इच्छा आहे." त्यावेळीं इंग्लंडला जाण्याची मला एवढी महत्त्वाकांक्षा राहिली नव्हती, तरी आपल्या प्रियमित्राचा कांहीं तरी पत्ता लागेल या आशेनें मी ती गोष्ट लागलीच कबूल केली. वास्तविक पाहतां आतां माझ्या पूर्वीच्या सर्व आशा व महत्त्वाकांक्षा लुप्तप्राय झाल्या होत्या. निदान माझ्या तरी आयुष्यकोशांत सुख हा शब्द नाहीं, अशी माझी आजपर्यंतच्या अनुभवावरून खात्री झाली. शेटसाहेबांची इच्छा व ते माझ्या हितासाठीं एवढी काळजी वहात होते; शिवाय माझ्या मित्राची भेट व्हावी म्हणून विलायतेला जाण्याला मी कबूल झालो. पूर्वी विलायतेस जाऊन एकादी मोठी पदवी मिळवून आपलें नांव काढण्याची जी मला उत्सुकता व उमेद होती, ती आतां नाहींशीं झाली होती! माझा बाळमित्र बाबू आतां माझ्या दृष्टीसमोर चांगल्या स्थितींत होता, बाळासाहेबाची गांठ पडल्यानंतर

शंकररावाचें व माझें मित्रत्व बरेंच दृढ झालें होतें. परंतु बाळासाहेबाकडे माझा जो विशेष ओढा होता, त्याचें कारण माझ्या लक्षांत येत नव्हतें. एवढी गोष्ट खरी कीं, त्याच्याचसाठीं माझें अंतःकरण तिळतिळ तुटत होतें. त्याच्या भग्नहृदयीं पित्याच्या मृत्यूनें व त्याच कारणास्तव सगुणेचें नाहींसें होणें, बाळासाहबान इतकें दिवस धारण केलेली मूकवृत्ति, याचें मला वारंवार स्मरण होऊन मन उदास व ज्ञानशून्य होऊन जाई. पित्याच्या मरणाची बातमी कळूनच तो असा मूकपणानें राहीला आहे, कदाचित् त्यानें आपल्या स्वतःवर कांहींतरी अनिष्ट प्रकार ओढून घेतला असला पाहिजे. या विचारानें माझ्या सर्वांगाला कंप सुटून सर्व इंद्रियें थिजून गेल्यासारखीं वाटत.

ठरल्याप्रमाणें मी विलायतेस जाण्यास सिद्ध झालो. माझ्याबरोबर मोहनलाल आय. सी. एस. ची परिक्षा द्यावयाला येणार होता. माझ्याबरोबरच शेटसाहेब त्याला पाठविणार होते. बाळासाहेब गेल्यानंतर जवळजवळ तीन वर्षांनीं मी हिंदुस्थानचा किनारा सोडून विलायतेस जाण्याला स्टीमरवर पाय ठेविला. पूर्वींच जर मी बाळासाहेबाबरोबर गेलो असतो तर आम्हा मित्रांची ताटातूट झाली असती काय? आम्हाला दोघाना विलायतची सफर व्हायची होती, परंतु दोघांनीं बरोबर जाऊं नये अशी परमेश्वराचीच इच्छा असली पाहिजे दुसरें काय! मी माझ्या मित्रमंडळींचा निरोप घेतला. बाळासाहेब गेला त्यावेळचा सर्व देखावा माझ्या मनःचक्षुपुढें उभा राहिला. माझें अंतःकरण भरून आलें. मोहनलालाला निरोप देताना शेटसाहेबाची फार चमत्कारिक स्थिति झाली होती. त्याच्याविषयीं काळजी घेण्याला ते मला वारंवार सुचवीत होतेच. मोहनलाल व मी बरोबर असल्यामुळें आम्हा दोघांना तितकें बरें होतें; मी यूरोपांत जावयाला निघालो, पण आता त्यापासून मला मुळींच आनंद वाटत नव्हता. हें एक कर्तव्य आहे अशा जाणिवेनेंच मी जात होतो.

युरोपांत मी एकंदर तीन वर्षें काढलीं. माझ्या यूरोपच्या प्रवासांत मला बरेंच नवीन अनुभव आले. हिंदुस्थानांत असतांना ऐकलेले यूरोपचें मनोहर वर्णन व तेथला आलेला प्रत्यक्ष अनुभव यांत मला बरेंच अंतर दिसूं लागलें. हिंदुस्थानाविषयीं तेथल्या लोकांच्या अद्भुत व चमत्कारिक कल्पना पाहून मला आश्चर्य व खेद वाटल्यावांचून राहिला नाहीं. सुधारणेच्या उच्च वातावरणांत भ्रमण करणाऱ्या व सर्व सुधारणा ज्यांनीं अगदीं हस्तगत करून टाकल्या आहेत अशा सुशिक्षित वर्गांपैकीं तीस कोटी मानवजातीनें गजबजलेल्या हिंदुस्थान देशाविषयीं कांहीं बाबतींत अज्ञान पाहून मला वाईट वाटलें. हिंदुलोक घरें करून रहातात कां जंगलांत वाघसिंहादि प्राण्यांत पशूप्रमाणें रहातात याची सुद्धां कित्येकांना माहिती नसावी हें केवढें आश्चर्य? हिंदुस्थानांत गायीम्हशींचें दूध कोणत्या रंगाचें असतें? म्हणून विचारणारा एक शहाणा मला भेटला. तो प्रश्न ऐकून जितकें हंसूं आलें व त्याच्या अज्ञानाविषयीं चमत्कार

वाटला, तितकेंच आपण हिंदु इतके कवडीमोल आहोंत कीं, आपणाविषयीं व आपल्या एवढ्या अफाट देशांविषयीं या सुधारलेल्या लोकांना मुळींच किंमत वाटत नसून ते त्या बाजूनें चौकशी करीत नसतील, हा विचार मनांत येऊन खेद वाटल्यावांचून राहिला नाहीं. हिंदु लोकांना धर्म असतो कां? हिंदु लोकांना अक्कल असते कां? त्यांना कलाकौशल्याचें ज्ञान असतें कां? असे अनेक प्रश्न विचारणारे काहीं लोक मला भेटले. तसेंच आपणाला हिंदुस्थानच्या अठरापगड लोकांची व त्यांच्या आचारविचारांची फार माहिती आहे, असें म्हणून एखाद्या घमंडानंद मिशनऱ्यांनं भलभलत्या थापा ठोकून आपली प्रतिष्ठा वाढविण्याऐवजीं आपलें अज्ञान मात्र चांगलेंच प्रगट केलें आहे, असें मला वाटूं लागले. खोट्या बाता मारणाऱ्या आणि त्यावर विश्वास ठेवणाऱ्या सज्ञान युरोपियनापेक्षां आम्ही हिंदवासी अज्ञानी लोक पुष्कळ बरें. कारण आम्हांला माहित नसलेल्या अशा अद्‌भुत गोष्टींवर अलीकडचे लोक तरी विश्वास ठेवणार नाहींत व असले लहान मुलाला शोभण्यासारखें बाष्कळ प्रश्न तरी करणार नाहींत, असें मला वाटलें. मला माझ्या विलायतेच्या वास्तव्याविषयीं फारसें कांहीं लिहिण्यासारखें नाहीं. मी ज्या कामगिरीला गेलों होतों, ती कामगिरी उत्तम रीतीनें पार पाडली. तसेंच तेथल्या कित्येक सद्‌गृस्थांच्या सहाय्यानें आमच्या धंद्याला लागणारी सर्व प्रकारची माहिती ठिकठिकाणीं मिळविता आली. व कित्येक विद्वान लोकांच्या भेटी घेतां येऊन त्यांच्या ज्ञानाचा थोडासा तरी लाभ घेतां आला.

बाळासाहेबासंबंधीं पुष्कळ तपास केला, पण त्याचा कोठेंच पत्ता लागला नाहीं. तो ज्या घरांत रहात होता, तेथें तपास करतां तो दीड वर्षापूर्वी एकाएकीं येथून कोणीकडे निघून गेला इतकेंच मला समजलें. तसेंच तो हिंदुस्थानांत गेला असावा अशी काहींशी निराधार बातमीहि मला मिळाली होती. त्याची जास्त माहिती मिळविण्याचा माझ्याकडून मी पुष्कळ प्रयत्न करून पाहिला, परंतु मला मुळींच यश आलें नाहीं. जेवढ्या ठिकाणीं त्याची भेट होईल अशी आशा होती, तेवढ्या ठिकाणीं मी त्याचा शोध केला, पण कोठेंच चिन्ह दिसेना. आतां त्याच्याविषयीं माझी बहुतेक निराशाच झाली! तसेंच त्याच्या जीवाविषयींहि चिंता वाटूं लागली, मोहनलालची चांगली व्यवस्था लावून पुनःहिंदुस्थानांत यावयास मी निघालों.

ज्या आशेनें मी इंग्लंडांत गेलो होतो त्यांत माझी पूर्ण निराशाच झाली! परंतु यूरोपच्या प्रवासानें पूर्वीपेक्षां मला हुशारी आली होती खरी! मनुष्य कितीहि दुःखांत व निराशेच्या खोल गर्तेत जरी असला, तरी जसजसा काल पुढें पुढें चालत जातो, तसतसा तो सुखात्म्याचें सुख व दुःखात्म्याचें दुःख आपल्याबरोबर हळूहळू नेत असतो. पूर्वी ज्याला दुःखाचें तडाखे सोसावें लागले असतील, त्यांनाच खाची खरी किंमत कळते. व दुःखिताला पुढच्या आशेनें आपले दुःख जरा हलकें वाटतें! मानवप्राण्याला आशा

ही एक भावना आहे हें जर माहित नसतें तर सर्वांना आपलें जीवित भारभूत व कंटाळवाणें वाटलें असतें. बाळासाहेब हिंदुस्थानांतच असावा अशी कल्पना येऊन मला कांहींसें समाधान वाटूं लागलें.

मी परत सुखरूप आलों म्हणून शेटसाहेब, त्यांची पत्नी, बाबूराव व त्याच्या घरची सर्व मंडळी, शंकरराव वगैरेला फार आनंद वाटला. भीमाला तर अगदीं अवर्णनीय आनंद वाटूं लागला. मी विलायतेस जाऊन मोठा दिग्विजय करून आलों आहे असें तिला वाटत होतें. भाऊ असते तर त्याना किती आनंद झाला असतां असें ती किती वेळा तरी म्हणे, शंकरराव या सुमारास एल्, एल्. बी. होऊन मुंबईतच प्रॅक्टीस करूं लागला होता. त्याने आतां तेथें बिऱ्हाड केलें होतें; त्याची पत्नी हल्लीं तेथेच होती. शंकररावाचा पहिला मुलगा मधू हल्लीं पांच वर्षांचा असून दुसरी मुलगी दोन वर्षांची होती. आम्हा मित्रांपैकीं तोच सध्यां खरा सुखी होता. त्याचें सुख पाहून आम्हाला आनंद वाटत होता. बाबूराव अद्याप अविवाहीतच होता. त्याला बँकेच्या कामापेक्षा फोटोग्राफीतच विशेष आवड उत्पन्न झाल्यामुळें तो तिकडेच अधिक लक्ष पुरवूं लागला. चित्रकला हा विषय जरी त्याच्या आवडीचा होता, तरी त्याचे आपल्या देशात फारसे चीज होणार नाहीं, याची त्याला खात्री होऊन चुकली होती, म्हणून तो फोटोग्रॅफीच्याच नादाला लागला होता. त्यांतल्या त्याच्या एका व्यवसायबंधूच्या सहाय्यानें लवकरच एक स्वतंत्र 'स्टूडीयो,' काढण्याचा त्याचा विचार होता. शंकररावाची बहीण सुशीला. त्यांचें वडिल आणि आई कांहीं दिवसांकरिता मुंबईस आले होते. बाबूरावशीं सुशिलेचा विवाह होण्याचें बहुतेक नक्की झाले होते. बाबूरावची सांपत्तीक स्थिति जरी दादासाहेबासारखी नव्हती, तरी त्याच्यासारखा निगर्वी व सालस स्वभावाचा मुलगा मिळणें दुरापास्त होय हें जाणूनच की काय ते आपली कन्या त्याला द्यावयाला तयार झाले होते. तसेंच त्यांच्या मनात एखादी गोष्ट आल्यावर तिला कोणी विरोध करूं शकत नसे. शिवाय एका उत्तम ज्योतिषानें बाबूरावाच्या पत्रिकेवरून असें सांगितलें होते कीं हा पुढें नशीबवान् निघेल व त्याचे व सुशिलेचे ग्रह उत्तम जुळून आले होते. ज्योतिषावर त्यांचा बराच विश्वास होता. या एकंदर कारणानीं हा अशक्य लग्नयोग जुळून आला होता. सुशीलेला विद्या शिकण्याची फारशी आवड नव्हती तशी ती अगदीं अशिक्षितहि नव्हती. तिला इंग्रजी थोडेसे येत होतें. तिच्या आईच्या मनांत बाबूरावचें स्थळ नव्हतें, व आपल्या मुलीला श्रीमंत पदवीधर पति मिळावा असें तिला वाटत होतें. परंतु कित्येक गोष्टी आपल्या मनांत जरी नसल्या तरी त्या आपोआप घडून येतात. तसेंच बाबूरावाच्या आईच्याहि मनांत मोठ्याची मुलगी सून करून घ्यावयाची नव्हती, परंतु बाबूरावच्या मर्जीपुढें ती फारसें बोलूं शकली नाहीं. एवंच सुशीला व बाबूराव यांच्या विवाहाचा समारंभ लवकरच होणार असें ठरलें.

इंग्लंडहून आल्याला मला आतां पांचसहा महिने झाले होते. पूर्वीपेक्षांहि बँकेचें काम मी मन लावून करीत होतो. आतां बहुतेक कामें शेटसाहेबांनीं माझ्याकडे सोंपविलीं होतीं. दिवसेंदिवस कामांतून मला फार थोडा वेळ मिळत असें. मॅनेजरचेंच काम मला करावे लागे, कारण मी लवकरच बँकेचा मॅनेजर होणार होतो. पूर्वीपेक्षांहि आमची बँक भरभराटींत आली होती. आमची बँक सर्वतोपरी उत्कृष्ट दर्जाची करण्याची माझी खटपट होती. हिंदुस्थानांत आल्यापासून येथेंहि बाळासाहेबाचा पुष्कळ तपास करून पाहिला पण व्यर्थ! त्याचा अद्यापपावेतों मुळींच पत्ता नव्हता. दिवसेंदिवस त्याच्या भेटीची मला निराशाच वाटूं लागली, मला मागच्या सर्व गोष्टींचें स्मरण होऊन तो इंग्लंडात न जातां तरी बरें झालें असतें असे वाटत असें. कॉलेजमध्यें असतांना आमचा काल बाळासाहेबांच्या संगतीनें किती मजेंत जात होता, याचें स्मरण झालें कीं जीवाची भयंकर तळमळ होऊन कांहीं सुचेनासें होई. भावी सुखाचीं काल्पनिक चित्रें रंगविण्यांत आम्हांला एकप्रकारचा उल्हास वाटत असे.

---

## स्मृति चौविसावी.

# माझ्या आयुष्यांतील एक संस्मरणीय दिवस.



एकदां मनाला अगदीं अस्वस्थता उत्पन्न झाल्यामुळें बाबूरावकडे जावयास मी निघालो, परंतु तो मला आपल्या घरीं भेटला नाहीं. तो शंकररावकडे कदाचित गेला असेल असें वाटून मी शंकररावकडे जावयाला निघालो. मी आज सात आठ दिवसांत त्याच्या येथें गेलो नव्हतो. शंकरराव घरींच होता. शंकररावाच्या बसण्याउठण्याच्या खोलींत मी जाणार तों एक अनोळखी तरुण मुलगी एका खुर्चीवर बसून शंकररावाशीं बोलत असलेली मला दिसली. आंत जाण्याकरितां मी उंबऱ्यांवर पाय ठेविला होता. तो पुढें टाकून आत जावें कीं नाहीं या विचारात होतो. इतक्यांत तेथेंच खेळत असलेल्या मघूची चपल दृष्टि माझ्यावर जाऊन तो धांवतच माझ्याकडे आला, व "ओहो! काका आले! काका, काका," म्हणून माझ्याजवळ येऊन त्यानें माझ्या पायाला विळखा घातला. आंतल्या दोघाचे माझ्याकडे लक्ष वेधले.

"अरे वः! चिंतामणी? केव्हां आलास? आंत ये." असें म्हणत म्हणत शंकरराव जागेवरून उठून उभा राहिला व तीं तरुणी आंत निघून गेली. तिला मी कोठें तरी पाहिली असावी असें मला वाटूं लागलें. पण कोठें हें मुळींच आठवेना! मी आंत आल्यावर शंकरराव मधूला म्हणाला.

"जा, काकासाठीं चहा करावयाला सांगून ये पाहूं आंत" मधु उड्या मारीत चहाचा हुकूम फर्मावयाला आंत गेला. आम्ही दोघे बसल्यावर शंकरराव मला म्हणाला.

" येथें कोण बसले होते, तिला तूं ओळखलेस कां चिंतामणी ? "

" कोण बुवा ? " मी म्हणालो. " मला कांहीं ओळख पटत नाहीं. " त्यावर तो हंसून म्हणालाः—

" अरे ? ओळख विसरलास तिची ? ती आमची मधुरी ! "

" मधुरी ! " मला जास्तच आश्चर्य वाटलें. " ती एवढी मोठी झाली अं ? "

" म्हणजे ? दिवसेंदिवस ती लहानच होणार वाटतें ? "

मी किंचित हंसून म्हणालो. " होय. तिला मी सात वर्षांपूर्वी पाहिली असल्या-मुळें इतक्यांत ती एवढी मोठी कशी झाली ?" याचें मला प्रथम आश्चर्य वाटलें खरें ? पण,कायरे, शंकरराव. ताई आल्या आहेत कां ?

" नाहीं. ताई नाहीं आली. मधुरी मॅट्रिकच्या परीक्षेला येथें आली आहे. "

" काय म्हणतोस ? मधुरी मॅट्रीकमध्यें आहे ? " मला आश्चर्य वाटलें. "स्त्रियांना फार शिक्षण उपयोगाचें नाहीं, असें ताईचें मत असून त्या आपल्या मुलीला इतकें शिक्षण देतील असें मला वाटलें नव्हतें. "

" तूं चुकतोस, चिंतामणी ! स्त्रियांना शिक्षण नसावें असें कांहीं ताईचे मत नाहीं. उच्चप्रतीचें शिक्षण स्त्रियांना जरी मिळालें तरी त्यांनीं आपलें मुख्य कर्तव्य जें गृहव्य-वस्था; तिकडे दुर्लक्ष करूं नये असें तिचें मत आहे. मधुरीला मॅट्रिकपर्यंतच शिक्षण दिलें जाणार. मधुरीहि आपल्या आईचीच थेट प्रतिमा आहे. तिचे विचार तिच्या आईला शोभण्यासारखेच आहेत. शिक्षणाच्या गर्वानें फुगून तिच्या अंगांत अभिमान अगर बेमुर्वतपणा मुळींच नाहीं. तिची राहणीसुद्धां अगदीं साधी आहे. थोड्या शिक्ष-णानें स्वतःला अहंमन्य समजून वाटेल तसें आचरण करणें अगर कुलीन स्त्रियांना न शोभण्यासारखा पोषाख करणें तिला मुळींच आवडत नाहीं. छिचोरपणा, बाष्कळ भाषण याची तिला मोठी चिरड आहे. " इतक्यांत दाराच्या आड चहाचे कप घेऊन मधुरी आली व ती वर्दी द्यावयाला मधु बाहेर आला. " मधुरी, तूंच आण चहा बाहेर; या चिंतामणीला कां तूं लाजतेस ? पूर्वी याच्याशीं वाटेल तशी बडबड करायला तुला कांहीं वाटत नव्हतें, आतांच ही उसनी लाज कोठून आणलीस ? " माझ्याकडे वळून तो म्हणाला " तुला आठवतें कां ही तुला त्रास देत होती ती ? " त्यावर मी म्हणालो.

" छे, छे. मला आठवत नाहीं तिनें कधीं त्रास दिलेला. "

" छे बुवा ? अशी त्रासदायक मुलगी मी कधीं पाहिली नव्हती. " शंकरराव थट्टेनें म्हणाला. " बरें, पण तें असो मधुरी, आण चहा लवकर. चिंतामणीला निवालेला चहा आवडत नाहीं. बघ, तुझ्या उशीरामुळें त्याला निवालेलाच प्यावा लागेल. " बिचारी मधुरी अखेरीस चहाचे पेले घेऊन बाहेर आली व मुकाट्यानें ते आमच्यापुढें टेबून जाऊं लागली. " मधुरी, तूं येथें बसलीस म्हणून कांहीं हरकत नाहीं. "



शं०—याची आणि तुझी जुनी ओळखही आहे. प्र. ३४ वें (पृ. २११)

तिच्या लज्जावनतमुखाकडे पाहून शंकरराव हंसून म्हणाला. " वास्तविक पाहतां तुम्ही शिकलेल्या मुलींना कोणालाहि लाजण्याची मुळीं जरूर नाहीं. मग या चिंतामणीला कशाला लाजायला पाहिजे ? तूं तर याला पाहिलेला आहेसच; याची आणि तुझी जुनी ओळखहि आहे. " ती कांहीहि न बोलतां मुकाट्यानें हास्यवदनानें निघून गेली. मलाहि तिच्याशीं आतां आपण होऊन बोलावयास संकोच वाटूं लागला. पहिल्यापेक्षां तारुण्याच्या ऐनबहारींत ती नयनाकर्षक दिसत होती व तिच्या नेत्रांतली चंद्रिका अधिकच शीतल भासत होती. चहा प्याल्यानंतर थोडावेळ इकडच्या तिकडच्या गप्पा गोष्टी करून मी जाण्याच्या विचारांत होतो. कोठूनसा मधु येऊन माझ्या गळ्यांत हात घालून माझ्या पाठीवर पडला.

" चल, मधुबाळा, मला जाऊं दे आतां. " मी त्याला म्हणालो. माझी टोपी काढून त्यानें लपवून ठेविली व हंसून म्हणाला.

" आज तुम्हाला मी जाऊं देणार नाहीं. तुम्ही आज रहा. पहातर खरी आमची मधुरी ताई कसं फक्कड गाणं म्हणते तें ? " लडीवाळपणानें तो माझ्या मांडीवर येऊन बसला. मधुरीचा अवाज फार मधुर होता, पण ती आतां माझ्यासमोर गाणे म्हणेल काय ? ती लहान असतां मी तिचीं पुष्कळ गाणीं ऐकिलीं होतीं, परंतु आतां मला तिला म्हणण्यास सांगतां येण्यासारखें नव्हतें व तिनेंहि म्हटलेंच असतें असें नाहीं. मी मधुला म्हणालोः–"तुझी ताई तुला गाणें गाऊन दाखवतें, पण मला थोडेंच आता गाऊन दाखवणार आहे ? "

" हो, हो. दाखवील तुम्हालासुद्धां. होय ना नाना ? " तो शंकररावाला विचारूं लागला. शंकरराव हंसून म्हणाला.

" होय, चिंतामणी. मधुरीचें गाणें ऐकायचें असलें तर सांगतो तिला, पण ती हट्टी मुलगी आहे. लहर लागली तरच म्हणेल." इतक्यांत मधु उभा राहून माझे केस ओढूं लागला व हंसून म्हणाला.

" काका, मी बोलवूं कां ताईला ? "

शंकरराव त्याला केंस न ओढण्याबद्दल रागावूं लागला, पण तो तिकडे लक्षच देईना. त्याचें आपलें 'मी ताईला बोलावतो तुम्ही जाऊं नका' हें चाललेंच होतें. आजच मधुरी माझ्यादेखत गाणें म्हणेल याची मला खात्री नव्हती व म्हणून मी त्याबद्दल फारसे बोललो नाहीं. एकादवेळेस सांगून पाहूं असा मी माझ्या मनांत बेत केला.

" मधु, चल, मला जाऊं दे पाहूं ! " मी त्याच्या पाठीवर थापा देत म्हणालो.

" काका ? मी येऊं का तुमच्याबरोबर ? "

" कशाला ? " आजच त्यानें वरील प्रश्न विचारल्यामुळें आश्चर्य वाटून मी म्हणालो.

" खेळायला ? "

" खेळायला ? कोणाशीं खेळायला बाळ ? " मी म्हणालो.

" कोणाशीं बरं ? " पुढचें उत्तर देतां न आल्यामुळें तो गोंधळलेल्या मुद्रेनें आपले डोळे विस्तीर्ण करून म्हणाला व त्याच्या आजीनें हांक मारल्यामुळें धांवत गेला. शंकरराव मला म्हणाला.

" खरोखरी, चिंतामणी, तुझ्या पित्याच्या इच्छेप्रमाणे तूं जर कधींच लग्न केलें असतें तर आज तुला मधुएवढा मुलगा नसता काय ? अजून तरी लग्न करण्याचें तुझ्या मनांत आहे कां नाहीं ? "

मी खिन्नपणें हंसून म्हणालों. " शंकरराव, माझा सर्व इतिहास तूं जाणतोस. भाऊंच्या इच्छेवरून मी त्याच वेळेला लग्न केले असतें, परंतु पुढचें भविष्य मला माहित नव्हतें. भाऊ आतांच जातील असें मला वाटत नव्हतें व माझी मनःस्थिति त्यावेळीं तशी नव्हती. माझ्यावर एका मागून एक असें चमत्कारिक प्रसंग येऊन गेले कीं, मला अद्याप-पर्यंत तो विचार करण्याला वांव मिळाला नाहीं व मला त्याची एवढी अवश्यकता भासली नाहीं. परंतु—" माझें वाक्य पुरें होण्यापूर्वींच शंकररावाकडे त्याच्या कामासंबंधीं कोणी गृहस्थ आले व माझें बोलणें तितकेंच राहिलें. थोड्या वेळानें मी तेथून घरीं जाण्यास निघालों, पण माझी स्थिति चमत्कारिक झाली होती. ते दिवशीं सबंद रात्र मला झोंप आली नाहीं. मला असें कां होतें याचे कारण माझ्या लक्षांत येईना !

अलीकडे नित्य नेमानें सकाळीं अगर संध्याकाळीं मी शंकररावाकडे जाऊं लागलों. एकादी अज्ञात आकर्षण शक्ति मला तिकडे ओढून नेत होती. माझ्या मनां-तली गुप्त गोष्ट मी गुप्त ठेवण्याचा प्रयत्न करीत नाहीं. ती आकर्षण शक्ति दुसरी कोणी नसून मधुरीच होती, हें कोणीहि ताडूं शकेल. मधुरी माझ्यापेक्षां पुष्कळच लहान होती, मी सर्वथैव तिला अयोग्य आहे असें असूनहि तिच्याचकडे माझें मन ओढ घेत होतें. मला जर संसारांत सुख मिळेल तर मधुरीच्या हातूनच मिळेल असें मला वाटत होतें. मधुरीनें परीक्षा दिली होती. त्यानंतर तीं कांहीं दिवस शंकररावाकडे राहणार होती. खरें पाहिलें असतां तिची परीक्षा पूर्वींच व्हावयाला पाहिजे होती. परंतु एक वर्षीं ती फार आजारी असल्यामुळें तिचें वर्ष तितकें लांबलें होतें. नाहीं तर मी यूरोपला असतांच तिची परीक्षा होऊन लग्नहि होऊन गेलें असतें. परंतु तिची व माझी भेट व्हावयाची होती असा ईश्वरी नेमानेम असेल ! तिचा जाण्याचा दिवस आतां दोन दिवसावर येऊन ठेपला होता, परंतु जी गोष्ट बोलावी म्हणून मी रोज बेत करीत असे ती बोलावयास गेलो असतां शब्द आंतल्या आंतच जिरून जात. पहिल्या दिवसाप्रमाणें मला न लाजतां नैसर्गिक स्त्रीस्वभावाला भूषण अशा विनयशीलपणानें मधुरी आतां माझ्याशीं बोलूं लागली होती. नांवाप्रमाणें तिच्या स्वभावांतली खरोखरीच माधुरी पाहून मी अधिकाधिकच मधुर रसांत लीन होऊं लागलो होतो. ती परवा नक्की

जाणार असें मला कळलें होतें. आतां सारी लाजलज्जा गुंडाळून शंकररावाजवळ आपल्या मनांतली गोष्ट बोलावी असा मी निश्चय केला.

शंकरराव, मी व मधुरी असें आम्ही तिघे बोलत बसलों होतों, प्रथम शंकररावानेंच गोष्ट काढली. " चिंतामणी, ते दिवशीं तूं जें कांहीं बोलणार होतास तें अपुरेंच राहिलें व त्यानंतर त्याबद्दल तुला विचारीन म्हणून मी म्हणत होतो, पण मलाहि आठवण राहिली नाहीं. हं काय तूं म्हणत होतास ? "

" कशाविषयीं ? " मध्येंच मधुरीनें प्रश्न केला.

" चिंतामणीला माहित आहे, नाहीं कां चिंतामणी ? हो; तुझ्या लग्नाविषयींच आपण बोलत होतो नाहीं कां ? आणि तूंहि चिंतामणीनें अजून लग्न कां केलें नाहीं म्हणून विचारीत होतीस. तोच सांगेल त्याचें कारण. " बिचारी मधुरी ओशाळून दुसरीकडे पाहूं लागली. तो तिच्याकडे व नंतर माझ्याकडे पाहून हंसूं लागला. आतां ही संधी बरी आहे असा विचार करून मी लागलाच म्हणालो.

" होय, शंकरराव, मी लग्न करावें असें तुझें म्हणणें आहे, आणि इतक्या दिवस माझ्या डोक्यांत तो विचार येत नव्हता, पण अलीकडे येऊं लागला आहे. तुमच्या घरच्या सर्वांची संमति असेल व तुम्ही सर्व कबूल असाल तर—"

" पण, आमच्या संमतीची तुला काय जरूर आहे ? तूं लग्नाला उभा राहीलास तर आमच्यानें नाहीं म्हणवेल कां ? " असें म्हणून तो हंसूं लागला.

" शंकरराव, एकाच व्यक्तीचें कधीं लग्न होत नसतें. हें तूं कबूल करशील. "

" मग ही दुसरी व्यक्ति कोण तूं शोधून काढली आहेस हें मला कसें कळावें ? " तो थट्टेच्या स्वरांत म्हणाला.

" शंकरराव, हा थट्टेचा विषय नव्हे, माझ्यासारख्या प्रौढ गृहस्थाला आपली मुलगी द्यायला मधुरीचे वडिल कबूल होतील काय ? " त्यावर शंकरराव एकसारखा खो खो हंसत सुटला. माझ्या या वाक्यानें चटकन् आपले नीलनेत्र माझ्या मुखावर एक क्षण रोखून मधुरीनें आपलें मुख खालीं केलें. तिचें मुख आरक्त झालें होतें.

" ओहो ! आपला डोळा मधुरीवर आहे वाटतें ? मग तो प्रश्न तुम्ही दोघेच सोडवा म्हणजे झालें, " असें म्हणून तो तथून जावयास उठला, मी त्याचा हात धरून त्याला बसवीत म्हणालो.

" हें बघ शंकरराव, एके काळीं मी चांगला मनुष्य होतों, परंतु आतांहि तसाच आहे असा मधुरीचा समज असल्यास ती माझें म्हणणें कबूल करणार नाहीं कां ? "

" काय मधुरी ? याचें उत्तर तूंच दे पाहूं ! " ती कांहींच बोलली नाहीं, माझ्या- पुढें एक वक्र दृष्टीपात करून मधुर हंसत ती आंत निघून गेली तिच्या मौनानें व मौनकृतीनें मला माझ्या हेतूविषयीं आशा उत्पन्न झाली, त्यानंतर शंकररावाचें व माझें त्यासंबंधीं बराच वेळ संभाषण झालें. शंकरराव मला म्हणाला मधुरी येथें आल्यापासून तूं नित्य-

नियमानें आमच्या येथें कां येतोस याचें कारण मीं कधींच ताडलें आहे. मधुरीहि तुझ्या अद्यापपर्यंतच्या अविवाहितपणाविषयीं चौकशी करीत होती. त्याबद्दल मी तिची थट्टा करतां तिलाहि ही गोष्ट पसंत आहे असें दिसतें. खचित चिंतामणी, तुझ्यासारखा जांवई मिळाल्यानें ताईला आणि मधुरीच्या वडिलांना आनंद वाटेल. तूं लग्न करावेंस असें माझ्या कधींपासून मनांत आहे. शिवाय आमच्या मधुरीशीं तुझें लग्न झालें तर दुधांत साखर पडल्यासारखें होईल."

मी आज घरीं अगदीं आनंदात जात होतों. किती दिवसांनीं तरी आज मला माझ्या आयुष्याच्या सुखदायी कल्पनेनें आनंद वाटत होता. मधुरीला तिच्या पित्याकडे न पाठविता शंकररावानें त्यांना सर्व हकीकत कळविली व माझ्या वयाकडे न पाहतां ती गोष्ट त्यांनीं ताबडतोब मान्य केली व आम्ही लग्नाच्या तयारीनें तेथें येतो म्हणून कळविलें. आतां ती गोष्ट गुप्त राहिली नव्हती, माझें लग्न होणार म्हणून शेटसाहेब व त्यांच्या पत्नी बाबूराव वगैरेला आनंद वाटला. भिमाच्या आनंदाला तर पारावारच नव्हता!

ठरल्याप्रमाणें आमचा विवाह फारसा गाजावाजा न होतां अगदीं साध्या रीतीनें पार पडला. शेट साहेबांना धामधूम करावयाची पुष्कळ इच्छा होती, परंतु ती गोष्ट मी नम्रपणानें नाकारली. बाबूरावाचाहि विवाह सुशीलेशीं तेव्हांच झाला. माझ्या आयुष्याच्या संस्मरणीय प्रसंगीं माझ्या वडिलांची व माझ्या नाहींशा झालेल्या प्रेमळ मित्राची आठवण होऊन मला कसेंसेंच होऊन गेलें! आज भाऊंना केवढा आनंद झाला असता! बाळासाहेबाला किती आनंद झाला असता व त्यानें माझी किती थट्टा केली असती? बाळासाहेबाची ती सदा आनंदी व सहास्यमुद्रा अंतर्दृष्टीपुढें तरंगू लागून बहिर्दृष्टि अंध झाली.

———:o:———

## स्मृति पस्तीसावी.

# पश्चात्तापाचे अश्रू.



माझें लग्न होऊन वर्ष दीड वर्ष झालें होतें. मी आतां बँकेंत मॅनेजर झालों होतो व आतां मला दरमहा दोन अडीच हजार रुपये पगार होता. आम्ही मोठमोठ्या शहरीं आमच्या बँकेच्या शाखा स्थापन केल्या होत्या व आमच्याविषयीं लोकांचा चांगला ग्रह असून आम्ही ठेवी बुडविणार नाही असा विश्वास उत्पन्न झाला होता. सचोटीनें लोकांच्या पैशाचा उपयोग करून त्याचा त्यांनाहि फायदा द्यावयाचा हा आमचा मुख्य उद्देश होता. आतां मला पैशाची मुळींच अडचण नव्हती. माझ्या वडिलांनींहि मला बऱ्याच संपत्तिचा मालक करून ठेविलें होतें. मी आतां महालक्ष्मीवर बाळासाहेबाच्या बंगल्यापासून थोड्या अंतरावर एक लहानसा बंगला बांधून माझ्या पत्नीसह राहत होतो. हेतु हा कीं बाळासाहेब जर कदाचित कधीं

स्वतःच्या जुन्या बंगल्यांत आला तर त्याची भेट व्हावी. परंतु अद्यापपर्यंत तसा योग जुळून आला नव्हता व येईल असें चिन्ह दिसत नव्हतें. त्याची आठवण अद्याप ताजीच होती व मी जीवंत असें पर्यंत त्याला विसरणें शक्य नव्हतें. तो केव्हां तरी भेटेल या आशेवर मी त्याची रोज वाट पाहत होतो. मोहनलाल आय्, सी. एस्. होऊन आला होता. व तो नुक्ताच आपल्या मातापित्यासह मद्रासच्या बाजूला गेला होता. एकंदर पाहतां मला आतां कोणत्याच गोष्टीची कमतरता नव्हती. गृहसौख्याच्या बाबतींत माझ्यासारखा सुखी कोणीच नव्हता. मी माझ्या पत्नीचें नांव माझ्या आजीचें 'स्वरस्वती' होतें तेंच ठेविलें होतें. परंतु मी तिला तिच्या बालपणाच्या मधुरी या नांवानेंच संबोधित असे. मधुरीसारख्या सुशिक्षित सुगृहीणी व सुशील पत्नीच्या सहवासांत काल किती भराभर जात होता याचें मला स्मरण होत नव्हतें. परंतु माझें गृहसौख्य पहावयाला माझे वडील हयांत नव्हते म्हणून मला केव्हां केव्हां खेद होत असे. बाळासाहेबची आठवण मला माझ्या वडिलांच्या आठवणीपेक्षां तीव्रतर भासत होती. त्याचा अद्यापपर्यंत पत्ता नव्हता व त्यामुळें आठवण झाली कीं मनाला उद्विग्नता प्राप्त होई.

एके दिवशीं सायंकाळच्या सुमारास मी ऑफिसमधून आल्यानंतर खालीच असलेल्या माझ्या बैठकीच्या खोलींत एका आरामखर्चीवर मधुरीनें दिलेला गरम चहा नुकताच संपवून धूम्रपान करीत व धुराच्या होणाऱ्या चित्रविचित्र आकृत्यांकडे पहात पडलो होतो. पावसाळा जवळ आल्यामुळें, केव्हां केव्हां झंझावात सुटून दिशा अगदीं मदोन्मत्ताप्रमाणें भासत होत्या. कधींहि निस्तेज न होणाऱ्या सूर्यनारायणावर त्याच्या तेजाचा उत्कर्ष न साहून, काळेकुट्ट निर्जल ढग मधून मधून येऊन आपल्या कृष्णवर्णाच्या पडद्याखाली त्याचीं प्रखर किरणें झांकून टाकण्याचा यत्न करीत होतें. खिडकीपासून कांहीं अंतरावर बसून क्षणांत उजेड व क्षणात अंधुक प्रकाश मी शून्यपणें पहात होतो. सूर्यप्रकाशाला झाकून टाकण्याचा प्रयत्न ज्याप्रमाणें काळे ढग करीत आहेत व तो त्यांचा उद्देश केव्हां सिद्धीस जात आहे व केव्हां फोल होत आहे हें मनांत येऊन मला माझ्या मित्राची आठवण झाली. तो असाच कृष्णवर्णी ढगाच्या पडद्याखालीं अदृश्य झाला होता. असे विचार माझ्या मनांत चालले होते. मधुरी माझ्यामागें केव्हांची येऊन उभी राहिली होती, हें मला मुळींच कळलें नाहीं. तिच्याकडे माझें लक्ष नाहीं हें जाणून, माझें लक्ष आपल्याकडे वेधावे म्हणून आतां ती पुढें येऊन आरामखुर्चीच्या हातावर बसून माझ्याकडे हास्यपूर्वक पाहूं लागली. आतां माझेंहि लक्ष तिच्याकडे गेले, परंतु तिच्याशीं हास्यविनोद करण्याच्या मनःस्थितींत आज मी नव्हतो.

"कसला एवढा गहन विचार चालला आहे? मी केव्हांपासून तरी उभी आहे. अशीं नादीं माणसं मी कधीं पाहिली नव्हतीं." हंसत हंसत मधुरी म्हणाली.

"मधुरी—

" छे; अद्यापहि या बालिश नांवानें हांक मारायला मी कांहीं लहान नाहीं."

" परंतु तुझ्यात व माझ्यांत दुप्पट अंतर आहे ? "

" हो. " मानेला एक हिसडा देऊन ती म्हणाली. " मी अगदीं पांच वर्षांचं बाळ आहे वाटतं आतां ? "

" मग मी दहा वर्षांचा कां आहे ? " मी किंचित हंसून म्हणालो.

" बरं, तें राह्यलं, पण आज केव्हांपासून कसल्या विचारांत आहांत ? "

" मधुरी, माझा प्रियमित्र बाळासाहेब अशा चमत्कारिकरीतीनें नाहींसा झाला त्याची आज मला आठवण झाली. " मी दीर्घश्वास सोडून म्हणालो. त्यानंतर त्याच्याच संबंधानें आमचें बराच वेळ संभाषण चाललें होतें. बाळासाहेबाबद्दल मधुरीलाही फार हळहळ वाटत असे. कॉलेजमध्यें असतांना बाळासाहेब एकएक ज्या गमती करीत असे, ती हकीकत मी सांगू लागलो म्हणजे मधुरीला फार मौज वाटून हंसूं येत असें. परंतु लागलेंच त्याच्या कुटुंबांच्या मंडळीचा अशारीतीनें शेवट होणें व त्यांचें असें गुप्तपणें अदृश्य होणें, याचें स्मरण होऊन तिच्या नेत्रांत अश्रू येत. माझीहि चमत्कारिक स्थिति होऊन जात असें. आमचा एक गडी दाराजवळ येऊन म्हणाला.

" शेट, कुनी आलं हाय भेटाया. "

" कोण आहे, ? जा, घेऊन ये येथें, " मी जरा आश्चर्यानें म्हणालो. कोण बरें असावें; शंकरराव किंवा बाबूराव तर नाहींच. ते असते तर थेट आंत आले असते. कोणी तरी परके असावें हें जाणून मधुरी आत जाऊं लागली. मी दाराकडे वळून पाहूं लागलो. एक अगदीं कृश अनोळखी व्यक्ति दाराच्या आंत पाऊल घालतांनां माझ्या दृष्टीस पडली. शरीरावरील कपडे अगदीं फाटून गेलेले आहेत, बऱ्याच दिवसांत वस्तरा न फिरविल्यामुळें डोक्याचे व दाढीचे केंस बेसुमार वाढले आहेत, डोळे निस्तेज व खोल गेलेले आहेत, गालफडे बसून त्यांचीं हाडें बाहेर पडलीं आहेत, चेहरा अगदीं काळवंडून गेला आहे, अशक्ततेमुळें पाय थरथर कांपत असल्यानें दाराच्या एका फळीच्या आधारानें उभा राहून तो अनोळखी गृहस्थ माझ्याकडे पाहूं लागला. या गृहस्थाचें माझ्याकडे काय काम असावें बरें, हें न कळून मी जागेवरून दोन पावलें पुढें येऊन म्हणालो. " माझ्याकडे आपलें काय काम आहे ? " माझ्याकडे स्थिरपणें पहात असलेल्या त्या गृहस्थानें आपली दृष्टी खालीं केली, त्याच्या डोळ्यांतून अश्रुबिंदू टपटप खालीं गळत होते. मीहि त्याच्याकडे निश्चलपणानें पहात राहिलों. क्षणभर थांबून मी म्हणालो.

" या, आपण या खुर्चीवर बसा. नंतर आपल्याला जें बोलायचें असेल तें बोलूं. " मला त्याची ती दैन्यवाणी स्थिति पाहून वाईट वाटत होतें. त्यानें एकवेळ माझ्याकडे दृष्टिपात करून पुनः आपली दृष्टी जमिनीकडे केली. घोगऱ्या स्वरांत तो म्हणाला.

" तूं मला ओळखलें नाहींस काय ! " अकस्मात वज्रप्रहार मस्तकावर पडल्या सारखा मी आश्चर्यचकित झालों !

" कोण ? बाळासाहेब ? " म्हणून मी धांवत जाऊन बऱ्याच काल गुप्त झालेल्या माझ्या प्रियमित्राला दृढ आलिंगन दिलें ! माझा मित्र फार वर्षांनें भेटल्यामुळें मला वर्णनातीत हर्ष झाला होता; आणि त्याची ती त्यावेळची कंगाल व दुःखी स्थिति पाहून तेवढेंच दुःख झालें ! कांहीं वर्षांपूर्वी तो जेव्हां इंग्लन्डांत जावयास निघाला तेव्हां तो कसा होता व आज तो मला कोणत्या स्थितींत भेटत आहे ? त्यावेळीं तो एकाद्या ऐश्वर्यशाली सरदारपुत्राप्रमाणे दिसत होता, तर तोच आज एखाद्या भणंग भिकाऱ्यासारखा दिसत होता; त्याची ती काळजीनें व दुःखानें जर्जर झालेली काया पाहून माझा आत्मा पिळवटून जात होता. किती वेळ तरी आम्ही दोघे निश्चल दगडासारखे उभे होतों; त्यानें माझ्या स्कंद्यावर आपलें दुःखी मस्तक ठेवून एकसारखा अश्रुवर्षाव चालविला होता. माझ्याहि अंतःकरणाला असह्य वेदना होत होत्या. मी निस्तब्धपणानें त्याला एका खुर्चीवर बसविलें व मीहि अगदीं त्याच्याजवळ बसलों. तो आपल्या दोन्हीं हातांनीं आपलें तोंड झांकून लहान बालकाप्रमाणें रडत होता. अश्रुवर्षावानें त्याचे हृदय हलकें होऊं देणेंच त्यावेळीं अवश्य होतें. माझ्या तोंडून माझ्या मित्राच्या नांवाचा उच्चार होतांच आंत जात असलेली मधुरी दाराआड आश्चर्यानें थबकून जागच्याजागीं उभी होती. बराच वेळपर्यंत आम्ही कांहींच बोललों नाहीं. " हाय ! चिंतामणी ! अखेर माझ्या बाबांच्या मरणाला मीच चांडाळ कारण झालों ना ? " हृदयाला पिळ पडतील अशा रीतीनें तो म्हणाला. मी त्याचा एक हात हातांत धरून व दुसरा त्याच्या खांद्यावर ठेवून म्हणालों.

" बाळासाहेब ! तुला बापुसाहेबांच्या निधनाची बातमी कळली तर ? " गहिंवर आल्यामुळें माझ्या तोंडून धड उच्चार होईना.

" चिंतामणी ! माझ्या प्रेमळ पित्याच्या आणि–आणि कांहीं अंशीं सगुणेच्या मृत्यूला मीच अधम कारण झालों आहे. माझ्या बाबांचे माझ्यावर किती निरातिशय प्रेम होतें, हें मला माहित असून मी कसा अविचारी बनलों ! हाय ! हाय ! मी दुष्ट, मी पातकी ! स्वतःच्या बापाचा खून करणारा, माझ्यासारखा नराधम साऱ्या जगांत एक तरी असेल काय ? चिंतामणी, तूंसुद्धां माझा तिरस्कारच करशील ! "

" मी, बाळासाहेब, तुझा मी तिरस्कार कधीं तरी करीन काय ? "

' अरेरे, चिंतामणी, मी किती दुर्दैवी, माझ्या बाबांची क्षमा मागण्याचा देखील मला अवकाश मिळाला नाहीं. बाबांचा मृत्यु कोणत्या कारणानें झाला ही हकीकत जेव्हां माझ्या कानावर आली, तेव्हां मला किती भयंकर पश्चात्ताप झाला म्हणून सांगू ? ज्यांनीं माझ्या सुखासाठीं आपल्या सुखाकडे, श्रमाकडे आणि पैशाकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं, त्या माझ्या प्रेमळ पित्याला अखेरीस माझ्यासारख्या अधमाधम व निर्दय

पुत्राकडून फार उत्तम मोबदला मिळाला! काय करूं! पश्चात्तापानें माझें काळिज होरपळून जात आहे. मला इंग्लंडला पाठविण्याची बाबांची बिलकुल मर्जी नसतां, मी हट्टानें त्यांची मर्जी मोडून गेलो. खरोखरीच मी गेलो नसतो तर किती चांगलें झालें असतें? हाय! हाय! बाबा, बाबा!! तुम्ही तुमच्या या पातकी, अधम पुत्राला क्षमा कराल काय?" असें म्हणून त्यानें आपलें मस्तक हातांनीं घट्ट दाबून टेबलावर ठेवलें, पुनः तो ओक्साबोक्शी रडूं लागला.

"बाळासाहेब, काय हें? झालेली गोष्ट पुनः कधीं तरी परत येणार आहे काय? आतां तूं कितीहि शोक केलास तरी स्वर्गी गेलेलीं माणसें परत येणार आहेत काय?" मोठ्या कष्टानें मी म्हणालो. सगुणेनेंहि आपल्या जीवाचें कांहीं तरी बरें वाईट करून घेतलें असलें पाहिजे. नव्हे तिनें आत्मत्याग केला असावा अशी माझी खात्री झाली होती.

"अरेरे! काय करूं? मला हें दुःख सहन होत नाहीं रे! बाबांना माझ्यापासून दुःख होण्यापेक्षां ते निपुत्रीक असते तरी फार चांगलें झालें असतें. माझ्यासारख्या स्वार्थी, व निष्ठुर पुत्रापासून सुख होण्याऐवजीं त्यांना अतीशय दुःखच झाले! बाबांनीं जें माझे लाड करून मला लहानचा मोठा केला; एखाद्या राजपुत्रासारखा ऐश्वर्यांत मला सदोदित ठेविला, त्यांना मी काय सुख दिलें? आठवण झाली कीं माझें हृदय विदीर्ण होऊन जातें. आज पांचसहा वर्षें माझ्या पापाचें प्रायाश्चित भोगण्यासाठीं मी एकसारखा भटकत आहे, परंतु माझ्या मनाला कोठेंहि घटकाभर बरें वाटत नाहीं. काय केलें असतां मला योग्य प्रायाश्चित्त मिळेल? बाबांच्या भेटीला लवकर जावें म्हणून मी माझ्या स्वतःची मुळींच काळजी घेतली नाहीं. पण छे! माझ्यासारख्या महापातक्याला स्वर्गाचीं दारें तरी कशीं उघडणार? मरण यावें म्हणून मी यत्न करीत असतां मला भिऊनच कीं काय मरणसुद्धां माझ्यापासून दूरदूर पळत आहे. माझें मस्तक फुटत कां नाहीं, माझ्या हृदयाचे तुकडे कां होत नाहींत? पाषाणापेक्षांहि माझें हृदय कठोर आहे," बोलण्याच्या अतिश्रमानें आतां त्याला मूर्च्छा आली होती. मी मधुरीला बाहेर बोलाविलें; तिच्या साहाय्यानें मी त्याला जवळच्या एका कोचावर निजविला. थंड पाणी आणून त्याच्या तोंडावर शिंपडलें व थोडें त्याच्या तोंडांतही घातलें. मी हताशपणानें त्याच्या मुखाकडे एकाग्रदृष्टी लावून पहात बसलो होतो. अरेरे! एके काळीं ज्या माझ्या प्रिय मित्राचें मुख आनंदानें प्रफुल्ल दिसत असें व ज्याला दुःख म्हणजे काय याची मुळींच कल्पना नव्हती; त्याच माझ्या मित्राला आज किती असह्य दुःख भोगावें लागत आहे? ज्याचा चेहरा पाहिला असतां त्याच्या वरून आपली दृष्टी काढूं नये असें वाटत असें? ज्याच्या ओठावरचें मधुर स्मित कधींहि ढळलें नाहीं, त्याची आज कोण ही चमत्कारिक स्थिती झाली आहे? तो जेव्हां विलायतेस गेला, तेव्हां तो पुढें मला अशा रीतीनें भेटेल असें कोणी भविष्य केलें असतें तर मला तें खरें वाटलें असतें काय? तो बॅरिस्टर होऊन आला म्हणजे आपण त्याचें असें

असें स्वागत करूं म्हणून मी माझ्या मनांत त्यावेळीं किती तरी बेत केले होते. क्षणभरानें त्यानें डोळे उघडून माझ्याकडे पाहिलें. माझा हात आपल्या हातांत धरून तो सद्‌गदित अंतःकरणानें म्हणाला.

" चिंतामणी, माझ्या दुर्दैवाची कहाणी तुला सांगावी म्हणून मी आज तुझ्याकडे आलों आहे! माझें भाराक्रांत हृदय तुझ्याजवळ उघडें करून त्याचा भार हलका करावा म्हणून अखेरीस अखेरचा मी तुझ्याकडे आलो!" दुःखपूर्ण दीर्घ निःश्वास सोडून तो म्हणाला, " चिंतामणी! अशा स्थितींत जगण्याची मला मुळींच इच्छा नाहीं. माझ्या सर्व इच्छा, आशा व सुखकल्पना पार जळून खाक झाल्या आहेत. आतां सुखाची मला मुळींच जरूर नाहीं. फक्त तुला एकदा तरी भेटावें म्हणूनच मी आलो. माझ्यावर तुझें किती प्रेम आहे हें जाणून तुझी भेट व्हावी अशी मला अनिवार इच्छा उत्पन्न झाली! आतां लवकरच मृत्यूनें मला आपल्या छत्राखालीं घ्यावें, अशी माझी अंतःकरणपूर्वक इच्छा आहे." इतकें बोलून तो स्तब्ध राहिला. त्याच्या नेत्रांतून अविरल अश्रुप्रवाह चाललाच होता. त्याचें तें निराशापूर्ण भाषण ऐकून मला फार गहिंवर आला व त्यामुळे क्षणभर मला बोलवेना! तितक्यांत मधुरीनें आणलेला चहा मी फार आग्रहानें त्याला प्यावयास लाविला व तो जरा शांत झाल्यावर मी म्हणालों.

" बाळासाहेब, तूं या पूर्वीच कां नाहीं आलास? तुझें स्वागत करायला मी नेहमीं तयार आहे. तुझी भेट व्हावी म्हणून मी एकसारखा आज इतकीं वर्षें वाट पहात आहे. तुझा शोध करून निराश झाल्यामुळेंच मी स्वस्थ बसून राहिलो आहे. सांग, तूं इतके दिवस कोठें होतास? तुझा युरोपमध्यें सुद्धां मला पत्ता लागला नाहीं. तुझा शोध लागावा म्हणून मी माझ्याकडून परकाष्टा केली. पण व्यर्थ. कोठें होतास तूं!"

" मी पांचसहा वर्षांपासून हिंदुस्थानांतच आहे," दीर्घ सुस्कारा सोडून तो म्हणाला. " चिंतामणी, माझ्यासाठीं तूं यूरोपाला सुद्धां जाऊन आलास काय? अरे! तुम्ही या हतभाग्यावर एवढें कां प्रेम करतां? मी त्या प्रेमाला अगदीं अपात्र आहे,"

" बाळासाहेब, तूं असा वैतागूं नकोस. प्रेम सांगून कां कोणी कोणावर करीत असतें, हिंदुस्थानांत असून तूं मला कसा भेटला नाहींस? आणि कोठें होतास?" पांच सहा वर्षें तो हिंदुस्थानांतच होता हें ऐकून मला आश्चर्य वाटलें.

" हाय!" दुःखानें तो म्हणाला. माझ्या बाबांचा दुःखपूर्ण शेवट झालेला कळून मी येथें आलो; तुम्हांला कोणाला न कळवितां मी मुकाट्यानें सर्व तपास केला व माझ्या बाबांना आणि सगुणा नाहींशी होऊन मृत व्हायला मीच कठोरहृदयी चांडाळ कारण आहे, हें समजतांच मला इतका वैताग आला कीं मी येथून एकदम निघून गेलो. मला माझ्या जीवाचा अतिशय संताप आला, सर्व बाजूनें माझी अगदीं निराशाच

झाल्यामुळें आत्महत्या करायलासुद्धां मी सिद्ध झालों, परंतु दोन जीवांच्या नाशाला मी पातकी कारण झालो असल्यामुळें, मला माझ्या पापाचें चांगलेंच कडकडीत प्रायश्चित्त भोगलें पाहिजे असा विचार दुसऱ्या क्षणींच माझ्या मनांत आला. या माझ्या देहां-करितांच बाबांनीं व सगुणेनें देहत्याग केला होता. या देहाला सुख भोगायला मिळावें म्हणून माझा सारा प्रयत्न होता.तेव्हां आपल्या या देहाला अतिशय कष्ट देऊन देहदंडानें आपल्या पापाचें अल्पसें तरी क्षालन करावें असा निश्चय करून आत्महत्त्या न करतां मी हरिद्वारकडे निघून गेलों व तेव्हांपासून पायींच प्रवास करायचा बेत करून ठिक-ठिकाणचीं तीर्थें, क्षेत्रें पहात भटकूं लागलों. ऊन, वारा, पाऊस, किंवा थंडी यांपासून माझ्या शरीराचें संरक्षण करण्याचें मी सोडून दिलें! दिवसभर चाल, चाल, चालावें. फार थकवा आला म्हणजे कोठें तरी जागा मिळेल तेथें देह टाकावा, जें कांहीं मिळेल तें खावें. नाहीं तर दोन दोन दिवस उपास काढावें व नित्य नियमानें बाबांची व सगुणेची आठवण करून पश्चात्तापानें पोळलेल्या हृदयाचें पाणी डोळ्यावाटे काढावें, हाच उद्योग मी आज इतकीं वर्षें करीत आलों आहे. परंतु मला एकहि दिवस समा-धान वाटलें नाहीं; व शांतपणें कधींच निद्रा आली नाहीं! माझ्याजवळून जाऊं नको म्हणून विनवीत असलेली बाबांची ती मुद्रा क्षणोक्षणीं माझ्या अंतःचक्षुपुढें उभी रहात आहे! अरे देवा! माझ्या पापाचें क्षालन कसें होईल?" हताशपणानें हृदयावर हात मारून तो पुढें म्हणाला, "तसेंच त्या कोमल हृदयी सगुणेची स्मृति झाली कीं, माझ्या सर्वांगाला कंप सुटतो; तिच्याहि आयुष्याची दुर्दशा मीच केली आहे. माझ्या-साठीं तिनें किती अविश्रांत कष्ट केले आहेत? माझ्यावर तिचें किती प्रेम होतें? तिच्या प्रेमाची किंमत मला पूर्वी कळली नव्हती, परंतु आतां कळून काय उपयोग? माझ्या-कडून त्याचें चांगलें चीज झालें नाहीं.!" पुनः वर छताकडे पाहून तो कांहीं वेळ ऊष्ण श्वासोच्छ्वास सोडीत स्तब्ध राहिला. त्याचें कोणत्या शब्दानें समाधान करावें, याचें मला गूढ पडलें होतें. कशानें तरी समाधान होण्यासारखी त्याची स्थिति होती काय? त्याच्या एकंदर भाषणावरून खरोखरींच त्याच्या हातून कांहीं तरी घोर अपराध झाला असावा अशी हळूहळु माझी खात्री होऊं लागली. परंतु पुरी खात्री व्हावी म्हणून मी हलकेंच म्हणालों.

"बाळासाहेब, तूं इंग्लंडला गेल्यानंतर सुमारें दीड वर्षांनीं एका अनोळखी गृह-स्थाचें पत्र आलें होतें, त्यांतल्या मजकुरानेंच तुझ्या वडिलांची चमत्कारिक स्थिति होऊन अखेर त्यांचा शेवट झाला! तुझें चांगलें न पाहणारा तुझा तेथें एकादा शत्रु असावा व त्यानेंच हें सर्व कपटनाटक रचलें असावें असें मला वाटतें."

"अद्यापि तें पत्र तुझ्याजवळ आहे काय?" तो उतावीळपणानें म्हणाला. तें पत्र सगुणेनें दिलें तेव्हांपासून माझ्याच जवळ होतें. तें पत्र मी जपून ठेविलें होतें, त्यापासून कदाचित् खरें काय असावें हें कळण्याची मला आशा वाटत होती. एका टेबलाच्या खणांतून तें घातकी पत्र काढून मी बाळासाहेबाजवळ घेऊन आलों व

त्याच्या हातांत दिलें. त्या पत्रावरून दृष्टि फिरवितांच तो आश्चर्यचकित मुद्रेनें त्या पत्राकडे व माझ्याकडे पाहूं लागला.

" काय म्हणतोस ? या पत्रामुळें बाबांच्या हृदयाला धक्का बसला ! " त्याचे हात थरथर कांपत होते व तें पत्र त्याच्या हातांतून गळून पडलें.

" होय, बाळासाहेब ! हेंच तें घातकी पत्र, माझी खात्री आहे, यांतलें तुझ्या-वरचे आरोप अगदीं खोटे आहेत, आणि तुझ्या वडिलांनाहि मी तसें सांगून पाहिलें ! पण त्यांचा या पत्रावर भरंवसा बसला तो बसलाच. " मी म्हणालों. त्यावर बाळा-साहेब क्षणभर कांहींच बोलला नाहीं. अखेरीस माझी अटकळ खरी होणार असें मला वाटूं लागलें. बाळासाहेबाच्या हातून पत्रांत दर्शविल्याप्रमाणें कोणतेंच कृत्य घडलें नसेल असें मला वाटूं लागलें. बाळासाहेब आतां दोन्हीं हातांनीं तोंड झाकून रुदन करूं लागला, तो म्हणाला.

" चिंतामणी, मी जर पातकी असलो तर या पश्चात्तापाच्या अश्रूंनीं माझ्या पापाचें क्षालन होणार नाहीं काय ? बाबा व सगुणा यांच्या मृत्यूला मी कारण झालो असून तें भयंकर पातक माझ्या माथीं लागलें आहे अशी माझी दृढ समजूत आहे, तर तें पाप माझ्या या पश्चात्तापानें पोळलेल्या हृदयाच्या ज्वालेनें तावून निर्मूल होणार नाहीं कां ? मी आज इतकीं वर्षें मानसिक व शारीरिक भयंकर यातना भोगीत आहे, तर माझ्या पापाचें परिमार्जन होणार नाहीं कां ? "

" बाळासाहेब, आपल्या शास्त्रांत पाप्याला खऱ्या पश्चात्तापासारखें दुसरें प्रायश्चित्त नाहीं म्हणून म्हटलें आहे, तेव्हां तुझ्या हातून खरोखरीच एखादें जर पातक झालें अशीं तुझी खात्री असली, तूं इतकी वर्षें भयंकर हालअपेष्टा भोगून पश्चा-त्तापानें आपल्या शरीराला व मनाला दंड केला आहेस तर तुझें कितीहि मोठें पातक जरी असलें तरी तें तुझ्या या घोर तपश्चर्येनें जळून खाक झालें असलेंच पाहिजे. तूं आतां विनाकारण आपल्या जीवाला अधिक कष्टवूं नको. पुण्यात्मे स्वर्गात जातात हीं आपली समजूत खरी असली तर तुला होत असलेले क्लेश पाहून बापुसाहेबांच्या आत्म्याला फार वाईट वाटत असेल; म्हणून म्हणतो आतां हा शोक पुरा कर."

" चिंतामणी, मला माझ्या पापाचा पाढा तुला एकदां सांगूं दे, तेव्हां मला थोडी तरी शांती वाटेल व बाबा जर स्वर्गातून माझ्याकडे पहात असतील तर मी त्यांची करुणा भाकून अंशतः तरी माझ्या पापाचें क्षालन करून घेईन ! "

---

## स्मृति छत्तीसावी.

# बाळासाहेबाची हकीकत



बाळासाहेबानें त्या खालीं पडलेल्या पत्राकडे एकवार खिन्नपणें पाहून नंतर म्हटलें " नाहीं चिंतामणी, या पत्रांतील सर्व आरोप खोटे नाहींत ! अरे रे !! " असें

म्हणून पुनः त्यानें आपलें डोकें जोरानें घट्ट दाबून ठेविलें. खरोखरींच पत्रांत दर्शविल्याप्रमाणें तो व्यसनाधीन झाला होता काय ? बाळासाहेब निजल्याजागेवरून ताडकन उठून बसला व गद्गद स्वरानें म्हणाला. " मी येथून गेल्यापासूनची सर्वच हकीकत तुला सांगतों ऐक ? आमची स्टीमर मुंबईबंदरांतून दूर गेल्यावर मला बाबांची व तुमची सर्वांची आठवण होऊन फार रडूं येऊं लागलें. सर्वच लोक अनोळखी व परदेशचे. या वांदराच्या मेळ्यात मी कोठून येऊन पडलों असें मला झाले. दोन तीन दिवस मला बिलकुल चैन पडेना ? अखेरीस नवीन ओळखीनें व नवीन नवीन देखाव्यानें मला हळूहळू हुशारी वाटूं लागली व थोड्याच दिवसांत इंग्लंडांत केव्हां पोहोंचूं व तेथील मनोहर देखावे केव्हां पाहूं असें मला होऊन गेलें. लंडनला गेल्यावर प्रथम मी एका हॉटेलांत उतरलो होतो, परंतु पुढें एका गरीब कुटुंबांत मी राहूं लागलो. मी ज्या कुटुंबांत राहत होतो, त्यांत फक्त दोघी मायलेकींच होत्या. व त्या प्रथम माझ्याशीं फार चांगल्या रीतीनें वागत होत्या. आई पोक्तवयाची म्हणजे पंचेचाळीस पन्नास वर्षांची तरी असावी, पण तिच्या वयाच्या मानानें तिला छानछोकिचा विशेष षोक असलेला दिसत होता, तिची अविवाहित मुलगी जी तिच्याजवळ होती, ती वीस एकवीस वर्षांची होती, ती मूळचीच सुंदर असून आणखी बाह्योपचारानें फारच सुंदर दिसत असे. युरोपात गृहस्थांच्या स्त्रियासुद्धा सुंदर दिसावें म्हणून कृत्रिमपणानें सौंदर्य खुलविण्याचा किती आटोकाट प्रयत्न करीत असतात हें सांगण्याची जरूर नाहीं. त्या मुलीचें नाव सुसान असें होतें. मी त्यांच्या येथें राहूं लागल्यापासून सुसानच्या कंदर वर्तनावरून माझें हळूहळू लक्ष तिच्याकडे वेधूं लागले. व हें तिला कळूनच कीं काय, ती मला अधिक मोह पाडण्याचा यत्न करूं लागली. व ती गोष्ट प्रथम माझ्या लक्षात आली नाहीं. सुसानची एक मोठी बहीण मेरी नावाची होती, पण तिचें या दोघींशीं पटत नसल्यामुळें ती निराळी रहात होती. तिचेंहि लग्न झालें नव्हतें. ती स्वभावानें फार चांगली होती. केव्हां केव्हां ती आपल्या आईकडे येत असे. व माझ्याशीं थोडा वेळ तरी चार शब्द बोलून जात असे. मी तेथें तीनचार महिने राहिल्यावर सुसानचा मामेभाऊ त्यांच्या येथें कांहीं दिवसांकरिता आला होता. त्याचें वागणें फार सभ्यपणाचें होतें त्यामुळें त्याची व माझी लवकरच मैत्री जमली. त्याची माझ्यावर एवढी छाप बसली कीं, तो जी गोष्ट सांगे ती मला खरी वाटूं लागली. त्याच्या संगतींत नाटकें, सिनेमा, स्त्रीपुरुषांचा मिश्र नाच, नानाप्रकारच्या रेसिस पहाण्याचा मला बराच नाद लागला. त्यानंतर तो कधींकधीं निव्वळ पहाण्याकरितां म्हणून मला जुगारीच्या अड्ड्यांत नेऊं लागला. जुगार पहाणें देखील वाईट आहे हें मला माहित होतें. लण्डनांत रस्तोरस्तीं व गल्लोगल्लीं जुगारखाने असून प्रतिष्ठित म्हणविणारे बहुतेक स्त्रीपुरुष जुगारखान्यांत असावयाचेच ही गोष्ट मला माझ्या त्या मित्रानें सांगितली व कांहीं अंशी त्याचें म्हणणें खरेंहि होतें. पहिल्यानें मी जुगार खेळत नसे, परंतु मी श्रीमंताचा मुलगा

आहे हें जाणून ते लोक खेळण्याविषयीं हळूहळू मला आग्रह करूं लागले. एकदां मला जुगार खेळण्याची स्फूर्ति होऊन मी एक डाव खेळलो, परंतु ते दिवशीं रात्रीं मला माझ्या दुर्बलपणाचा पश्चाताप होऊन पुनः जुगार न खेळण्याचा मी निश्चय केला. तसेंच मला दारू पिण्याविषयींहि तो माझा मित्र आग्रह करीत असे, पण त्या बाबतींत मी त्याचें न ऐकण्याचा निश्चय केला होता. एके दिवशीं तो मित्र मला माझी मर्जी नसतां एका जुगारखान्यांत बळेंच घेऊन गेला. परंतु जुगार न खेळण्याचा माझा निश्चय कायम असल्यामुळें, त्यानें कितीहि आग्रह केला तरी मी त्याचें ऐकलें नाहीं. तेथून बाहेर पडण्यास मी निघालो असतां माझी व केशवरावची अचानक गांठ पडली."

"कोण, केशवराव?" मी आश्चर्यानें म्हणालो.

"हो, आपल्याबरोबर जो कॉलिजमध्यें होता तोच केशवराव. त्याला तेथें पाहून मला फार आश्चर्य वाटलें, तसाच आपला कोणीतरी देशबांधव तेथें भेटल्यानें आनंदहि झाला, माझी भेट झाल्यामुळें आपणासहि फार आनंद झाला असें केशवरावनेंहि बोलून दाखविलें. तूं येथें कसा आलास व तूं काय शिकत आहे हें मी त्याला विचारतां तो हंसून म्हणाला " ज्यांना तुम्ही सर्वजण कृपण म्हणत होता त्या प्रो. भोरकरांनीं मला इंजिनियरिंगच्या अभ्यासाला येथें पाठविला आहे व ते आपली मुलगी मला देणार आहेत." पुढें केशवरावची व माझी मैत्री बरीच दृढ झाली. तो नेहमीं माझ्याकडे येऊं लागला व मीहि त्याच्याकडे जाऊं लागलो. एके दिवशीं माझ्याकडे येऊन डोळयात आसवे आणून केशवराव मला म्हणाला.

"बाळासाहेब, मला आतां मरणावाचून गत्यंतर नाहीं" त्याचें कारण विचारतां तो म्हणाला. कीं, आपण एका मनुष्याच्या नादीं लागून जुगार खेळलो व त्यांत शंभर पौंड हारलो, तेवढे पौंड माझ्याजवळ नाहीत,आणि ते ज्याला द्यायचें आहेत तो मनुष्य असा आहे कीं त्याची मला भीति वाटते. शिवाय त्यानें अशी धमकी दिली आहे कीं, उद्यांच्या उद्यां ही रक्कम दिली तर बरें, नाहीं तर आम्ही तुला ठार मारूं. त्यांच्या हातून मरण्यापेक्षां स्वतःच्याच हातून मरणें काय वाईट! तेव्हां मी तुम्हाला शेवटचें भेटायला आलो आहे. त्याची त्यावेळीं मुद्रा फारच दुःखी दिसत होती. मला त्याचें म्हणणें खरें वाटलें व आपल्या देशबांधवानें अशारीतीनें परमुलखांत मरूं नये असें वाटून मी माझ्याजवळची शंभर पौंडाची नोट काढून त्याला दिली व म्हटलें.तुम्हाला मिळेल तेव्हां परत करा. हें सर्व त्याचे कपट होते, असें पुढें एका सद्गृहस्थानें मला सांगितले. अशारीतीनें खोटी थाप मारून माझ्या जवळून पैसे नेल्याबद्दल मला त्याचा फार राग आला व मी त्याची खूब निर्भर्त्सना केली. त्यानंतर त्याच्याशीं मी सलगी बंद केली. तो पूर्वी माझ्याकडे येत असल्यामुळें सुसानवर माझें जडत चाललेलें प्रेम त्याच्या लक्षांत आलें व त्याबद्दल त्यानें एकदां मला हंसत हंसत विचारलें होतें. आणि

खरोखरीच मी सुसानवर अंतःकरणपूर्वक प्रेम करूं लागलो होतो. तिच्या आईजवळ मी तिच्याबद्दल मागणी घातली. तसेच सुसानला माझी पत्नी होण्याची विनंती केली असतां तिनें ती गोष्ट आनंदानें कबूल केली. या बाबतींत बाबांची संमति मिळेल कीं नाहीं, याविषयीं मी साशंकच होतो; परंतु बाबांचे माझ्यावर अमर्याद प्रेम आहे, ते माझ्या सुखाच्या आड येणार नाहींत; अशी खात्री वाटून मी पुढील सौख्यशिखरावर आनंदानें चढत होतो. बॅरिस्टरची परीक्षा दिल्यावर या गोष्टीविषयीं बाबांना कळवावें असा माझा विचार होता, तरी पण त्यांचे काय उत्तर येईल ही धागधूग होतीच. अशा रीतीनें दीडवर्ष निघून गेलें. आतां मध्यंतरीं चारसहा महिनेच राहिले !

एके दिवशीं मी बाहेरून घरीं आलों, तो दिवाणखाल्यांत सुसान तिची आई व तिची बहीण मेरी बोलत आहेत व मध्येंमध्यें माझ्या नांवाचा उच्चार करीत आहेत, असें मला वाटलें; त्या माझ्यासंबंधीं काय बोलतात हें जाणण्याची मला इच्छा झाली. व त्यांचें भाषण मी लक्षपूर्वक ऐकूं लागलों. मेरी आपल्या आईला म्हणत होती. " अशा परदेशांतल्या एका तरुणाला फसविण्याचें तुमचें कृत्य मला मुळींच आवडत नाहीं. त्यापेक्षां कबूल केल्याप्रमाणें सुसाननें त्याच्याशीं लग्नच करावें म्हणजे झालं. " " हो तर ! माझी सुसान त्या काळ्या आदमीशीं लग्न करून आपल्या जन्माचें कायमचें नुकसान काय म्हणून करून घेईल? तिला तर आपल्या जॅकशीं लग्न करायचं आहे" ( माझा मित्र तोच जॅक होय. ) " त्या मूर्खाला एवढं नाहीं कळत कां एक युरोपियन मुलगी आपल्यासारख्या रानटी हिंदुपशूशीं काय म्हणून लग्न करील ? आपल्या सुंदर गोऱ्या मुली पाहून हे बेअकली लोक पहा कसें उल्लू होतात ते ? त्याच्या मूर्खपणाचं हंसूच येतं. " सुसानच्या आईच्या तोंडचे ते शब्द ऐकून माझ्या अंगाचा संताप होऊन गेला. " मग त्याला आधींपासून कशाला तुम्ही नादीं लावलात ? " कांहींशीं चिडून मेरी म्हणाली. " हे लोक किती भोळे व मूर्ख असतात आणि किती लवकर फसतात तें समजण्यासाठीं. " हे शब्द सुसानच्याच तोंडचे होते, त्यावर तिची आई मोठमोठ्यानें हंसत होती. सुसानच्या तोंडचे ते शब्द ऐकून माझा संताप परमावधीला गेला. जिच्यावर मी खरोखरी खऱ्या अंतःकरणपूर्वक प्रेम करीत होतो व जिच्यासाठीं मी माझ्या बाबांपासूनहि दूर राहाणार होतो, जिच्यासाठीं मी माझ्या समाजांतून बहिष्कृत होऊन समाजाकडून उपहास करून घ्यायलाहि तयार होतों, त्या सुसानच्या तोंडचे ते शब्द ऐकून माझ्या मनाची काय स्थिती झाली असेल त्याची कल्पनाच कर. मागचापुढचा कांहीं विचार न करतां मी एकदम आंत शिरलो व मला अशा रीतीनें फसविल्याबद्दल त्या मायलेकीला संतापातिरेकानें खूब बोललो. त्या दोघी उलट माझ्यावरच उलटल्या. त्यांचा अपमान केल्याबद्दल त्या नाहीं नाहीं तसें बोलूं लागल्या. ती म्हातारी म्हणाली, " तुम्ही शुद्ध पशू अहांत. अशा लोकांशीं आम्ही संबंध ठेवूं असें तुम्हा मूर्खांना खरें कसें वाटतें ? आमच्या मुली तुमच्याशीं लग्नें करतात त्या तुमच्या प्रेमाखातर नव्हे, पण तुमच्या

पैशाखातर तुम्हाला प्रेम दाखवितात, एवढीसुद्धां तुम्हा लोकांना अक्कल असू नये ? तुम्हा लोकांसारख्या एकाच नवऱ्यावर आमच्या स्त्रिया अवलंबून नसतात. नवरा चैन भागवू शकत नसला तर आमच्यातल्या कित्येक स्त्रिया त्याच्याशी काडीमोड करून खुशाल वेगळ्या होतात व वाटल्यास दुसरा हौशी नवरा मिळाल्यास करतात. नाहींतर स्वतःच आपलें पोट भरतात. त्यांना तुमच्या लोकांच्या बायकाप्रमाणें नवऱ्याची एवढी परवा नसते. तुम्ही जर श्रीमंत असला तरच आमच्या मुली तुम्हा काळ्या लोकांशीं लग्न करून घ्यायला तयार होतात व वेळ आल्यास लग्न मोडून इकडे येऊन राहतात. माझी मुलगी जी तुझ्याशीं लग्न करायला कबूल झाली होती ती तुझ्याशीं नाहीं पण तुझ्या श्रीमंतीशींच झाली होती. तेहि दोन दिवस चैन भोगून ती काडीमोड करून आली असती, वगैरेवगैरे ती फारच बोलली व मीहि त्यांची झडती घ्यायला कमी केलें नाहीं. जेव्हां आमच्या घरांतून आतांच्या आतां चालता हो म्हणून त्यांनीं सांगितलें तेव्हां क्षणाचाही विलंब न करतां मी ताबडतोब माझें सामानसुमान घेऊन एका हॉटेलांत निघून गेलों. सुसानच्या वर्तनानें मला फारच खेद झाला होता. प्रथमपासूनच जर तिनें मला असा नादीं लावला नसता तर मला एवढें वाईट वाटलें नसतें. मला आतां सगुणेच्या प्रेमाची खरी किंमत कळूं लागली. जेव्हां मी विलायतेस जावयास निघालों तेव्हां मी सगुणेशीं विवाह करावा अशी बाबांची इच्छा होती व सगुणाहि माझ्यावर त्याच भावानें प्रेम करीत होती; परंतु त्यावेळीं मी तिला माझ्या भगिनीप्रमाणें मानत होतो. जेव्हां सुसानकडून माझी निराशा झाली, तेव्हांच मला तिच्या प्रेमाची परीक्षा करतां आली. तरीपण सुसानवरच माझें प्रेम दृढ होतें. तिनें मला असें कस्पटासमान लेखलें तरी तिच्याठायीं माझें प्रेम होतें. असो. आपल्या इकडील हिंदू स्त्रियांच्या प्रेमाची कल्पना कशी व इकडील स्त्रियांची कशी असें मला आतां वाटूं लागलें. मला फारच उद्वेग उत्पन्न झाला. कशांतच चैन पडेना. कोठेंच लक्ष लागेना. अभ्यासावरूनहि माझें चित्त उडून गेले. कित्येक दिवस मी माझ्या अभ्यासाच्या पुस्तकाला हातसुद्धां लाविला नाहीं. तसेंच त्याच संधींत हिंदुस्तानांतून मला दोन तीन महिन्यांत मुळींच पत्र वगैरे न आल्यामुळें मला बाबाविषयीं काळजी वाटूं लागली. माझ्या पत्राचें तुझ्याकडूनहि उत्तर आलें नव्हतें."

"म्हणजे, आम्ही लिहिलेली पत्रें तुला कशी मिळाली नाहींत ? उलट हें घातकी पत्र मिळण्यापूर्वीं तुझ्याचकडून दोन तीन महिन्यांत पत्र नव्हतें."

" काय ? माझी पत्रें तुम्हाला मिळाली नाहींत ? " बाळासाहेब आश्चर्यानें म्हणाला. " मग मी दर मेलला लिहीत असलेलीं पत्रें कोठें गेलीं ? "

" यांत कांहींतरी घोंटाळा झाला आहे खास. येथून तुला जाणारीं पत्रें व तेथून तूं धाडलेलीं पत्रें मधल्यामध्यें कोणीतरी दडपून ठेवित असावो. पण हें असलें नीच कर्म करणारा कोण बरें असावा ? "

"मला आतां त्या नीचाविषयीं साधारण कल्पना आली आहे." बाळासाहेब दुःखी अंतःकरणानें म्हणाला. "चिंतामणी, तो नीच बहुतकरून केशवरावच असावा, अद्यापपर्यंत मला त्याचा संशय आला नव्हता, परंतु हें घातकी पत्र त्याच्याच हातचें आहे अशी माझी खात्री होऊं लागली आहे. मला पूर्वींचीं पत्रें मिळालीं नाहींत, पण बाबांचा अंत झाला तेंच नेमकें पत्र कसें मिळालें? तें तुझेंच होतें. तूं जरी त्यांत खरें कारण लिहिलें नव्हतेस, तरी बाबांचा शेवट कशानें झाला हें मला कळायला उशीर लागला नाहीं. त्यानंतर माझें मन इतकें भडकून गेलें कीं, सर्व जग वणव्यासारखें पेटत आहे असें वाटूं लागलें. तुम्हाला न कळवितां व बॅरिस्टरच्या परीक्षेलाहि न बसता मी हिंदुस्थानांत आलो. पुढचें तुला सर्व सांगितलें आहेच." इतकें बोलून बाळासाहेब थकल्यामुळें स्तब्ध राहिला. ज्या पत्रावरून हा सर्व बनाव बनून आला तें पत्र केशवरावानेंच लिहिलें असावें अशी आतां मला खात्री वाटूं लागली. केशवराव मूळपासून बाळासाहेबाचा द्वेष करीत होता. त्याच्याहातून पूर्वी बाळासाहेबाचें कांहीं पारिपत्य न झाल्यामुळें, त्याच्या अंतःकरणांत इतक्या दिवस धुमसत असलेल्या वैराग्नीनें बापुसाहेब व सगुणा यांच्या आहुती घेतल्या होत्या, आणि त्याच्या ज्वाळांनीं बाळासाहेबाच्या जन्माची राखरांगोळी झाली होती. शिव! शिव!! या द्वेषाग्नीच्या ज्वाळेंत आजपर्यंत कित्येक जीवांचे नाश झाले असतील व कित्येक घराणीं नामशेष झालीं असतील व कित्येक राष्ट्रांचे नाश झाले असतील! क्षुद्र मानवप्राणी आपल्या स्वतःच्या क्षुद्र भावनेला बळी पडून कितीतरी अघोर कर्मे करावयाला उद्युक्त झाले असतील!!

---

## स्मृति सदतीसावी.

# शेवटीं--

बाळासाहेबानें आपली हकीकत पुरी केल्यावर आधींच त्याच्या नाजूक झालेल्या प्रकृतीस फार श्रम होऊन तो अगदीं दमून गेला होता. त्याला पुनः मूर्च्छा आली. मी व मधुरीनें त्याला सावध करण्याचा प्रयत्न चालविला, मधुरीहि त्याची हकीकत ऐकावयास तेथेंच बसली होती व ऐकत असतां रडत होती. त्याची ती हृदयद्रावक स्थिति पाहून मला अतीशय वाईट वाटत होतें. आपली सर्व कर्मकथा सांगून लागलाच तो जगाच्या पाठीवर भटकावयाला जाणार होता, पण त्याला यापुढें असा एकटा वाटेल तिकडे भटकूं न देण्याचा मी निश्चय केला. मी त्याला जाऊं दिला नाहीं व त्याला पाऊल उचलण्याची ताकदहि नव्हती. तो इतकें सव बोलला तें त्याच्या सध्याच्या तीव्र मनोवृत्तिमुळेंच बोलला. परंतु त्याची स्थिति अगदीं लहान मुलासारखी अशक्त झालेली होती. त्याची व मधुरीची मी ओळख करून दिली. माझें गृहसौख्य पाहून त्याला फार समाधान वाटलें. बाबूराव व शंकरराव यांना बाळासाहेब आल्याचें वर्तमान कळून ते त्याला

भेटावयास आले. त्याची सर्व हकीकत ऐकून त्यांनाहि फार वाईट वाटलें. बाळासाहेब माझ्या येथें आल्यानंतर दुसऱ्या दिवशीं शेटसाहेबांची तार आली कीं, 'आपण सर्व दोन तीन दिवसांत मोहनलालच्या लग्नासाठीं मुंबईस येतो.'

वृद्ध रुद्राजीला आपल्या धन्याचें आगमन कळून तो बिचारा त्याला भेटावयाला धांवतच आला. आपल्या धन्याची ती शोचनीय स्थिति पाहून तोहि रडूं लागला. आपण लागलेंच जाणार म्हणून बाळासाहेबाचा निश्चय होता तो सिद्धीस गेला नाहीं. कारण आम्ही त्याला जाऊं दिला नसताच; शिवाय त्याला एकदम इतकी ग्लानि आली कीं त्याला निजल्या जागेवरून दुसऱ्याच्या मदतीवांचून उठवेना. आपल्या मित्र-मंडळींत येऊन पडल्यामुळें इतक्या दिवसांच्या परिश्रमानें त्याचें क्षीण झालेलें शरीर अधिक क्षीण होऊन गेलें. तो अगदीं अशक्त झाला होता, त्याच्या जीवाविषयीं मला फार काळजी वाटूं लागली. आपल्या बंगल्यांत जाण्याची त्याची इच्छा नव्हती व मी त्याला जाऊं दिलें नसतेंहि. बंगल्यांत जाऊन सर्व वस्तूंचें दर्शन घ्यावें असें त्याला वाटेना. पूर्व गोष्टींचें स्मरण होऊन त्याला घडोघडीं अतिशय दुःख होत होतें. तो मला म्हणाला " चिंतामणी, काकासाहेबाबरोबर एकदां आपण कोटांतल्या एका रेस्टॉरान्ट मध्यें गेलो होतो, ते दिवशीं तूं मला काय सांगितलें होतेस? खरोखरी तूं म्हटल्याप्रमाणें अक्षरशः मी नीच माणसाच्या नादीं लागून आपल्याबरोबर आपल्या कुटुंबाचाहि नाश करून घेतला आहे! मला बाबापासून दूर जाण्याची दुर्बुद्धि झाली नसती तर!" त्यानें सुस्कारा सोडला. त्याचें समाधान करण्याला मी व मथुरी पुष्कळ खटपट करीत होतों. तसेंच शंकरराव व बाबूरावहि त्याला समाधानाच्या गोष्टी सांगून बरें वाटावें म्हणून यत्न करीत होते. बाळासाहेब आल्यानंतर त्याला तिसऱ्या दिवशीं रात्रीं फणफणून ताप आला, तो इतका कीं, तो अगदीं बेशुद्ध झाला! आम्ही फार घाबरून गेलो! मी ताबडतोब डॉक्टराला बोलावून आणलें. त्याची प्रकृति पाहून डॉक्टरसाहेबांचा चेहरा बराच गभीर झाला. "यांची चांगली काळजीपूर्वक शुश्रूषा केली पाहिजे." असे ते म्हणाले. एक दोन दिवसांत तर त्याची प्रकृति फारच बिघडली. त्याची नीट व्यवस्था रहावी म्हणून डॉक्टराच्या सल्लयावरून मी ताबडतोब एक नर्स त्याच्या शुश्रूषेला ठेविली. आम्ही सर्व रात्रंदिवस त्याची होईल ती सेवा करीत होतोंच त्याच्या भेटीची आशा नसतां, इतक्या वर्षांनीं तो अचानकपणें मला भेटला होता, परंतु आतां तो कायमचा अंतरणार कीं काय, ही भीति वाटत होती. बाळासाहेब अजारी असतांच शेटसाहेब मंडळीसह आले. बाळासाहेबासंबंधीची हकीकत ऐकून शेटसाहेबांना वाईट वाटलें व ते मोहनलालासह त्याला पहावयाला आले. आम्ही तिघे दिवाणखान्यांत बसलो असतां, शेटसाहेबाकडून त्यांचा एक नोकर आला व "दवाखान्यांतून टेलिफोन आला आहे कीं, दवाखान्यांत एक रोगी कालपासून आला असून तो अगदीं अत्यवस्थ आहे, त्याला आपल्याला भेटण्याची फार इच्छा

आहे तर ताबडतोब येऊन त्या माणसास भेटावें. तो थोड्या वेळाचा सोबती आहे. असें मोठ्या डॉक्टरसाहेबानें सांगितलें आहे."

हा रोगी कोण असावा याचा आम्हाला कोणालाच प्रथम अंदाज होईना ! मोहनलाल म्हणाला.

"बाप्पा, चला आपण त्या बिचाऱ्याला पाह्यला जाऊं. मला वाटतें बहुतकरून तो मगनच—"

शेटसाहेब बसल्या जागेवरून एकदम उठून म्हणाले "होय, मोहन तो मगनच असावा. चला, चिंतामणी, तूंहि चल आमच्या बरोबर" बाळासाहेबाची काळजी घ्यावयाला मधुरीला सांगून आम्ही जे. जे. हॉस्पिटलमध्यें गेलो. मोठ्या डॉक्टराला भेटल्यानंतर पुरुष रोग्यांच्या विवक्षित वार्डांत आम्ही गेलो. एका लोखंडी पलंगावर मगनलाल निजला होता. तो मगनलालच होता. त्याची ती मरणोन्मुख स्थिति पाहून शेटसाहेबांना फार वाईट वाटलें, मगनलाल एका असाध्य रोगानें अगदीं अशक्त व जर्जर झाला होता. त्याच्या तोंडांतून शब्दोच्चारही होत नव्हता. त्याला आतां आपल्या कृतकर्माबद्दल फार पश्चात्ताप झाला होता व त्यानें आपल्या तुटक शब्दानें तो व्यक्त करून दाखविला. शेटसाहेबांच्या घरून तो जो गेला, तो बंगालकडे गेला व तेथें आपलें नाव बदलून राहिला. मूळपासून त्याला कोणतेंच काम करण्याची संवय नसल्यामुळे व तो ऐश्वर्यात वाढल्यामुळें, त्याला कष्टाचीं कामें होईनात व त्याला तेथें फार हालांत दिवस काढावे लागले. त्याला आपल्या कृतकर्माबद्दल योग्य प्रायश्चित्त मिळालें होतें. तो तेथें एका व्यापाऱ्याकडे थोड्याशा पगारावर राहिला. पुढें त्याला एक असाध्य रोग जडला व यापासून आपण बरें होत नाहीं अशी खात्री वाटून, शेटसाहेबांना भेटण्यासाठीं तो मुंबईस आला, परंतु शेटसाहेबाकडे जातां जातां रस्त्यात मोटारीच्या अपघातानें तो बेशुद्ध पडला व त्याला दवाखान्यांत नेण्यात आलें. मोटारीचा त्याला फक्त धक्का लागला होता. त्याची प्रकृति आधींच रोगानें जर्जर झाल्यामुळें त्या धक्क्यानें त्याची प्रकृति जास्त बिघडली. तो फार जगणार नाहीं असें डॉक्टरनें सांगितलें होतें. शेटसाहेबांनीं त्याची सर्व व्यवस्था स्वतंत्र करावयास सांगितली. जो खर्च होईल तो करूं पण त्याला अखेरीस तरी सुख मिळावें अशी त्यांची इच्छा होती. आम्ही तेथून बाहेर पडलों इतक्यांत समोरून येणाऱ्या एका नर्सकडे माझी दृष्टी गेली. त्या नर्सला पाहिल्याबरोबर माझी चमत्कारिक स्थिति झाली व मला अगदीं चटपट लागून राहिली. पण ती नर्स एकदम निघून गेल्यामुळें मला तिला पुनः नीट पहाण्याची संधी मिळाली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं मगनलाल निवर्तल्याची खबर आली. आतां बाळासाहेबाची प्रकृति इतकी अत्यवस्थ होती कीं यांतून हा कसा उठेल याची मला मोठी चिंता लागून राहिली होती. त्याची पुनः कायमची ताटातूट होतें कीं काय या कल्पनेनेंच माझी कंबर खचली; त्यानें आज इतकीं वर्षे अनेक दुःखें भोगिलीं होतीं,

भावी आयुष्यांत त्याला सुखाची आशा नव्हती.बापुसाहेब त्याच्यासाठीं निवर्तलें तें दुःख त्याला फार यातना देत होतें. सगुणा जर जिवंत असती, तर कदाचित त्याला तितकेंच समाधान वाटलें असतें व त्याला बापुसाहेबाचा थोडा तरी विसर पडला असता. बाळासाहेबाच्या तापाला आतां दहा बारा दिवस झाले होते; अथापहि तो गैरशुद्धीतच होता. माझ्या मित्राला लवकर गुण यावा म्हणून मी परमेश्वराची अंतःकरणपूर्वक करुणा भाकीत होतो. आज तर त्याची फारच घालमेल चालली होती. मी त्याच्याजवळच बसलों होतो, माझें तोंड दाराकडे होतें, त्याची शुश्रुषा करणारी जी नर्स रोज येत असे, तिच्या ऐवजीं आज दुसरी नर्स आलेली मला दिसली. मला तेथें पहाताच ती नर्स दाराबाहेरच उभी राहिली, मीहि तिच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागलों. ज्या नर्सला मी एकदां हॉस्पिटलमध्यें पाहिलें होतें, तीच ती नर्स होती. त्या नर्सची प्रथमच बाळासाहेबावर नजर गेली, त्याच्याकडे पहातच तिच्या तोंडून अर्धवट आश्चर्योद्गार निघाला व तिनें आपलें तोंड दोन्हीं हातानीं घट्ट झांकून घेतलें. त्या नर्सविषयीं मला प्रथम जी शंका आली ती खरी असावी, अशी आशा मला उत्पन्न झाली व मी लागलाच जागेवरून उठून त्या नर्सजवळ गेलों व तिला तिच्या नांवानें हांक मारली.

"सगुणाताई, माझी खात्री आहे. तुम्ही सगुणाताईच अहां! ती" थरथर कांपत होती. माझ्याकडे दीन वदनानें पाहून ती म्हणाली.

"होय, चिंतामणी, मींच ती दुर्दैवी सगुणा होय." बाळासाहेबाकडे बोट दाखवून ती म्हणाली. "हें कोण? बा–बाळासाहेबतर नाहीं–ना?" तिची मुद्रा विलक्षण दिसत होती. "सांगा–सांगा–"

"सगुणाताई, तुम्ही जरा इकडे या. मी तुम्हाला सारी हकीकत सांगतो." असें म्हणून आम्ही जवळच्याच एका खोलींत गेलो, सगुणेच्यानें उभें रहावत नसल्यामुळें ती एका खुर्चीवर बसली व तिला बाळासाहेबासंबंधीं सर्व हकीकत थोडक्यांत सांगितली. तो बाळासाहेबच आहे हें ऐकून तिला अतिशय हर्ष झाला, तसेंच इतकें दिवस त्यानें जे जिवाविशेष कष्ट सहन केले ते ऐकून तिला रडूं येऊं लागलें.

"अरेरे चिंतामणी! बाळासाहेबाला कितीतरी हाल आणि दुःख वेठावं लागलं? ज्या माणसाला लहानपणापासून दुःख कसं असतं हें मुळींच माहित नव्हतं त्यानीं हें एवढं दुःखांचे डोंगर कसे सहन केले? इतकं दुःख भोगलं तरी त्या निष्ठुर दैवाला अझून दया न आल्यामुळेंच कीं काय हें जिवाविशेष दुखणं येऊन ठेपलं आहे?" ती हताशपणें म्हणाली.

"सगुणाताई, बाळासाहेब अशा अकस्मिकपणें जसा आला, तशाच आकस्मितरीतीनें तुम्ही त्याची शुश्रूषा करायला नर्स म्हणून आला अहांत. यांत परमेश्वराचा खास कांहींतरी हेतु आहे. त्या दयाघनाच्या कृपेनें तुमच्या हाताला यश येऊन बाळासाहेबाला गुण पडेल."

नंतर सगुणेला मी तिच्या संबंधांची हकीकत विचारली, पण ती मग सांगेन असें म्हणून ती बाळासाहेबाच्या सेवेला हजर रहावयास गेली. सगुणा अशा अकस्मितपणें आल्यामुळें मला फार आनंद वाटला; आणि ती आनंदाची बातमी लागलींच मधुरीला कळविली. तिलाहि फार आनंद झाला! सगुणेच्या जिवापाड मेहनतीनें हळूहळू बाळासाहेबाच्या प्रकृतीला थोडाथोडा फेर पडूं लागला. आतां त्याच्याविषयीं फारशी भीति नाहीं असें डॉक्टरानें आश्वासनपूर्वक सांगितलें होतें.

बाळासाहेब आतां शुद्धीवर आला होता. त्याला मागच्या गोष्टींचें हळूहळू स्मरण होऊं लागलें होतें. अद्याप त्यानें सगुणेला ओळखलें नव्हतें व त्यानें इतक्यांत ओळखूं नये म्हणून सगुणा खटपट करीत होती. मी ऑफीसमधून आल्याबरोबर बाळासाहेबाला पहाण्या करितां त्याच्या खोलींत जाऊं लागलो. कारण बाळासाहेब आजारी असल्यामुळें मी कित्येक दिवसांत ऑफीसमध्यें गेलों नव्हतों, तों आजच त्याला जरा बरें असल्यामुळें गेलो होतो. मी दारावरचा पडदा बाजूला सारून आंत जाणार; तों सगुणेचें दोन्ही हात धरून बाळासाहेब तिच्याकडे सजल नयनांनीं पहात पडला आहे व सगुणेच्या आरक्त मुखावर किंचित् हास्य दिसत आहे, असें दृश्य माझ्या दृष्टीस पडलें. त्यांच्या त्या स्थितींत आपणाकडून व्यत्यय येऊं नये म्हणून मी मागच्यामागें जाणार होतो, पण तितक्यांत बाळासाहेबांची नजर माझ्याकडे वळली, त्यानें मला आंत येण्याविषयीं हातानें खुण केलीं. सगुणेनेंहि मला आंत येण्यास सांगितलें. क्षीण स्वरांत बाळासाहेब म्हणालाः—

" चिंतामणी, ही सगुणा म्हणून मी तिला आताच पाहिली. मला तर वाटत होतें, तिनें कुठेंतरी जीवच दिला !" पुढें तो म्हणाला. " हिनें मला माझ्या सर्व अपराधाची क्षमा केली आहे, "

" चिंतामणी, " सगुणा म्हणाली " पण ती एका अटीवर बरं कां ? "

" कोणत्या बुवा ? " मी म्हणालो.

" पुनः इथून कुठंहि जायचं नाहीं ? "

" छे छे. आतां त्याला कोण जाऊं देणार आहे ? बाळासाहेब, सगुणाताईला आपल्यामुळें मृत्यु आला असें वाटून तुला फार वाईट वाटत होतें, पण आतां त्याचें कांहींच कारण उरलें नाहीं. "

" होय. चिंतामणी दुःखांत सुख एवढें झालें खरें ? परंतु मी माझ्या बाबांच्या मरणाला तरी कारण झालोंच ना ? " त्याचा कंठ दाटून आला व त्यानें एक दीर्घ श्वास सोडला. त्याच्या मनाला अधिक कष्ट होऊं नयेत म्हणून आम्ही दुसराच विषय काढला. मी सगुणेला म्हणालो.

" सगुणाताई तुम्ही कोठें होतात ती हकीकत आम्हाला सांगणार नाहीं कां ?

" माझी हकीकत फारशी मोठी नाहीं," सगुणा म्हणाली "दम धरा, मला येऊं द्या

ऐकायला." मधुरी हंसत हंसत प्रवेश करून म्हणाली. त्यावर सगुणाहि हंसून म्हणाली.

"नाहीं तरी ती हकीकत ऐकल्याशिवाय तुम्हीं ऱ्हाल वाटतं?" ती माझ्याकडे वळून म्हणाली. "हें पहा, बाबांचा तसा अंत झाल्यावर त्या घरांत राहणें मला चमत्कारिक वाटूं लागलें. बाळासाहेबानें स्वतः इतक्या दिवसांत पत्र लिहिलें नव्हतें व ते परत येताना एका युरोपियन स्त्रीला पत्नी म्हणून घेऊन येणार आहेत असें त्या घातकी पत्रांत होतें. तेव्हां बाबा जिवंत होते, तोंपर्यंत ठीक. त्यांच्यामागें आतां आपला येथें कांहीं संबंध राहिला नाहीं व कोणताच हक्क राहिला नाहीं असें वाटून तेथून कोणाला न कळवितां निघून जाण्याचा मी बेत केला. हैद्राबादेस असतांना माझी एक ख्रिश्चन मैत्रीण होती, तिचा नवरा येथल्या हॉस्पिटलमध्यें मोठा डॉक्टर होता. तेव्हां आपण तिच्यामार्फत खटपट करून हॉस्पिठलमध्यें नर्सचें काम शिकावें असा मी विचार करून त्याप्रमाणें तिला एक पत्र लिहिलें. फक्त तिला मी माझी खरी हकीकत सांगितली व तिच्या नवऱ्यानें ही गोष्ट कोणाला कळवूं नये असें तिच्याजवळून वचन घेतलें. तिनें ती गोष्ट कबूल केली व त्या दोघां नवराबायकोनें मला सर्वप्रकारें पुष्कळ मदत केली. मी तेव्हांपासून माझें खरें नांव बदलून हॉस्पिटलमध्यें राहिले. थोड्या दिवसांपूर्वी तुम्ही एका रोग्याला भेटण्याकरितां दवाखान्यांत आला असतां, मी तुम्हाला पाहिलें व तुम्हाला लागलेंच ओळखलें. त्यावेळीं माझी फार चमत्कारिक स्थिति झाली, बाळासाहेबासंबंधीं तुम्हाला सर्व हकीकत विचारावी असें माझ्या मनांत होतें, परंतु तुम्ही मला ओळखलें नाहीं असें जाणून मला ओळख देण्याचें धैर्य होईना! त्यानंतर येथें जी नर्स येत असे; तिला कांहीं कारणावरून दुसऱ्या कामावर नेमल्यामुळें, डॉक्टरनें तिच्या जागीं मला येथें पाठविलें. कोणाकडे जायचें हें मला प्रथम माहित नव्हतें. तुमचें नांव कळतें तर कदाचित् येथें येण्याचें मी नाकारलें असतें. परंतु सर्वांच्या अशा चमत्कारिक रीतीनें भेटी व्हाव्या असा ईश्वरी नेमानेम असेल. कोणी सागावें?" इतकें सांगून सगुणा गप्प राहिली. त्या दिवसापासून दिवसेंदिवस बाळासाहेबाला अधिकाधिक गुण पडत गेला व आतां तर तो साधारण हिंडूफिरूंहि लागला. परंतु त्याच्या अंगांत अशक्तपणा फार आहे. साफ गुण यावयास अद्यापि दोन तीन महिने तरी लागतील असें डॉक्टरचें म्हणणें होतें.

थोडें बरें वाटतांच आमच्या येथून आपल्या घरीं जाण्याचा बाळासाहेब विचार करीत होता. परंतु मी त्याचें त्या बाबतींत मुळींच ऐकलें नाहीं. "तुला साफ आराम वाटल्याखेरीज मी तुला येथून जाऊं देणार नाहीं." असें मी त्याला निक्षून सांगितलें व सगुणेनेंहि ती गोष्ट मान्य केली. कारण आम्ही एका ठिकाणीं असल्यामुळें त्यांचा वेळ कांहींसा बरा जात होता. पुढें बाळासाहेबाची प्रकृति बरीच सुधारल्यावर आम्ही सर्वच महाबळेश्वराला गेलो व तेथें दोन तीन महिने राहिलो. त्या दरम्यान बाळासाहेब

व सगुणा यांचा विवाह झाला. विवाहाला बाबूराव व शंकरराव सहकुटुंबसहपरिवारें आले होते. दुसऱ्या कोणालाच बोलाविलें नव्हतें. बाळासाहेबाला आपल्या मृतपित्याचें जरी एकहि दिवस विस्मरण होत नव्हतें, तरी तो आम्हांमंडळींत अलीकडे कांहींसा हंसू बोलूं लागला होता. बापुसाहेबांची जेव्हां जेव्हां आठवण होई, तेव्हां तेव्हां त्याचा चेहरा उदास होऊन तो अगदीं खिन्न दिसे. पूर्वीसारखा तो आतां थट्टा विनोद केव्हांहि करीत नसे. तो फारच गंभीर झाला होता. पूर्वीप्रमाणें आपल्या विनोदीपणानें त्यानें सर्वांना हंसवावें म्हणून आम्हीं किती पराकाष्ठा केली तरी तें सर्व फुकट जात होतें. पहिल्यानें मोठें होण्याची जी त्याला महत्त्वाकांक्षा होती ती आतां राहिली नव्हती. मला माझ्या बालपणांच्या ज्या कांहीं आठवणी होत्या, त्यापैकीं कांहीं, बाळासाहेबाची भेट होण्यापूर्वीची असली म्हणजे मी लिहून ठेवी. त्याची स्मृति होऊन जीवाला चटपट लागली म्हणजे कसा तरी वेळ जावा म्हणून व त्याचें व माझें जीवन एकमेकांत इतकें दृढ गुंतलेलें आहे म्हणून मी कांहीं भाग लिहून ठेविला. व ते कागद तसेंच माझ्या टेबलाच्या खणांत पडलेले होते; ते एकेप्रसंगीं बाळासाहेबाच्या हातीं येऊन ते पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यास त्यानेंच मला फार आग्रह केला. त्याचें व माझें जीवनचरित्र इतकें निगडित झालेलें आहे कीं, आमच्या जीवनाचे प्रवाह गंगायमुनेसारखे एकाच पात्रांतून वहात असावेत असें आम्हाला वाटतें. त्यानें मला सांगितलें कीं, "ही सर्व हकीकत तूं जशीच्या तशींच लिही. माझ्यासंबंधीं कांहीं वगळूं नको. माझ्यासारख्या अपक्वमनाचा तरुण मनुष्य परदेशांत गेला असतां व तो एखाद्या धूर्त मनुष्याच्या हातांत पडला असतां त्याच्या हातून एखादी चूक होऊन अखेर त्याचा परिणाम कसा होतो हें कळून एखाद्याला तरी त्याचा फायदा घेऊन आपलें आयुष्य सुधारण्याची वेळीच बुद्धि होण्याची संधी मिळेल. आपल्या हिंदी स्त्रियांची खरी पारख न होऊन, वरच्या थाटामाटाला भुलून माझ्यासारखें किती तरी उतावळ्या स्वभावाचे तरुण आपलें व आपल्या कुटुंबांचेंहि नुकसान करून घेतात; आपल्याकडील तरुणांच्या मनांत युरोपियन तरुणीशीं विवाह करून सुखी होण्याचें फार वेड शिरलें आहे; परंतु त्यापासून यांना दोन्ही समाजांत मान न मिळून दोन्हीकडच्या तिरस्कारास मात्र ते कारण होतात. व त्या विजोड जोडप्यास खरें गृहसौख्यहि फारच थोडें मिळत असेल. त्यांना पुढें आपल्या अविचारी कृत्याचा पश्चात्ताप झाल्याशिवाय रहाणार नाहीं. स्वतः माझीच गोष्ट घे, देशहिताच्या गप्पा मारतां मारतां मी देशाभिमानशून्य बनून परदेशच्या एका गोऱ्या कातड्याला भुलून स्वतःच्याच सुखासाठीं धडपडत होतो. परदेशी स्त्रीशीं विवाह करून मला आपल्या देशाविषयीं अभिमान राहिलाच असतां असें मला वाटत नाहीं. त्यांत मी स्वदेशाचें काय हित साधणार होतो ? आपल्या देशांतल्या स्त्रिया अशिक्षित, अज्ञान म्हणून परकीयांच्या स्त्रिया आणण्याचा आपणाला मोह उत्पन्न होतो. त्यामुळें आपलें व आपल्या स्त्रियांचें अज्ञान आपण इतर देशाला दाखवितों. आपल्या स्त्रिया जर अज्ञान असल्या तर त्यांना

सज्ञान करावयाचें सोडून आपण त्यांना तुच्छ लेखतो. दुसऱ्या देशांतले लोक हत्ती, घोडे, कुत्री वगैरेसारख्या मुक्या म्हणविणाऱ्या प्राण्याला शिक्षण देऊन त्याच्या जवळून अचाट बुद्धिसामर्थ्याचीं कामें करवून घेतात, परंतु आपण आपल्या बरोबरीच्या मानवजातीच्या स्त्रियांना योग्य शिक्षण न देतां उलट त्यांना अज्ञानी म्हणून त्यांची अवहेलना करतो. तेव्हा तूं तुझ्या चरित्रात माझ्याबद्दलचा भाग लिहून, एका तरी तरुणाचें मन वळविण्याचा प्रयत्न केलास तर मला तेवढेंच समाधान वाटेल. चिंतामणी, माझ्या बाबासारखे कितीतरी आईबाप आपल्या पुत्रासाठीं हळहळून मेले असतील ! चिंतामणी, परदेशांत विद्या शिकायला जाणाऱ्या तरुणाना माझी हात जोडून विनंती सांग, बाबांनों, तुम्ही परदेशांत जाऊन विद्या शिकून आपल्या दरिद्री देशाची अल्पशी तरी सेवा करा ! स्वतःस सुख मिळावें म्हणून लग्नें जमविण्याच्या भानगडींत पडूं नका. माझ्यासारखा अविचार करून स्वतःच्या कुटुंबाला दुखवूं नका ? जे तुमच्यासाठीं स्वार्थत्याग करतात, जे तुम्हाला सुख व्हावे म्हणून स्वतःच्या सुखाकडे पहात नाहींत; तुम्ही स्वतःच्या कर्तबगारीनें घराण्याचा, देशाचा नांवलौकिक वाढवावा म्हणून तुमच्या दीर्घकाल होणाऱ्या विरहाचें दुःख कष्टाने सोसतात, विद्यावंत व ज्ञानवंत पुत्रापासून स्वतःला धन्यता मिळविण्याची आशा करतात त्या तुमच्या आत्मीयांच्या आशा विफल करूं नका. श्रमिंतवर्गाकरता साधारण स्थितींतले लोक वेळेस पोटाला चिमटा घेऊन आपल्या आटोक्याबाहेर खर्च करून तुम्हाला परदेशांत पाठवितात तर तुम्ही या सर्वांची आठवण ठेवून निव्वळ क्षुद्र बुद्धीने स्वतःच्याच सुखावर नजर ठेवून तेथून लग्न करुन येऊं नका. तुम्हाला सुख वाटतें हा तुमचा भ्रम असतो व तो थोड्याच दिवसांत तुमच्या प्रत्ययास येतो. चिंतामणी माझी ही कहाणी तूं तरुणांना साग !''

बाळासाहेबाचें म्हणणें कबूल करून मी माझें हें कांहींअंशीं कंटाळवाणें चरित्र लिहिण्याचा वेडावाकडा प्रयत्न केला आहे. बाळासाहेबाचें कोणत्याच धंद्यात लक्ष लागत नव्हतें, त्याला पोटापाण्याची काळजी नव्हतीच. पण असें रिकामें बसून त्याच्या मनाला जास्त उद्विग्नता वाटण्याचा संभव आहे, असें आम्हाला वाटत होतें. परंतु थोड्याच दिवसांत एक वर्तमानपत्र काढून आपले विचार लोकासमोर माडण्याचा उद्यम सुरू करावयाचा असा त्यानें विचार केला. आम्ही सर्वांनीं त्याच्या कामांत मदत करण्याचें आनंदानें कबूल केलें.

बाबूरावानें फोटोग्रोफीचा आतां स्वतंत्र स्टूडियो काढला आहे व त्यांत त्याला चांगलें यश येऊन पुष्कळ फायदाहि होत आहे. बाळकृष्ण बी.ए. होऊन एल्.एल्.बी. चा अभ्यास करीत आहे. शांताहि आतां मॅट्रिक पास होऊन कॉलेजमध्यें जाऊं लागली आहे. बी. ए. होऊन तिला समाजसेवा करावयाची आहे.

शंकररावाची वकीली चांगली चालली आहे. मोहनलालाचें लग्न मोठ्या धाम-

धुमीनें करून शेटसाहेबांनीं त्या वधुवरांस निरोप देऊन ते आपल्या पत्नीसह आपल्या पूर्वीच्या बंगल्यांत राहूं लागले.

बाळासाहेब पुनः आतां आपल्या ' तारानिवासांत ' सगुणेसह राहूं लागला आहे. रोज रात्रीं दोन तीन तासपर्यंत एकत्र बसून गप्पा गोष्टी केल्याशिवाय आमचा एकहि दिवस जात नाहीं.

मधुरी, सगुणा, शांता, सुशीला व शंकररावाची पत्नी रमाबाई या सर्वांनीं मिळून एक लहानशी शाळा स्थापन केली आहे. त्यांत फक्त स्त्रियांना उपयुक्त असेंच विषय शिकविले जातात, सूपशास्त्र व शास्त्रीयरीत्या त्याची माहिती, दूधदुभतें, भाजीपाला कसा लावावा वगैरे गृहकार्याला अवश्य लागणारे विषय स्वानुभवावरून शिक्षणेच्छु स्त्रियांना व मुलींना शिकवावयाचें असा त्यांचा बेत आहे. सध्यां तरी त्यांच्या शाळेंत विद्यार्थिनी फारच थोड्या म्हणजे तीन चारच आहेत. पण आपण परिश्रमानें आपल्या शाळेला पुष्कळ विद्यार्थिनी मिळवूं अशी त्यांना आशा आहे. पहावें आतां काय होईल तें.

माईसाहेबांना दुसऱ्या कोठेंहि आधार नसल्यामुळें त्या माझ्याच जवळ आहेत. भिमाचे व त्यांचे सहज गोष्टीवरून खटके उडत असतात.

